






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








२०८८

संपादक - दि. के. बेडेकर

१९६२ - ६३

वर्ष ३५ वे अंक १५२ - जुलै - सप्टेंबर १९६२

" " १५३ - ऑक्टोबर - डिसेंबर १९६२

" " १५४ - जानेवारी - मार्च १९६३
(वाङ्मय - समालोचन अंक)

अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

**ऑक्टोबर : १९६२**

**वर्ष ३५** **अंक १४२**

संपादक

**दि. के. बेडेकर**

## अ नु क्र म

# नवीन सभासद

## ( १ जुलै ते १० ऑक्टोबर )

*तहह्यात:—*

**मुंबई:**— श्री. नीलिमा जोशी;

**पुणें:**— डॉ. त्रि. वि. पटवर्धन; श्री. प्र. ल. गावडे, श्री. मा. त्रि. लिमये; प्रा. भीमराव कुलकर्णी; प्रा. हेमंत इनामदार; प्रा. व. अ. गद्रे; श्री. आ. शां. नाडकर्णी; श्री. द. व. गोडबोले;

**सांगली:**— प्रा. रा. वा. चिटणीस;

**सोलापूर:**— सौ. मीनाक्षी गांधी;

**नाशिक:**— प्रा. मो. स. गोसावी,

**जळगांव:**— प्रा. म. मो. केळकर; डॉ. एन्. वाय्. बाकरे; प्रा. ग. ह. तारळेकर; श्री. देवकीनंदन सारस्वत; श्री. विमल द. राणे; डॉ. स. दे. आठवले; श्री. द. त्रि. गंधे; श्री. हरिभाई राजकोटिया; सौ. शोभना गंधे; श्री. माधवराव नेवे; श्री. रमेश ज. कोलते; प्रा. ल. के. कुलकर्णी; डॉ. सौ. चंद्राबाई देसाई; सौ. मंदाकिनी कुलकर्णी; डॉ. जी. डी. वैंडाळे; श्री. भा. गो. चौधरी; श्री. मु. द. छानेकर; श्री. आ. ह. सरोदे; डॉ. रा. ना. आपटे; श्री. नारायणराव देशपांडे; डॉ. प्र. रा. कुलकर्णी; सौ. जयमंगला कुलकर्णी; सौ. सुलोचना साठे; जामनेर,

**अमळनेर:**— सौ. इंदुमति देशपांडे; श्री. वा. रा. सोनार; प्रा. गणेश कुडे; प्रा. भानु चौधरी; फैजपूर.

**चिपळूण:**— श्री. नाना चितळे;

**बृहन्महाराष्ट्र:**— सौ. प्रमोदिनी जुवेकर; इंदोर. प्रा. वा. के. लेले; वाराणसी.

( एकूण ४१ )

---

सातारा संमेलनाचे अध्यक्ष **श्री. न. वि. गाडगीळ,** यांच्या अध्यक्षीय भाषणाची प्रत पत्रिकेच्या वर्गणीदारांपैकी कोणास हवी असल्यास तसे पत्रिकेच्या संपादकास कळवावे ही विनंती. तशी मागणी कळविल्यावर प्रत परिषदेच्या कार्यालयांतून पाठविण्यात येईल.

**—संपादक,**

---

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वर्ष ३५, अंक १४२ : जुलै–ऑगस्ट–सप्टेंबर १९६२ संपादक– दि. के. बेडेकर

## संपादकीय

सातारा येथील संमेलन पुढील महिन्याच्या पहिल्या आठवड्यात आहे व श्री. काकासाहेब गाडगीळ यांची निवड त्या संमेलनाच्या अध्यक्षपदी झाली याबद्दल त्यांचे संपादक-मंडळाच्या वतीने आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतो. भारतामध्ये इंग्रजीचे स्थान कोणते असावे ? कोकणी व मराठी आणि गोमंतक व महाराष्ट्र राज्य यांच्यातील एकात्मता कशी व केव्हा साध्य होईल ? महाराष्ट्र राज्याच्या बाहेर असलेल्या अल्पसंख्य मराठी-भाषिकांच्या मुलांसाठी मराठी शिक्षणाची योग्य सोय होत आहे काय ? अशा तऱ्हेचे काही प्रश्न आज निकडीचे आहेत व त्यांच्या सोडवणुकीबाबत विचार करताना साहित्यक्षेत्राच्या व महाराष्ट्र राज्याच्या क्षेत्राच्या बाहेरील घटनांशी व शक्तींशी ताळमेळ राखून विचार करणे साहित्यिकांना भाग पडणार आहे. मराठी साहित्यिकांनी संमेलनाच्या व्यासपीठावरून काही एकमुखी निर्णय घेतल्यास वरील प्रश्न सोडविण्यास ते निर्णय उपकारक होतील. या सर्व विचार-विनिमयाबाबत अनुभवी व समतोल मार्गदर्शन करण्यासाठी श्री. गाडगीळांसारखा चतुरस्त्र अध्यक्ष संमेलनाला लाभला हे सुचिन्ह होय.

**मराठी राज्यव्यवहारासाठी कोशरचना**

महाराष्ट्र राज्याची निर्मिती झाली तेव्हाच मराठी भाषा राज्यव्यवहाराची भाषा ठरली. परंतु प्रत्यक्षात तिचा अंमल चालू होण्यासाठी काही साधने निर्माण करणे व आजवर वापरांत असलेली इंग्रजी एकेका क्षेत्रातून बाजूला सारणे हे काम कठीण आहे. या बाबतीत आपल्या शासनाने साधने निर्माण करण्याचे कामही हाती घेतले आहे. यासाठी, मे १, १९६० रोजी, भाषा सल्लागार मंडळ नेमले गेले असून त्याने तयार केलेला पदनामकोश जून १९६२ मध्ये प्रसिद्ध झाला आहे. हा कोश म्हणजे 'मराठी राजभाषा पर्वाचे पहिले पान' आहे असे मुख्यमंत्री श्री. चव्हाण यांनी प्रस्तावनेच्या शीर्षकातच म्हटले आहे ते सार्थच आहे. सरकारी कार्यालयातील सर्व लहान-मोठ्या कर्मचाऱ्यांची इंग्रजी पदनामे गोळा करून त्यांना 'समर्पक, सोपे आणि नेमके पर्याय शोधून वा निर्माण करून' हा पदनामकोश तयार करण्यात आला आहे. मुख्यमंत्र्यांनी कोशाच्या प्रस्तावनेत आणखी असेहि म्हटले आहे की, मराठीने आत्मसात केलेल्या, परंतु संस्कृतेतर भाषांतून घेतलेल्या, रूढ शब्दांना डावलून त्याऐवजी नवीन शब्द तयार केल्याने 'भाषेचा समतोल बिघडून तीत कृत्रिमता निर्माण होण्याची शक्यता आहे.' 'पदनाम-कोशात' अनेक पर्यायांच्या बाबतीत असा समतोल बिघडला आहे अशी या कोशा-संबंधीची टीका प्रस्तुत अंकातील एका लेखात





लेखकाने केलेली आहे, तिच्याकडे आम्ही वाचकाचे लक्ष वेधू इच्छितो. या कोशातील पर्यायांबद्दलची अनुकूल व प्रतिकूल टीका व सूचना येण्यास काही अवधी देऊन भाषा सल्लागार मंडळ त्या विचारात घेईल व काही बदल करून नंतर या कोशाचा प्रत्यक्ष वापर शासनातर्फे सुरू होईल अशी आम्ही अपेक्षा करतो.

### शुद्धलेखनासंबंधी शासकीय निर्णय

सप्टेंबर २०, १९६२ रोजी महाराष्ट्र राज्याच्या शिक्षण आणि समाजकल्याण विभागातर्फे शुद्धलेखनासंबंधी निर्णय जाहीर करण्यात आला आहे. त्यात असे म्हटले आहे की, मराठी साहित्य महामंडळ ही संस्था प्रातिनिधिक स्वरूपाची असल्याने तिने सर्वसंमत केलेली नियमावली शासनाकडून स्वीकृत केली जात आहे. मराठीची लेखनपद्धती ठरविताना परंपरेचा आणि लाखो लोकांच्या लेखनव्यवहाराचा विचार करावा लागतो व या बाबतीत जे नियम ठरवायाचे त्यांचा स्वीकार आणि काटेकोर पालन सर्व मराठी भाषकांकडून होण्याची आवश्यकता लक्षात घ्यावी लागते; तरच लेखनविषयक संकेत हे सर्वांच्या अंगवळणी पडू शकतात. मराठीमध्ये गेली अनेक वर्षे या बाबतीत दोनतीन पद्धती कमीजास्त रूढ झाल्या होत्या आणि एकच एक पद्धती सर्वसंमत होणे कठीण झाले होते. सुदैवाने, महाराष्ट्राच्या प्रादेशिक विभागांत कार्य करणाऱ्या प्रमुख साहित्य संस्था व मराठी साहित्य महामंडळ ही त्यांची मध्यवर्ती संस्था यांनी पुढाकार घेऊन जुन्या परंपरा आणि आवश्यक वाटलेले बदल यांचा दीर्घकाल विचार केला व एक नियमावली ऑक्टो. १९६१ मध्ये संमत केली.त्या नियमावलीवर झालेल्या सर्व टीकेचा विचार करून सर्वसंमत अशी नियमावली तयार करण्यातहि म. साहित्य महामंडळाने यश मिळविले. ही नियमावली सदोष आहे· असे अनेक जणांना वाटले व त्यांनी आपली मते जाहीर रीत्या प्रकट केली. जून १९६१ पासून आतापर्यंत या प्रश्नावर चांगली सर्वांगीण चर्चा झाली. लोकशाही जीवनात अशा चर्चेला महत्त्वाचे स्थान असते व त्यामुळे अंतिम निर्णय घेताना अधिकारी संस्थेला वा शासनाला प्रश्नाच्या सर्व बाजू कळू शकतात. या बाबतीत तसे झाले आणि शेवटी लोकमताचा आणि भाषेच्या व साहित्याच्या बाबतीत लोकमताचे नेतृत्व करणाऱ्या प्रातिनिधिक संस्थांचा निर्णय महाराष्ट्र राज्याने स्वीकारला ही गोष्ट शासनाच्या लोकशाही ब्रीदाला साजेशी व रास्त अशीच झाली.

ग्रंथनिविष्ट किंवा लेखनव्यवहारातील मराठी भाषेची ही सर्वसंमत लेखनपद्धती शक्य तेवढया लवकर व जास्तीत जास्त बिनचूकपणे सर्व व्यवहारात रूढ होण्यासाठी शासकीय निर्णयापेक्षाही महत्त्वाची गोष्ट म्हणजे सर्वसामान्य मराठी साक्षर मनुष्याची आपल्या भाषेच्या लिखित स्वरूपाबद्दलची आपुलकी व बिनचूकपणाबद्दलचा अभिमान आणि जागरूकता होय. दुकानावरच्या पाटया, प्रसंगानुसार छापली जाणारी हस्तपत्रके व रोज वाचली जाणारी वृत्तपत्रे ही ग्रंथापेक्षाहि सामान्य माणसाच्या जास्त वेळा व सतत डोळ्यांसमोर येतात. यातील लेखनही काटेकोरपणे नियमांना धरून हवे अशी दृष्टी सर्वांना यावयास हवी. शासकीय निर्णयामुळे अगदी तळापासून वरपर्यंतच्या शिक्षणक्रमात ही नियमावली रुळत जाईलच. परंतु, सर्व लेखनव्यवहारात ती रुळण्यासाठी सर्वांनी विशेष जागरूकतेने प्रयत्न करावयास हवेत.

### मराठीचे अध्यापन व संशोधन

प्राथमिक शाळेपासून वरपर्यंत मराठी मातृभाषा असणाऱ्या विद्यार्थ्यांना मराठी भाषा व साहित्य कसे शिकवावे ? तसेच,

मराठी मातृभाषा नसलेल्या विद्यार्थ्यांना ती भाषा कशी शिकवावी ? भाषाविषयक आणि साहित्यविषयक संशोधन कसे संघटित करावे ? हे प्रश्न जुनेच आहेत व त्यासंबंधी अनेकजणांनी प्रत्यक्ष प्रयोग आणि तात्त्विक चिंतन केले आहे. हे सर्व अनुभव जमेस घेऊन मराठीच्या अध्यापनाच्या प्रश्नावर जास्त लक्ष केंद्रित करावे अशी सूचना ग्वाल्हेर संमेलनाच्या अध्यक्ष कै. कुसुमावती देशपांडे यांनी अध्यक्षीय भाषणात केली होती. त्या सूचनेप्रमाणे एक प्रयत्न म्हणून पत्रिकेचा पुढील वर्षाचा एक अंक ' मराठी अध्यापन ' विशेषांक म्हणून काढावा अशी सूचना आमच्याकडे आली आहे. भाषांचे अध्यापन, आणि विशेषत: मराठी भाषेचे अध्यापन या विषयावरील व्यासंगी आणि अधिकारी व्यक्तींचे सहकार्य मिळाल्यास ही स्वागतार्ह सूचना प्रत्यक्ष अंमलात आणणे शक्य होईल. यासंबंधी सर्वांकडून सहकार्य व सूचना आम्हाला मिळतील अशी आम्ही अपेक्षा करतो.

### रवींद्र शताब्दीसंबंधी कार्य

रवींद्रनाथाच्या शताब्दीचे कार्य महाराष्ट्रात अनेक संस्थांनी आणि व्यक्तींनी मोठ्या उत्साहाने केले व या निमित्ताने रवींद्र साहित्याच्या अभ्यासाला पुष्कळच चालना मिळाली. महाराष्ट्र राज्य शताब्दी समितीने रवींद्र साहित्यासंबंधीची चार पुस्तके प्रसिद्ध केली व सात पुस्तकांना पारितोषिके व साहाय्य दिले. १६ सप्टेंबर ६२ रोजी रवींद्रांच्या जीवनावरील ग्रंथांना पारितोषिके देण्याचा समारंभ मुंबई येथे मुख्य मंत्र्यांच्या हस्ते झाला. श्री. वा. भ. बोरकर यांच्या ' आनंदयात्री रवींद्रनाथ ' या ग्रंथाला पहिले व श्री. व्ही. एन. गद्रे आणि श्रीमती सुमन वागळे यांना दुसरे पारितोषिक विभागून देण्यात आले. रवींद्र साहित्याचा व्यासंग मराठी साहित्यिकांकडून यापुढे वृद्धिंगत होत राहील अशी अपेक्षा शताब्दीनिमित्त झालेल्या या कार्यामुळे निर्माण झाली आहे.

### श्री. ना. ह. आपटे

सातारा येथे भरणाऱ्या साहित्य संमेलनाचे स्वागताध्यक्ष म्हणून श्री. नारायण हरी आपटे यांची निवड झाली याबद्दल आम्ही स्वागतमंडळाचे, तसेच श्री. आपटे यांचे मनःपूर्वक अभिनंदन करतो. श्री. नानासाहेब आपटे यांना सांप्रत चौऱ्याहत्तरावे वर्ष चालू आहे. सातारा जिल्ह्यातील कोरेगांव या गावी राहूनच त्यांनी आजवर बहुमोल साहित्यसेवा केली. १९०९ साली ' अजिंक्यतारा ' ही त्यांची पहिली ऐतिहासिक कादंबरी प्रसिद्ध झाली. त्यानंतर त्यांनी अनेक ऐतिहासिक व सामाजिक कादंबऱ्या लिहून कादंबरीकार म्हणून लोकप्रियता संपादन केली. कथेच्या क्षेत्रातही आपटे यांच्या लेखणीने लौकिक मिळविला आहे. पहाटेपूर्वीचा काळोख, उमज पडेल तर, आम्ही दोघं, दिवाकर दृष्टी, कोंडाकणी या नानासाहेबांच्या ललितकृती मराठी वाङ्मयात अत्यंत लोकप्रिय ठरल्या आहेत.

नानासाहेबांचे शिक्षण अगदी बेताचे झालेले. त्यांचा स्वभाव एकांतप्रिय आणि वृत्ती प्रसिद्धिविन्मुख. पण असे असूनही राष्ट्रीय आणि सामाजिक दृष्टिकोनातून त्यांनी सातत्याने अनेक सरस ललितकृती आणि कौटुंबिक जिव्हाळ्याने ओथंबलेले वाङ्मय निर्माण केले. सुगरिणीचा संसार, सुखाचा मूलमंत्र, संसारात पडण्यापूर्वी यासारखी त्यांची उद्‌बोधनप्रधान पुस्तकेसुद्धा वाचकांच्या पसंतीस उतरली आहेत. नानासाहेबांच्या शब्दात सांगायचे तर ' जीवनाकडे पाहण्याची व त्यावर विचार करण्याची माझी एक स्वतंत्र दृष्टी आहे. माझे लेखन केवळ कलेकरिता कला किंवा मनोरंजनार्थ कला, अशा पद्धतीचे नाही. ते विशेष हेतुपूर्वक लिहिले असून त्यात राष्ट्राचे, समाजाचे व व्यक्तीचे

कल्याण कसे होईल याचा विचार प्रामुख्याने व अंतःकरणाच्या तळमळीने केला आहे.'

श्री. नानासाहेबांसारख्या वयोवृद्ध ललित-लेखकाची स्वागताध्यक्षपदी निवड करून साताऱ्च्या स्वागतमंडळाने त्यांच्या साहित्य-सेवेचा जो गौरव केला आहे त्यात आम्ही सहभागी आहोत.

## कै. वि. सी. गुर्जर

श्री. विठ्ठल सीताराम गुर्जर यांच्या निधनाने जुन्या पिढीतील एक श्रेष्ठ कथाकार आणि कादंबरीकार अस्तंगत झाला आहे. 'मनोरंजना' च्या काळांतील वाङ्मयावर गुर्जरांनी आपली खास मुद्रा उमटवली आहे. मराठी नाट्यसृष्टीशीही गुर्जरांचे निकटचे संबंध होते. त्यांनी लिहिलेल्या व अनुवादिलेल्या चार-पाच नाट्यकृतींपैकी 'नंदकुमार' हे नाटक १९२५ साली रंग-भूमीवर आले. पण ते फारसे यशस्वी झाले नाही. रंगभूमीच्या इतिहासात गुर्जरांचे नाव सर्वतोमुखी झाले ते गडकऱ्यांच्या 'एकच प्याला' नाटकातील सरस पदांनी, 'एकच प्याल्या'-च्या यशात गुर्जरांच्या पदांनी हातभार लावला ही गोष्ट कोणालाही नाकारता येणार नाही. 'द्राक्षांचे घोस' हा गुर्जरांचा कथा-संग्रह जे वाचतील त्यांना त्यांच्या कथेचे सामर्थ्य नी वैशिष्ट्य कळून येईल. कै. गुर्जर यांची प्रतिभा इंग्रजी व वंग साहित्यावर मुख्यतः पोसलेली असली तरी तिचे स्वतंत्र असे एक वैशिष्टयहि होते. वंगीय श्रेष्ठ कथाकृतींचे मराठी वाचकांना आकर्षकरीत्या ज्यांनी ज्यांनी दर्शन घडविले त्या सर्वांत गुर्जरांचे ऋण मोठे आहे. रमेशचंद्र दत्त, राखालदास बॅनर्जी, हरप्रसाद शास्त्री, कालिप्रसन्न दासगुप्त, प्रभातकुमार मुकर्जी आणि शरच्चंद्र चतर्जी यांच्या ललित कृतींना रमणीय मराठी साज चढवला तो गुर्जरांनी. 'देवदास' आणि 'चरित्रहीन' या दोन अनुवादित कादंबऱ्या त्यांच्या कला-चतुर लेखणीचे सामर्थ्य दर्शविण्यास पुरेशा आहेत. जवळ जवळ पन्नास वर्षे मराठी ललितवाङ्मयाची ते निष्ठेने सेवा करीत आले. १९५० सालानंतर वार्धक्यामुळे ते फारसे लिहू शकले नाहीत. त्यांच्या निधना-मुळे मराठीतील एक श्रेष्ठ व ज्येष्ठ ललित-लेखकाला आणि थोर व्यक्तीला महाराष्ट्र मुकला आहे. त्यांच्या स्मृतीस आम्ही श्रद्धांजली अर्पण करतो.

## पत्रव्यवहार

### वोल्पर्टच्या कादंबरीचा सफल निषेध

वोल्पर्टच्या गांधीवधासंबंधीच्या कादंबरी-संबंधी प्रा. ना. सी. फडके यांनी प्रखर निषेधाची टीका लिहिली व इतर ठिकाणच्या भारतीय साहित्यिकांनी त्या कादंबरीचा तीव्र निषेध केला. साहित्यक्षेत्रातील ही जागरूकता अभिनंदनीय होय. परंतु या बाबतीत वोल्पर्ट या परदेशीय कादंबरीकाराच्या हिणकस कृतीचा निषेध करीत असताना दुसरा एक विचारही मनात येतो. 'फोरम सर्व्हिस' मध्ये प्रा. शिवनारायण रे यांनी तो विचार मांडून भारतीय साहित्यिकांवर टीका केली आहे. गांधीजींच्या आयुष्याची अखेरची वर्षे वैफल्याने व नैराश्याने ग्रासली होती व शेवटी अशा तऱ्हेचे मरण त्यांच्या वाट्याला आले. ह्या शोकांतिकेचा गूढ गहनता कलाकृती-च्या रूपाने साकार करण्याचा प्रयत्न कोणी भारतीय साहित्यिकाने केलेला का दिसत नाही ? असा प्रश्न त्यांनी विचारला आहे. दुसरा असाहि प्रश्न विचारता येईल की, गोडसे यांच्या व्यक्तिमत्त्वात एकीकडे पाप-भीरुत्व व त्यागप्रवृत्ती दिसते, तर दुसरीकडे तितकीच तीव्र अमानुषता व सामाजिक नीतीच्या विवेकाचा व समतोलपणाचा अभाव दिसतो. या विलक्षण अंतर्विरोधाचे मनो-विश्लेषण करण्याचा प्रयत्न कोणी मराठी साहित्यिकाने केलेला का दिसत नाही ? गोडसे यांनी केलेला गांधीजींचा वध ह्या घटनेत साहित्यिकाला आव्हान देणारे भीषण नाट्य नाही, का आमच्या साहित्याला अशा प्रकारचे आव्हान स्वीकारण्याचे सामर्थ्य नाही?

दि. के. बेडेकर

# पेटीवादनकार गोविंदराव टेंबे

—अरविंद मंगरूळकर

प्रतिवर्षी महाराष्ट्र–साहित्य–परिषदेच्या वतीने आणि टेंबे कुलाच्या प्रेरणेने कै. गोविंदराव टेंबे यांच्या स्मरणार्थ जी व्याख्यानमाला होते, तिचे व्याख्याते म्हणून या वर्षी परिषदेने माझी निवड केली, याबद्दल मी परिषदेचा आणि तिच्या कार्यकर्त्यांचा अतिशय आभारी आहे. अशा व्याख्यानमालेच्या योजनेला नेहमीच जे 'प्रस्थमूल तण्डुल' लागत असतात, त्यांची व्यवस्था टेंबे कुलाकडून आणि विशेषतः त्यांच्या तिघा चिरंजिवांकडून होत असल्यामुळे त्यांचे विशेषत्वाने आभार मानणे हे अतिशय उचित आहे. ही व्याख्यानमाला प्रवृत्त करण्याच्या श्रेयाचे मूळ धनी खरोखर तेच आहेत. महाराष्ट्र-साहित्य-परिषद ही त्या कामी निमित्तमात्र झाली आहे. तथापि त्यांनी मोठ्या औदार्याने परिषदेला या श्रेयाचे वाटेकरी होऊ दिले आहे. अशा प्रकारे टेंबे कुलाची उदार प्रेरणा आणि महाराष्ट्र–साहित्य–परिषदेचा या विषयातला सद्भाव यांची गाठ सुरातालांची सम पडावी तशी पडून या वर्षाच्या या संगीतविषयाच्या मैफलीच्या आरंभीचे आज तंबोरे झडत आहेत. महाराष्ट्र-साहित्याच्या या मूलपीठात सुरू होत असलेल्या या मैफलीची अधिष्ठात्री देवता म्हणजे कै. गोविंदराव टेंबे. गोविंदरावांचा साहित्य आणि संगीत या दोहोंहीमधला अधिकार फार मोठा होता; हे आपणा सर्वांनाच माहीत आहे. त्यांचे साहित्यविषयक विचार हे संगीताच्या रंगदारपणाने न्हाऊन निघालेले असत, आणि त्यांची संगीतविषयक चिकित्सा ही साहित्याची डूब घेऊन वर येत असे. त्यामुळे त्यांचे साहित्य-संगीत नेहमी परस्परोपकारक होई. त्यांचे साहित्य वाचणे म्हणजे एखादी मैफल ऐकल्यासारखे वाटे; आणि मरहूम कादरबक्षांच्या सारंगीमधून अर्थासाठी जशा शब्दाशब्दांच्या जणू पायघड्या पडत, त्याप्रमाणे गोविंदरावांचे पेटीवादन ऐकताना त्यांच्या पेटीला जिभा फुटून ती जणू एखाद्या प्रेयसीसारखी अपल्याशी कानगोष्टी करीत आहे, असे वाटे! गोविंदराव टेंबे हे एक कर्ते कलावंत होते; जाणकार कलावंत होते. उस्तादी गाणे कसे ऐकावे, ऐकवावे, याचे वस्तुपाठ बालगंधर्वांनी मराठी श्रोत्यांना दिले असले, तर असे गाणे हे कसे वाचावे–जाणावे याचे अक्षर–पाठ गोविंदरावांनी मराठी वाचकांना दिले, असे म्हटले पाहिजे. त्यांच्या कलासक्तीची सरिता ही संगीत आणि नाट्य यांच्या थडींमधून वाहिली. त्यात संगीताच्या निमित्ताने साहित्य आले, किंवा नाट्याच्या द्वारामधून काही वाङ्मयकुंभ आले, तर तो गौण भाग होता, असे म्हणावे लागते. किंबहुना, संगीत आणि नाट्य या दोनच कलांच्या मूल्यांची त्यांनी अतोनात आणि जन्मभर कदर केली; इतकी की, तेवढी चिंता त्यांनी दुसऱ्या कशाचीच म्हणून वाहिली नाही. त्याचप्रमाणे संगीत आणि नाट्य यांच्याइतका उत्साह त्यांना दुसऱ्या कशाहीविषयी वाटला नाही. याचमुळे आपल्या आयुष्याच्या अखेरी-अखेरीलासुद्धा वयाला आणि शक्तीला झेपणार नाहीत, इतके परिश्रम त्यांनी नाटके बसविण्यासाठी, स्वरनाट्यांना चाली देण्यासाठी आणि त्या चाली बठवून घेण्यासाठी केले; तसेच मित्रमंडळीच्या मोहब्बतीखातर दोनदोन, तीनतीन तास पेटी वाजविण्याचेही कष्ट घेतले.

'संगीत सौंदर्याच्या प्रणाली' असा विषय मी या व्याख्यानमालेसाठी निवडिलेला असला, तरी या प्रणाली त्या त्या कलावंतांच्याचद्वारा साकार झालेल्या आहेत; आणि ज्यांच्या नावाने ही व्याख्यानमाला गेली तीन वर्षे चालू आहे त्यांचे या प्रणालीमध्ये काही वैशिष्ट्यपूर्ण असे स्थान आहे; त्यामुळे आजच्या व्याख्यानामध्ये मी प्रथम कै. गोविंदराव टेंबे यांच्या

कलेचे, अर्थात पेटीवादनाचे काही पैलू दर्शविण्याचा आणि त्यांच्या काही विचारांविषयी चिकित्सा करण्याचा प्रयत्न करणार आहे; आणि त्यानंतर संगीतविषयक काही समस्यांची चर्चा करणार आहे.

भारतीय आणि उस्तादी संगीतामध्ये पेटीचा शिरकाव अगदी अली—अलीकडे झालेला आहे. पेटीचा इतिहास छोटा आहे आणि तिचा झालेला विकासही मर्यादित आहे. पेटी हे सुषिर आणि वायुप्रेरित वाद्य आहे. भारतीय संगीतामध्ये सनई, अलगूज यांसारखी इतरही सुषिर, वायुप्रेरित वाद्ये आहेत, आणि त्यांनाहि आपापल्या परींनी काही मर्यादा आहेतच. परंतु पेटीची गोष्ट जरा वेगळी आहे. ती पश्चिम दिशेकडून आलेली आहे. आणि पश्चिमेकडून आलेल्या अनेक गोष्टींचा आपण सकारण म्हणा, अकारण म्हणा, रागराग करितो. वस्तुतः पश्चिमेकडच्या कितीतरी गोष्टींनी आपल्या जीवनाला आज नवीन आणि वेगळी डूब दिलेली आहे. इंग्रजी भाषेसारख्या काहींनी आपले भाव-जीवन आणि वाङ्मयीन जीवन संपन्न केले आहे. पाश्चात्य भौतिक विद्यांनी आपल्या जीवनाचा मोहराच मुळी पालटून टाकिलेला आहे. वेषांनी आणि केशभूषांनी आपले बहिरंग बदलून टाकलेले आहेत. समाजसुधारणेच्या प्रेरणांनी आपला समाज अस्थिर आणि नवोन्मेषाला उन्मुख केलेला आहे. यातल्या काही गोष्टी इष्ट असतील, काही अनिष्ट असतील. इष्टाबरोबर अनिष्टाचे ग्रहण अथवा अनिष्टाबरोबर इष्टाचा त्याग ही दोन्ही आपल्या समाजांत थोडीबहुत घडत आलेली आहेत. पण सर्वसाधारणपणे आपली मने, आपले विचार आणि आपले आचरण हे आज पश्चिमेकडे वळलेले आहे, हे दिसते. आपल्या जीवनांत जरी असा संमिश्र अनुभव येत असला, तरी कलासृष्टीच्या जीवनाची कहाणी थोडी वेगळ्या वळणाने गेलेली आहे. वाङ्मय, चित्र, शिल्प आणि वास्तु या चार महान ललितकलांचे जग पाश्चात्य विचारप्रवाहांनी ढहळून निघाले आहे, आणि त्यांवर पाश्चात्य कलासृष्टीचा परिणामही झालेला आहे. हा परिणाम काही बाबतीत सांद्र अथवा गाढ आहे, तर काही विषयात पातळ आणि वरवरचा आहे. पण नृत्य आणि संगीत या दोन भारतीय कला मात्र आजवर ऐनजिनसी भारतीय स्वरूपाच्याच राहिल्या आहेत. नृत्य आणि संगीत यांनी आपली भारतीयता, आपले तंत्र, आपली अवस्थता, दैशिकता, स्वयंपूर्णता ही सोडिलेली नाही. किंबहुना, एखाद—दुसरे पाश्चात्य वाद्य क्वचित जरी नृत्यात डोकविले, तरी लागलीच त्याचे उच्चाटन होते, आणि अस्सल भारतीय वळणाचे वाद्य लगेच त्याची जागा घेते,— मग असे वाद्य किती का प्राथमिक असेना आणि किती का अवघड असेना ! अशा ठिकाणी मग आपले भारतीयत्वाचे रागलोभ खिजतात, आणि आपले अभिमान पोसले जातात, वस्तुतः, हा अभिमान अथवा हे रागलोभ यांचा कलासृष्टीशी संबंध नसतो. कलासृष्टि ही कलामूल्यांनी घडते, कलामूल्यांवर जगते, आणि कलामूल्यांनीच पोसते — निदान तशी ती असली पाहिजे. तिचा संबंध बाह्य दैशिक—राष्ट्रीय अभिमानाशी जोडणे हे मूलतः विसंगत आहे. नृत्याच्या एखाद्या कार्यक्रमात आज भरदार आणि विविध आवाजाचे क्लॅरिओनेट चालत नाही, पण एकेरी आवाजाचा आणि प्रायः एकसूरी आवाज देणारा एखादा शंख मात्र अभिमान गवसून ठाण मांडून बसतो ! वास्तविक पाहता, ही असंगति आहे, आणि ती आपण ओळखिली पाहिजे. पण स्वाभिमान आणि शुद्ध कलामूल्ये यांची निवड करताना आपण शुद्ध कलामूल्यांची फारशी दखल घेत नाही आणि तिची कदर करीत नाही. एखाद्या नर्तकाने ‘ शंख ’ या वाद्याचे सामर्थ्य जोखून, परीक्षून, त्याचा विकास घडवून आणून, रूपांतर करून, जर ते वाद्य

आपल्या कार्यक्रमामध्ये योजिले आणि क्लॅरि-ओनेटपेक्षा ते सरस, घनगंभीर आणि पल्लेदार होऊ शकते, असे दाखविले तर ती गोष्ट, ती उभारी स्वतंत्र प्रशंसेची होईल, आणि तिचे मनमोकळेपणाने आणि आनंदाने स्वागतही करणे योग्यच होईल. परंतु भरदार क्लॅरिओनेट हाता-तोंडाशी असताही केवळ भारतीय म्हणून एखाद्या शंखानेच आवाज करीत राहणे म्हणजे आमच्या बापजाद्यांची ही विहीर आहे म्हणून तिचे खारे पाणी ढोशीत राहण्यासारखेच आहे !

भारतीय ते टाकून द्यावे, असा याचा अर्थ नाही हे आपण सहजच ओळखाल. कालिदासाने घालून दिलेल्या 'सन्तः परीक्ष्यान्यतरद् भजन्ते, मूढः परप्रत्ययनेयबुद्धिः' या दंडकानुसार कोणत्याही गोष्टीचा अंगीकार अथवा त्याग चिकित्सापूर्वक करावा, ऐवढेच येथे सुचवावयाचे आहे. याचा येथे निर्देश करण्याचे कारण असे की, संगीतातही आपण पेटीच्या बाबतीत अशीच असंगत भूमिका स्वीकारीत आहो. पेटीचा त्याग अथवा ग्रहण हा येथे मुद्दा नाही तर तिचा त्याग अथवा स्वीकार यांच्या मागच्या भूमिकेचा येथे प्रश्न आहे. सुषिर वाद्य म्हणून जर तिचा त्याग करावयाचा असेल, तर इतर तत्सदृश भारतीय वाद्यांबाबत आपण काय करणार, ते ठरविले पाहिजे. पेटी हे पाश्चात्य वाद्य आहे हे कारण कसे गैरलागू आहे ते आत्ताच सांगितले. कलेच्या बाबतीत अशा प्रकारची ऐतिहासिक अथवा भौगोलिक भूमिका सुसंगत स्वरूपाची ठरत नाही. शिवाय, व्हायोलिन या पाश्चात्य वाद्याचा अंगीकार मग आपण का करावा, हे सांगता येणार नाही. 'पेटी हे बेसूर वाद्य आहे,' हे आपण गोविंदरावासारखा एवढा मोठा पेटीवादनकार मोहरा होऊन गेलेला असताना, आणि निदान टेंबे-व्याख्यानमालेच्या वेळी तरी म्हणूं शकणार नाही असे वाटते. 'पेटी बेसूर' असे आपण कोणत्या तोंडाने म्हणणार ? शिवाय असे की, वाद्य हे बिचारे सुरीलही नसते आणि बेसुरही नसते. ते फक्त वाद्य असते. वादकाचा कान हा सुरीला अथवा बेसुरा असतो; आणि त्याची सुराची जाणीव जशी आणि ज्या दर्जाची असेल, तसा त्याचा हात सुरीला अथवा बेसुरा जाईल. तसेच, त्याच्या हाताच्या मेहनतीवर आणि करामतीवरही त्याचा सुराचा आविष्कार अवलंबून राहील. सुराची नुसती जाणीव उत्तम असली म्हणजे तीवरच सुराचा आविष्कार थोडाच असतो ? त्याला तसा व्यासंगहि लागेल. खुद्द गोविंदरावांची खास पेटी जरी वाजविण्यास घेतली, तरी तिला उत्तम बोलावयास लावावयाला एखादा गोविंदरावच लागतो; आणि तोही काही आभाळातून पडत नाही, तर हळूहळू विकास पावत जातो. हे सर्व लक्षात घेतले म्हणजे संगीतातल्या कोणत्याही वाद्याच्या बाबतीत, कोणत्याही तत्त्वचर्चेच्या वेळी, कोणत्याही घटकाविषयी आपली भूमिका पारखून घेणे, तिची निर्लेपता पुन्हा-पुन्हा कसाला लावणे हे किती अगत्याचे आहे, ते सहज पटेल. खरेच बोलावयाचे म्हणजे पेटीविषयीचे आजकालचे आक्षेप हे काही नवीन नाहीत. हिंदुस्थानात रेडियो येऊन स्थायिक होण्यापूर्वीच या आक्षेपांची लोकांना जाणीव होती; पेटी वाजविणाऱ्यांना, पेटी ऐकणाऱ्यांना, पेटीची मैफलीत साथसंगत घेणाऱ्यांना आणि चिकित्सकांनादेखील. आणि हे सर्व आक्षेप लक्षात घेऊन पेटीचा विकास घडवून आणण्यातही काही तंत्रज्ञांनी, कारागिरांनी आणि कलावंतांनी यश मिळविले. फार काय, इकडे आवश्यकतेच्या पोटी पेटीचा असा विकास झाला, पण तिकडे अस्सल भारतीय म्हटलेली कितीतरी वाद्ये होती तिथेच राहिली. कोणी सांगावे ? कदाचित त्या वाद्यांनी परिपूर्णता गाठली असेल ! किंवा मानवी बुद्धीला त्यांच्या बाबतीत काही सुचलेच नसेल ! पण ते काही असले, तरी पेटी हे अपूर्ण वाद्य होते म्हणून म्हणा, किंवा त्यात काही डोके घातल्यावाचून

आता चालणारच नाही म्हणून म्हणा, कलावंत-कारागीर–चिकित्सकांनी ते आत्मसात केले, आणि त्याचा यथापेक्ष विकासही घडवून आणिला. अशा विषयाच्या बाबतीत जिव्हाळा आणि चिकित्सा ही दोन्ही लागतात. ती असली म्हणजे अब्दुल करीमखाँनी ज्याप्रमाणे तंबोऱ्यात काही नवेजुने केले त्याप्रमाणे काही संशोधन आणि काही फेरमांडणी होते. मूल्यांची फिरून तपासणी होती. त्यातला खडाकाटा काढिला जातो. आणि त्यांना उजाळा मिळतो. पेटीच्या बाबतीतला इतिहास असा आहे की, सुरील्यातल्या सुरेल गवयांनी तिची सोबत घेतली आणि बेसुऱ्या गवयांनीही तिच्याकडे पाठ फिरविली. पण म्हणून सुरीले बेसूर झाले नाहीत, की बेसुरे सुराच्या मार्गावर आले नाहीत. सुरीले गवई हे पेटीसहित जसे मुळात होते, तसेच ते राहिले; आणि बेसुरेही पेटीवाचून जेथे होते, तिथेच राहिले. तात्पर्य, पेटी बिचारी तटस्थच होती. तिला माहीत होते की, 'कर्ता-करविता हा कलावंत आहे! आपण काय निमित्तमात्र आहो! पण मायेमुळे हा अज्ञानाचा लिताळा आपल्याला लागला आहे! कधीतरी हा लिताळा, हे अज्ञानाचे आवरण गळेल, आपल्याला या जंजाळातून मुक्ती मिळेल, आणि आपले मूळचे स्वरूप पुन्हा प्रकट होईल!'

आतापर्यंतचा विचार साथसंगतीच्या पेटीवादनाबद्दल केला. स्वतंत्रपणे पेटीवादन करणाऱ्या आणि ते अत्यंत मनोवेधक रीतीने करणाऱ्या कलावंतांची भूमिका ही याहीहून चोख होती. सुराच्या बाबतीत खास सुधारिलेली पेटी ते वादनासाठी घेत असत. त्यामुळे गवयांना किंवा तंतकारांनादेखील जे विशिष्ट सूर लावणे मुश्किल, ते सूर असे पेटीवादक अगदी सहज, सफाईने आणि ऐटीने लावीत असत. मींडीसारखे काही अलंकार पेटीतून निघत नाहीत असे जे म्हणत त्यांनाही आक्षेप मोडून काढण्याइतका मींडीचा भास ते पेटीत निर्माण करीत असत. शिवाय, असे की इतर सर्वच भारतीय वाद्ये गायनांतले सर्वच अलंकार काढू शकतात, अथवा मानवी गळा तरी तंतातले सर्वच प्रकार वटवू शकतो असे थोडेच आहे? गळ्याची अथवा वाद्याची कमाल मर्यादा कोणती, हे शास्त्रीय दृष्ट्या पाहण्याची कलाविष्कारात तादृश आवश्यकता नाही. जे त्या वाद्यातून निर्माण होऊ शकते त्याची मांडणी किंवा त्याचा आकार, घाट काय हे पाहणे हे पहिले काम. तसेच पाहिले तर जलतरंग हे वाद्य अगदीच मर्यादित आहे. सारंगीच्या मर्यादा वेगळ्याच आहेत. सतारीची कामगत कितीही मोठी म्हटली, तरी बीनाच्या हुंकार-डकारापुढे ती खरोखर पोरखेळाच म्हणावी लागेल. उत्तम प्रकारे मींड काढू शकणाऱ्या सनईची जलद तान त्या मानाने कशी बेढंगी निघते, ते आपल्याला कळू शकते. पण हा तुलनेचा विचार मुळात गैरलागू आहे. सनईतून जे निघते, सतारीतून जे वठते, जलतरंगातून जे नाचते, बीनातून जे गरजते, त्याचा तो-तो कलावंत कसा आणि किती उपयोग करून घेतो आणि त्यामधून सुरातालांचे, आलापलयींचे कोणकोणते संमिश्र आणि गुंतागुंतीचे वेधक आकार जन्माला घालतो, ते पाहणे हेच मूलगामी होय.

पेटीच्या स्वरूपाविषयी एवढे विवेचन करण्याचे कारण हे की, हे किंवा अशा प्रकारचे इतर अनेक विचार गोविंदरावांनी जन्मभर आपल्या मनात वागविले होते, आणि कधी कधी ते त्या विचारांना व्यक्त स्वरूपही देत असत. पेटीचे हे स्वरूप प्रथम यथार्थपणे लक्षांत घेऊन त्यांनी पेटी घेतली आणि तीत पारंगतता मिळविली, असे नाही. एकदा पेटी घेतल्यानंतर आणि तिला आपले म्हटल्यानंतर तिच्यातले गुण आणि दोषही त्यांच्यापुढे प्रकट होऊ लागले आणि पेटीचे मर्यादित समर्थन त्यांना करता येऊ लागले. ते स्वतःच एक पेटीवादक असल्यामुळे त्या समर्थनासाठी त्यांनी विशेष आटापिटा केला नाही. परंतु पेटीविषयीच्या मूळ भूमिकेबद्दल ते स्वतः मनात

पक्के होते आणि त्यामुळे एकदा जे त्यांनी पेटीला आपले म्हटले ते शेवटपर्यंत कधी म्हणून तिला अंतर दिले नाही. त्यामुळे तिचा-त्यांचा विवाह अंती कल्याणावह झाला.

गोविंदरावांनी आपल्या दीर्घ आयुष्यात अनेक उद्योग केले, आणि त्यांसाठी परिश्रम केले. त्यांनी नाटके लिहिली, नाटकात कामे केली. त्यांचे नाटकांतले काम मी केवळ एकच पाहिले. त्यामुळे त्या बाबतीत मला काहीच सांगता येणार नाही. त्यांची नाटके काही काळ जरी रंगभूमीवर चालू होती, तरी ती विशेष प्रभावी झाली नाहीत, असा जाणत्यांचा निर्वाळा आहे. आज ती वाचताना अळणी, निर्जीव वाटतात, आणि त्यांच्या पदातला खुशबूही उडून गेलेला आहे. साहित्याच्या दृष्टीने त्यांची प्रतवारी बेताचीच लागेल, असे वाटते. याव्यतिरिक्त गोविंदरावांचे ' माझा जीवनविहार ' या नावाचे आत्मचरित्र, ' माझा संगीत व्यासंग ', ' कल्पनासंगीत ', ' अल्लादियाखाँसाहेबांचे चरित्र ', ' महाश्वेता ', आणि ' जयदेव ' ही स्वरनाट्ये आणि त्यांच्या मृत्यूनंतर प्रकाशित झालेला ' जीवन-व्यासंग ' हा त्यांचा लेखसंग्रह इत्यादि वाङ्मय उपलब्ध आहे. ' महाश्वेता ' आणि ' जयदेव ' ही त्यांची स्वरनाट्ये केवळ दृश्य-श्राव्य कृती आहेत. संगीत आणि नाट्य याविषयीचा त्यांचा उत्साह उदंड होता; आणि तो अखेरपर्यंत ओसरला नाही. नाटकाविषयी आणि अभिनयाविषयी त्यांनी बरेच लेखन केले. त्यातल्या सर्व विचारांशी मतैक्य पावणे कठीणच आहे. गोविंदरावांना आजकालच्या नाटकांविषयी अरुची होती आणि नाटकातल्या संगीताविषयी विलक्षण अभिमान होता. ज्या काळात ते जन्मले-वाढले त्या काळाच्या दृष्टीने त्यांच्या रुचि-अरुची आपण समजू शकतो. पण त्यांशी मतैक्य मात्र पावू शकत नाही. गोविंदरावांच्या या सर्व वाङ्मयाची चिकित्सा आपल्याला करावयाची नाही. परंतु त्यातले काही वाङ्मय खचित श्रेष्ठ अशा साहित्यगुणांनी नटलेले आहे, यात शंका नाही. 'माझा संगीत व्यासंग' हे खरोखर मराठी वाङ्मयाचे लेणे आहे आणि ते निरंतर तसेच राहील. संगीतविषयक रसास्वादपर आणि चिकित्सापर वाङ्मय हे मराठीत इतर कोणत्याही प्रादेशिक भाषेतल्या त्यासारख्या वाङ्मयापेक्षा संख्येने अधिक आणि गुणांनी श्रेष्ठ आहे. काही प्रादेशिक भाषांमध्ये आणि चांगल्या चांगल्या दर्जाच्याही भाषांमध्ये, अशा वाङ्मयनिर्मितीला आरंभही झालेला नाही, हे लक्षात घेतले म्हणजे याचे महत्त्व कळेल. मराठीतल्या या वाङ्मयाचा आरंभ गोविंदरावांनी केला; आणि तो आरंभ इतका सरस होता की, त्या आरंभानेच गुणवत्तेचा जवळजवळ कळस गाठला. गोविंदरावांच्यानंतर इतरही अनेक लेखकांनी अशा प्रकारचे वाङ्मय हे आपापल्या परींनी समृद्ध केले आहे. संगीतविषयक वाङ्मय, त्याचे वेगवेगळे प्रकार आणि त्यांचे स्वरूप हें मराठीतल्या टीकावृक्षाला आलेले एक नवीनच पुष्प आहे. त्याची चिकित्सा आणि विश्लेषण हाही एक महत्त्वाचा विषय आहे. परंतु या प्रसंगी आपण तो सोडून देऊ.

गोविंदरावांचे सरस अथवा निरस असे हे सर्व वाङ्मय वाचताना आपल्याला एक जाणीव सतत येत राहते. ती ही की, त्यांच्या एकंदर वृत्तीत नटवेपणाचा स्थायिभाव फार प्रबळ होता. अनवड सौंदर्य त्यांच्या पसंतीला कधी फारसे उतरले नाही. त्यांच्या लेखी सर्व गोष्टी तोलून-मापून केलेल्या; घडीव, घासपूस केलेल्या, रेखीव, कातीव अशा हव्या असत. मग पानाला चुना लावण्यासारखी एखादी क्षुद्र कृती असो, पंक्तीतले वाढप असो, ताटातल्या खाद्यपदार्थांची मांडणी असो, चहा घेण्याची रीत असो, बिछायत घालण्याची तऱ्हा असो, ख्यालातली एखादी उपज असो, हार्मोनियममधली एखादी तान असो, मैफलीचे एखादे वर्णन असो, पदाची एखादी रचना असो, किंवा त्याची स्वर-

योजना आणि स्वरवेल असो. गोविंदरावांची सौंदर्यदृष्टी तीवर नेहमी फिरत असे, आणि तिच्या भोवती रुंजी घालीत असे. संगीताच्या मैफलीसारखा एखादा महत्त्वाचा विषय असला, किंवा पेटीवादनासारखा मोठा प्रसंग असला, तर ते आपल्या सौंदर्यदृष्टीने त्यातून नाजूक लेणे खोदून काढीत असत. हे लेणे कधीही दणकट अथवा भरदार, ठोस किंवा सणसणीत नसे. ते नेहमीच नाजूक असे. फुलांच्या मुद्रासारखे आलवार, एखाद्या दीपकलिकेसारखे तरल, पण तसेच आकारयुक्त. आधी पेटी या वाद्यालाच मुळी सणसणीतपणा भावत नाही. त्याची प्रकृति हलकी, नाजूक, मुलायम. त्यात पुन्हा गोविंदरावांसारखा मृदु सौंदर्यदृष्टीचा कलावंत. त्यामुळे या सर्व निर्मितीत मृदुता जाणवत असे. मात्र तीत थिल्लरपणाचा अंश नावालाही नसे. पेटीवादन असो, मित्रमंडळींच्या मोहब्बतीखातर जमविलेली छोटी मैफल असो, किंवा अखेर-अखेरच्या 'महाश्वेता', 'जयदेव' यांसारख्या स्वरनाट्यांच्या कृती असोत, गोविंदरावांची अभिरुची मृदुता आणि नेटकेपणा यांकडे झुकलेली असे. म्हणूनच नटवेपणाच्या स्थायिभावाचा आरंभी निर्देश केला. या स्थायिभावांमधून अंकुरलेले विषय कधीच भडक किंवा नेत्रोत्सवी स्वरूपाचे नसत. सौम्य रंग, सौम्य स्वर, सौम्य ताल, सौम्य लेखन, सौम्य भाषण, अशा रीतीने त्यांच्या सर्वच अभिव्यक्तीत आणि कलाविष्कारात साधारणपणे चांदण्याची शीतलता आणि शांतता पसरलेली असे. या दृष्टीने त्यांचे व्यक्तित्व हे संस्कृत नाटकातल्या 'धीर ललित' नायकासारखे होते; आणि कलासक्ती, मृदुत्व, नागरआचार ही त्यांची वैशिष्ट्ये होती. त्यांचे हे व्यक्तित्व त्यांच्या कलाविष्कारातही मुरलेले दिसून येई.

अस्सल कलावंत म्हणून गोविंदरावांचे नाव जर कोणत्या एका शाखेमध्ये टिकून राहावयाचे असेल, तर ते त्यांच्या हार्मोनियम वादनात. पेटीवादनासाठी त्यांनी किती कष्ट केले, याची निरंतर जागती साक्ष आपल्याला त्यांच्या 'संगीत-व्यासंगा'त दिसते. यात लक्षात घेण्याचा भाग असा आहे की, पेटीवादन शिकावयाचे म्हणजे बाजारांतून हार्मोनियम आणून त्यावर ढोर मेहनत करावयाची असे त्यांनी कधी केले नाही. पेटीच्याद्वारा जो आविष्कार व्हावयाचा, तो गायनाचा व्हावयाचा, हा संबंध गोविंदरावांनी कधी दृष्टीआड होऊ दिला नाही. आणि जेवढी म्हणून त्यांनी मेहनत केली, रियाज केला, तो याच दिशेने केला. त्यामुळे त्यांचे पेटीवादन हे साधे पेटीवादन असे कधीच राहिले नाही. त्याला मैफलीच्या नायकाची प्रतिष्ठा आली, अथवा नायिकेची प्रतिष्ठा आली! 'नायिकेचा' असे म्हणण्याचे कारण असे की, त्यांच्या पेटीवादनातल्या कलेची प्रकृती मूलतः नाजूक-साजूक होती. पेटीवादनाच्या कामी त्यांनी केलेले कष्ट आणि संगीताच्या दुनियेतला त्यांचा तजुर्बा यांच्या पडलेल्या मेळामुळे त्यांच्या पेटीवादनाला विशिष्ट दर्जा आला. नुसताच विशिष्ट दर्जा आला असे नव्हे, तर त्यांनी त्याला अनन्यसाधारण असे स्थान प्राप्त करून दिले. नुसतेच अनन्यसाधारण स्थान प्राप्त करून दिले एवढेच नव्हे, तर पेटीत जो नुसताच निर्जीव वारा निश्चेतन भात्याने भरला जात होता, त्याच्याऐवजी त्यांनी पेटीत प्राणवायूची फुंकर घातली. पेटीला त्यांनी नवजीवन दिले. तिचा संसार मांडिला. तो चालता केला. आणि तिचा वेल मांडवाला नेला. दिवंगत पन्नालाल घोषांनी ज्याप्रमाणे बासरीला आपल्या सुंदर वादनाने मैफलनायकाचे स्थान दिले; किंवा उस्ताद थिरकवांनी आपल्या नितांतसुंदर वादनाने ज्याप्रमाणे गवयाच्या उजव्या बाजूला असलेला तबला खुद्द गवयाच्याच जागी आणून बसविला, त्याप्रमाणे गोविंदरावांनी गवयाच्या डाव्या हाताची पेटी खुद्द गवयाच्या जागी आणून बसविली. हे कर्तृत्व सामान्य नाही,

त्यासाठी सततचा असा श्रोत्यांचा समाज उत्पन्न करावा लागतो. त्या श्रोतृसमाजाला वाद्याचा दर्जा आपल्या वादनाने बुद्धिपुरःसर पटवून द्यावा लागतो. त्यांच्याकडून नुसत्या वाहवा घेऊन चालत नाही, तर त्या वाहवा चिकित्सेला आणि चिकित्सकांना शाश्वतच्या वाटतील असे करावे लागते. तात्पर्य, या सर्व कामांत कलाविष्काराची कृती हीच प्रधान असते. भाष्याचा, स्पष्टीकरणाचा काही उपयोग नसतो. 'क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे !'

ज्यांनी नुसतीच अफाट मेहनत केली आहे, असे पुष्कळ पेटीवादक होऊन गेले. गोविंदरावांपेक्षा ते अधिक तयारीने पेटी वाजवीत, अधिक ईर्ष्येने, अधिक जोषने आणि अधिक लयकारीने पेटी वाजवीत. अशांच्या वादनात मेहनतीने येणारी सिद्धी दिसत असे. पण ती काहीशी नावरूप 'सिद्धी' ! ही 'सिद्धी' दुःशासनाने द्रौपदीला खेचून सभेत आणिले, तशी मैफलीत त्यांना खेचून आणावी लागत असे. कधी लयाचे काही सर्कसकाम करून, तानबाजीच्या काही भराऱ्या मारून किंवा स्वरांचे गुंतावळे उकलण्यासाठी श्रोत्यांपुढे टाकून ते वाहवा मिळवीत असत, आणि मैफल राजी करून सोडीत. यालाही काही महत्त्व असते, हे मान्य केले पाहिजे. पण कलेची ही पहिली—दुसरी अवस्था आहे. पेटी हे वाद्य तसे सोपे आहे,—सोपे म्हणजे प्राथमिक प्रगतीला सुलभ आहे. ते सतारी—सरोदासारखे बिकट नाही. सतार—सरोद ही वाद्ये व्याघ्रमुखी आहेत. म्हणजे प्रथमच साधक घाबरून जातो. साधनेचे कष्ट अर्थात सर्वत्रच आहेत. पण पेटी हे वाद्य मुळात व्याघ्रमुखी नाही. ते सौम्य आहे. पोरीबाळींनीसुद्धा त्यावर खुशाल हात टाकावा आणि चालवावा, असे ते आहे. सतारीसारखे ते लावावे—मिळवावे लागत नाही. ते सदासज्ज, सदाहासरे असे वाद्य आहे. पण ते शेवटी मात्र कठीण आहे. त्याचे तंत्र सहज आत्मसात करता येत असल्यामुळे गायनाच्या प्राथमिक तयारीलाही ते उपयोगी पडते. पण स्वतंत्र मैफलीचा बोजा घेऊन ते वाजवावयाचे म्हणजे नुसत्या कष्टांनी तेथे भागत नाही. त्याला विशेष प्रकारची सौंदर्यदृष्टी लागते. विविध गानप्रकारांवर काबू असावा लागतो. चौफेर दृष्टी हवी असते. संग्राहक वृत्ती ठेवावी लागते. अशा वृत्तीचे पोषण करण्यासाठी मैफलींचा अनुभव घ्यावा लागतो. यशापयशाचा मनाशी निवाडा करावा लागतो. गोविंदरावांपाशी हे सर्व होते. त्यांच्या वादनात काही न्याराच खुशबू होता. त्यांच्या वादनात कसलेहि 'प्रदर्शन' नव्हते. ते करीत ते सारे सोपे दिसे, पण असे खरोखर कठीण. संगीतानुभवाचा सर्व मधुसंचय सिद्ध असल्यामुळे 'सिद्धी' ही त्यांना खेचून आणावी लागत नसे. ती आरंभी किंचित दूरशी उभी असे आणि आपण होऊनच ती त्यांच्याकडे आकृष्ट होऊन येई. खरोखर ते 'हाताने गात असत !' मरहूम फैयाझखाँनी त्यांच्या वादनाविषयी असे उद्‌गार काढिले होते की, 'इस बाजामें दिल बजता है दिल ! बाजा नहीं बजता !' त्यांचे रहस्य हेच की, पेटीच्या ज्या काही मर्यादा, ज्या काही उणीवा आहेत, त्या गृहीत धरूनसुद्धा त्यांचे वादन हे गायनाच्या आसपास रुंजी घालीत असे. ते गायनाशी पुष्कळसे मिळून जात असे. त्यामुळे त्यात जिव्हाळा उत्पन्न होई.

गोविंदरावांच्या पेटीवादनाच्या सौंदर्याचे आणखी एक रहस्य होते. ते रहस्य त्यांच्या गायनाच्या ओढीत होते. ते पेटीवादक म्हणून गाजले; पण त्यांना जन्मभर जो जिव्हाळा वाटत होता तो गायनाचा, गानक्रियेचा. त्यांची गानरचना दिवसभर चालू असे. दिवसाचा त्यांना कितीतरी वेळ स्वतःशी गुणगुणण्यात जाई. त्यांना आवाजी नव्हती. पण त्यांना डोके भरपूर होते. त्यामुळे छोट्याशा मैफलीत ते गावयाला बसले म्हणजे त्यांचे मन फार खुलत असे. आणि अशा वेळी कितीही

अवघड किंवा अनवट राग असला तरी त्याची मांडणी ते विलक्षण सहजतेने आणि बिनचूकपणे करीत. त्या मांडणीत अवघडपणाचे प्रदर्शन नसे, किंवा मांडणीचा किचकटपणाही नसे! हलक्याशा वेगाने वाहत चाललेल्या सौम्य प्रवाहाप्रमाणे त्यांचे गायन चाले. भास्करबुवा आणि अल्लादियाखाँ यांच्या गानपरंपरांचा त्यांना अत्यंत अभिमान होता. त्यांच्या गायनात अल्लादियाखाँचेच गायन प्रतिबिंबित झालेले असे. अर्थात हे गोविंदरावांच्या प्रकृतीला आणि वळणाला अनुसरूनच प्रतिबिंबित होई; कारण ते खाँसाहेबांचे गंडाबंद शागीर्द नव्हते. पण त्यांच्या शागीर्दालाही नसेल इतका अभिमान त्यांना होता. खाँसाहेबांच्या गायकीचे पुष्कळसे रस त्यांनी आपल्या गायनात मुरवून घेतलेले होते. परंतु गाण्यात जरी खाँसाहेब हे त्यांचे दैवत होते, तरी गोविंदरावांनी तारतम्य म्हणून कधी सोडिले नाही. त्यांना हे माहीत होते की, खाँसाहेबांची 'अवघडदासाची गायकी' पेटीवर वठविणे म्हणजे सूर्याला हात घालण्यासारखे आहे. ही गायकी सर्वच्या-सर्व गमक प्रकारांनी काठोकाठ भरलेली, आणि त्यात पुन्हा रचना तेंढीवाकी. गमकांचे आणि पेटीचे सूत जमण्यासारखे नाही. त्यामुळे त्यांच्या पेटीवादनात खाँसाहेबांच्या बोजेदार गायकीपेक्षा भास्करबुवांच्याच ढंगदार आणि रसील्या गायकीचा लुत्फ असे. भास्करबुवा हे त्यांना नेहमी 'गुरुवर्य' होते. अल्लादियाखाँ हे त्यांना ईश्वरासारखे वाटत, पण भास्करबुवांशी त्यांची, विठ्ठलाशी संतांची असते तशी, सलगी आणि भक्ती असे. पेटीऐवजी त्यांनी दुसरे एखादे असे वाद्य घेतले असते की ज्यात खाँसाहेबांच्या गायनाची सारी वैशिष्ट्ये प्रतिबिंबित होण्यासारखी होती, तर त्यांनी खाँसाहेबांच्या गायकीचा पाठपुरावा निखालस केला असता. पण त्यांच्या गायकीची वैशिष्ट्ये ज्यात सामावू शकत नाहीत अशा पेटीसारख्या वाद्यात ती व्यक्त करण्याचा अट्टहास धरण्यासारखे गोविंदराव तारतम्यहीन नव्हते. उथळ सपाट ताटात दूध नेण्याचा आग्रह काय कामाचा? हे ते जाणत असल्याने त्यांनी आपला मोहरा बुवांच्या ललितसुंदर गायकीकडे वळविला; आणि तिचा रंग जमविला. जे चांगले दिसले ते सारे पेटीत कोंबण्याचा आग्रह न धरल्यामुळे गोविंदरावांच्या तारतम्याबरोबरच त्यांची औचित्यपूर्ण सौंदर्यदृष्टीही प्रकट झाली. क्वचित ते जयपुरी—गायकीची चीज वाजवीतही, पण तिच्या रंगतीत प्रामुख्याने आणि कौशल्याने ढंग असे तो बुवांच्या गायकीचा. त्यामुळे या दोहोंच्या संमिश्रमोडीने होणारा आविष्कार मनोहर होई. गोविंदरावांचा ठुंबरीचा ढंग हा तर खास बुवांचा आणि त्यांनी स्वतः ठिकठिकाणाहून पैदा केलेल्या जातीचा असे. पदे ही त्यांची स्वतःची आणि लोकप्रिय झालेली अशी इतरही होती. खाँसाहेबांच्या गायकीत ठुंबरीचे वावडे होते हे माहीतच आहे. मराठी पदांशी त्या गायकीचा संबंध नव्हता, हे सांगण्याची आवश्यकता नाही. तेव्हा खाँसाहेबांच्या मिश्र लयीच्या तेढ्या गायकीला गोविंदरावांच्या पेटीत कसा आपसूख छेद मिळत गेला ते आता यावरून सहज लक्षात येण्यासारखे आहे. म्हणजे गायनाचा आविष्कार हा त्यांच्या पेटीवादनाचा मूलाधार खरा, पण हे गायन बुवांच्या ढंगाचे होते. त्यांच्या पेटीवादनात इतका मोहकपणा येण्याचे हे एक कारण असले पाहिजे.

आपल्याला साधारणतः न पटणारे पण गोविंदरावांना प्रिय असलेले असे त्यांचे काही सिद्धान्त असत. उदाहरणार्थ, व्यायाम! शारीरिक व्यायामाचे महत्त्व त्यांना जन्मात कधी पटले नाही. मजा म्हणून ते फिरायला जात,—व्यायामासाठी नव्हे! तरुणपणी क्रिकेट, टेनिस हे त्यांचे आवडते खेळ होते. पण उत्तर आयुष्यांत व्यायामाविषयी त्यांना अगदीच अरुची असे. व्यायामासाठी खेळायला जाणे त्यांना आवडत नसे. गाढ साखरझोपेतून

उठायचे, लोकांनाहि आपल्या चहासाठी उठवायचे, आपल्यासाठी राबवायाचे, टेनिसची रॅकेट फिरवीत कुडकुडत लांब जायचे, काही सेट खेळून घामटे निघाले म्हणजे जाड टॉवेलने घाम पुशीत घरी यायचे आणि धापा टाकीत 'हाश्श हुश्श' करीत आरामखुर्चीवर लेटायचे, म्हणजे कोण असंस्कृतपणा! लोकांना पैसे आणि कष्ट देऊन स्वतःला दमवून घ्यायचे, असेच त्यांना वाटे आणि त्याची ते यथेच्छ टर करीत. ते स्पष्टच म्हणत की, "माणसाला व्यायामाइतकी निसर्गविरुद्ध गोष्ट दुसरी कोणतीच नसेल! वाघसिंह कुठे व्यायाम करितात?" गोविंदरावांच्या या भूमिकेत आपल्याला परिहास वाटेल, पण ते मात्र हे मनापासून म्हणत. गंमत अशी की, त्यांना शारीरिक व्यायाम नको होता, पण व्यायामाचे जे दुसरे भाऊबंद उद्योग, रियाझ, नाटकाची तालीम, यांच्याशी त्यांची जिगर दोस्ती होती. गाणे गुणगुणणे, लेख अथवा पुस्तक लिहिणे यांचा त्यांनी कधी कंटाळा केला नाही. आणि पूर्वायुष्यांत त्यांनी पेटीची मेहनत किती केली त्याची 'संगीतव्यासंगां'त ग्वाही आहे. यामुळे त्यांनी खूप लिहिले, खूप वाजविले; आणि ते चांगले लिहिले, चांगले वाजविले. या मेहनतीने त्यांच्या हातात विलक्षण प्रसन्नपणा आणि निर्मळपणा आला होता. त्यात पुन्हा ही मेहनत साक्षेपी होती; निवडून—पाखडून केलेली होती. त्यामुळे त्यांच्या वादनात इतरामध्ये आढळतो तसा पेटीच्या सूरपट्ट्यांचा 'कट कट-कट' असा आवाज होत नसे. श्रुतिपेटीवर त्यांची अनेक सप्तकी तान हलक्या हाताने भरारत चालली म्हणजे पारिजातकाच्या फुलांचा हलकासा, शुभ्र-केशरी सडा भोवताली पडतोसे वाटे. पेटीवादनात करंगळी वापरू नये असा दंडक आहे. पण गोविंदराव आपली लांब सडक करंगळीही अगदी खुशाल वापरीत. एकदा त्यांना मी "तुम्ही वादनात करंगळी का वापरता? इतर लोक ती वापरीत नाहीत," असे विचारिले. तेव्हा त्यांनी म्हटले, "का वापरू नको? माझी करंगळी पट्टीला सहज पोहोचते हे एक, अंगठा हे सर्वात तोकडे बोट असताही आपण तो वापरतो हे दुसरे; आणि पेटीच्या रंगदेवतेसाठी काहीही करायला हरकत नाही हे तिसरे." कलावंत कसा एकाच वेळी रंजक आणि भंजक असतो, त्याचे हे निदर्शन आहे. साध्यसाधनाचा विवेकहि यात दिसून येतो.

ते गायन पेटीत वाजवीत असे म्हणण्यापेक्षा पेटीला ते गायनाच्या दर्जाकडे नेऊ पाहत, असे म्हणणे योग्य होईल. खास पेटी असल्यावाचून ते कधी वाजवायला बसले नाहीत. अशा खास दर्जाचे स्वर देणाऱ्या पेटीवर ते भाता भरभरून एखाद्या स्वरावर ठरले म्हणजे ज्योत लागल्यासारखे वाटे. पेटीमध्ये ते वारादेखील फार कसबाने घेत असत. वारा भरून घेतल्याशिवाय पेटी बोलत नाही हे सा रि ग म करणाऱ्याला-नवथरालाही माहीत आहे; पण तो वारा किती, कसा आणि कोणत्या स्वराला भरून घ्यावा हे गोविंदरावांकडून शिकावे. पेटीत वारा घेत तेही कसबाने, थांबत तेही कसबाने आणि पुढच्या स्वराचा मजेदार इशारा देत तोही कौशल्याने. गायनातली अंगे आणि पेटीचे सामर्थ्य यांचा मेळ घालण्याचा त्यांचा प्रयत्न सतत चालू असे. प्रथम चीज वाजवून झाल्यावर ते आलापचारीसाठी एखाद्या प्रमुख स्वरावर थांबून मींडीचा तीन-चार स्वरांच्या साहाय्याने भास उत्पन्न करीत. हा प्रकार इतरांच्या पेटीवादनात नसेच म्हटले तरी चालेल. चीज वाजविताना जर ती आपल्या परिचयाची असली, तर तीतल्या शब्दोच्चारांचा कमानदारपणादेखील आपल्या प्रत्ययाला येई. ठुंबरी असली, तर तिचे श्वास-निःश्वास, थांबण्याच्या भावमय जागा, उपजा, स्वरवेलींमध्ये गुफिलेले ठुंबरीचे शब्द यांमुळे वातावरण सौम्य माधुर्याने भरून जाई. खाँसाहेबाची चीज आणि त्यांचा एखादा अनवट राग असला

तर सूर्यापासून घेतलेला प्रकाश चंद्र शीतल करून देतो, त्याप्रमाणे तो राग आणि ती तेढीबाकी गायकी नमवून ते मृदु करून सोडीत. गाण्यात आणि साहित्यात ते अल्लादिया खाँचे भाष्यकार होते. आणि खाँ–साहेबांच्या गायकीविषयी डोळस अभिमान आणि अनोखी सौंदर्यदृष्टी उत्पन्न करण्याला थोड्या प्रमाणात गोविंदरावांचे वादन आणि पुष्कळ प्रमाणात त्यांचे लेखन कारणीभूत झाले. काही वेळापूर्वी सांगितले त्याप्रमाणे स्वतःचे गाणे हा त्यांच्या पेटीवादनाचा कच्चा माल होता. त्यामुळे त्यांची पेटी ही निवळ पेटी अशी कधीच राहिली नाही. ती कस्तुरीची पेटी बनली! वादन चालू असता केलेल्या मेहनतीचा निष्कर्ष दाखविण्यापेक्षा कलापूर्ण आकाराच्या निर्मितीची त्यांना पराकाष्ठेची जाणीव होती. आणि त्या आकाराला डंख पोहोचेल, अशा रीतीने त्यांचा हात कधी पडत नसे. या कलामय संयमामुळे मैफलीवर त्यांचा सतत काबू राहत असे. देशी, विलासखानी, तिलककामोद, यमन, सिंदुरा, बिहागडा, मुलतानी इत्यादि राग आणि 'किति किति सांगू तुला', 'उगिच का कांता', 'मितभाषिणी', 'दे हाता या शरणागता' इत्यादि पदे त्यांच्या पेटीतून ऐकणे म्हणजे खरोखर एक पर्वणी होती. 'सौभद्र' नाटकातले 'किति किति सांगू तुला' या पदामधून तर सुभद्रेची साक्षात मूर्ति आणि तिची मनोव्यथा ते साकार करीत असत. सुभद्रेच्या असहाय जीवनातल्या सुखदुःखांचा, आर्ततेचा, हळहळीचा सगळा कडूगोड काला मूर्तिमंत उभा करून ते श्रोत्यांना मोहून टाकीत. अशा वेळी त्यांच्या वादनामध्ये ऱ्हस्वदीर्घांचे उच्चारदेखील कधी इकडचे तिकडे ढळले नाहीत. 'आपण किती प्रकारांनी आपले दुःख सांगावे? आपल्याला रात्रंदिवस कसे चैन म्हणून पडत नाही!' ही सुभद्रेची व्यथा व्यक्त करण्यासाठी ते 'किति किति सांगू तुला' ही ओळ तऱ्हेतऱ्हेने घोळवीत असत. त्या वेळी 'किति' यामधली शेवटची 'ती' दीर्घ होत असे; बरीच दीर्घ होई. कधी ती आणखी वळणवेलांटी घेऊन 'किती ऽऽऽ' अशी लांबचलांब होई. कधीकधी 'किति' यामधली 'ति' ऱ्हस्वच राहून तिच्या पुढे ते 'किति–ग ऽऽऽ' असा दीर्घ 'ग'–चा गोड भास निर्माण करीत. 'हे बंधू नव्हत' यातली भावना व्यक्त करिताना भात्यात खूप वारा घेऊन ते एकदम अधिक्षेप अथवा धिक्कार व्यक्त करीत, आणि मग 'मम वैरी खरे' याच्या वेळी तशीच तुच्छता दाखवीत. या सर्व वेळी लयीचे आणि हाताचे पेटीवरचे प्रवास वेगवेगळे होत;—कधी हलके, कधी जोरदार. 'सांगू तुला' यात 'तुला' याच्यानंतर बहुविध बोलउपजांचा ते स्वरमय बगीचा फुलवीत, आणि 'सां ऽऽ गू तुला' यांची जुळणी घेऊन हलकेच चोरपावलांनी समेला मिळत. या बोलउपजा नुसत्याच चमत्कृतिपूर्ण नसत. त्या उपजा त्या–त्या भावनेशी एकरूप झालेल्या असत. त्यांचे सौंदर्य स्वरमयतेत आणि भावमयतेत असे. एकाच वेळी दुहेरी असे. बालगंधर्वांच्या पदात ज्याप्रमाणे वाक्ये त्यातल्या भावनांना अनुसरूनच पूर्ण होत आणि स्वर हे शब्दांना बिलगत असत, त्याप्रमाणे गोविंदरावांच्याही पदात वाक्ये भलतीकडे तुटत नसत. हे संभाळण्यासाठी त्यांना काही स्वराकार दूर ठेवावे लागत आणि लयकारीचे कामहि बेताने करावे लागे. निवडीच्या या तारतम्यामुळे कोणाला त्यात लयकारी नाही, कोणाला त्यात स्वरगुंफण नाही, असे वाटले तर त्याला उपाय नव्हता. पण शब्दोच्चारांची इतकी तबियत संभाळणारा, स्वररचनेचे तारतम्य ठेवणारा, श्रोत्यांची कदर करणारा आणि त्याचबरोबर आपल्या कलेची बूज राखणारा पेटीवादक दुर्मिळ आहे, यांत शंका नाही.

अभिजात संगीताची मुरवण, वादनामधली सफाई आणि संयम यांमधून गोविंद-

रावांच्या नवस्वररचनेचा जन्म झाला. या तिन्ही गोष्टी त्यांच्या बाबतीत एकजीव होत्या. त्यांच्या पद्यरचना समर्पक झाल्या किंवा बोलपटातल्या आरंभीच्या चाली सुंदर पडल्या याचे कारण झाले तरी हेच होते. ' हे चंद्र-मौलि उदारा ', ' विधितनये शारदे ', ' मितभाषिणी ', ' दे हाता या ', ' रामरंगि रंगले ', ' कुसुमांजली वाहिली ', ' प्रेम-सेवा शरण ', ' प्रेम हे नितान्त तुझे केवि वानु मी अबला ', ' चंद्रिका ही जणू ' यातल्या काही पदांना त्यांनी स्वरांचे परिवेष दिले, तर काही त्यांनीच स्वतः रचिली आणि त्यांना स्वररचनाही बहाल केल्या. त्यांच्या ' महाश्वेता ' या स्वरनाट्यातलीही काही पदे अशाच योग्यतेची आहेत.आता ज्यांचा उल्लेख केला, त्यांतली कित्येक पदे गवयांच्या मैफलींची भूषणे होऊन राहिलेली आहेत, आणि त्यांवर कित्येकांनी आपली कीर्तिमंदिरे उभारिली आहेत. या कीर्तिमंदिरांच्या वैभवातला गोविंदरावांच्या स्वररचनेचा वाटा नाकारता येणार नाही.

गोविंदरावांची विपुल साहित्यनिर्मिती ही गौण नसली, तरी एक आनुषंगिक गोष्ट आहे. मूळचे ते संगीतकार; किंवा जुन्या परिभाषेने बोलावयाचे म्हणजे ' वाग्गेयकार '. कलाकाराचा जो पिंड त्यांना लाभला होता, त्यामधून त्यांच्या साहित्याचा पुलोरा फुललेला होता. गुलाबाच्या झाडाला एकाच डहाळीवर दोन रंगांची फुले यावी त्याप्रमाणे त्यांचे साहित्य हे संगीत आणि नाट्य यांमधून जन्मले आहे. गोविंदरावांना साहित्याची रुची प्रथमपासून होती, पण पोक्त वयांत त्यांना त्याविषयी खास उद्योग करण्याइतका जिव्हाळा वाटू लागला. ' संगीतव्यासंगा 'तील त्यांची उन्मादक व्यक्तिमत्ता ही मूळ संगीतसाधनेमधूनच जन्म पावलेली आहे, आणि गोविंदरावांना प्रतीत झालेली संगीताची सर्व सुंदर दुनिया त्यात आकाराला आलेली आहे. संगीताचा इतका विविध संपन्न अनुभव घेतलेली आणि त्याचा जवळून आणि बारकाईने इतिहास पाहिलेली व्यक्ती मिळणे दुरापास्तच आहे. ' रत्नाकर ' मासिकातले त्यांचे गोहरजान, भास्करबुवा यांच्यावरचे लेख म्हणजे संगीताच्या अशा आस्वादक वाङ्मयाची गंगोत्रीच होत. गोविंदरावांचे व्यक्तिमत्त्व हे ' माझा संगीतव्यासंग ' यात अत्यंत भरघोसपणाने प्रकट झालेले आहे. संगीताचा त्यात विविध अंगांनी आणि सौंदर्यात्मक दृष्टीने परामर्श आहे. हा परामर्श विपुलतने, नावीन्याने आणि हर्षाने नटलेला आहे. त्यात माधुर्य आहे; तरलता आहे; सूक्ष्मता आहे; कल्पनाशीलता आहे. चंद्रिका आणि जलविहाराचे मादकत्व आणि जलविहाराची शीतलता त्यांत ओसंडून राहिली आहे.

गोविंदरावांचे साहित्य म्हणजे नाट्य आणि संगीत यांची एक लोभसवाणी किनार आहे. त्यात उपरोध, उपहास, मिस्कीलपणा, कडवटपणा, उग्रपणा हेही व्यंजनगुण प्रकट वृत्तपत्रीय स्वरूपाचेदेखील उतरले आहे. या सर्वांचे एक मुख्य कारण असे आहे की, जुने आदर्श ते विसरू शकत नाहीत. त्यालाही मोठीशी हरकत नाही. पण त्यामुळे त्यांनी नव्याचा निर्लेप मनाने विचार केला नाही, आणि पुरेसा विचार केला नाही. त्यांच्या व्यक्तिमत्वांत जुन्याची एक भिंत आडवून येते. नाट्यसंगीताविषयी कोणी काही खारटतुरट बोलला, तर ते त्यांना सोसत नव्हते. गोविंदराव हे आपल्या काळाचे फळ होते. त्यांची अभिरुची रेखीव आणि चांगली होती. म्हणून जेव्हा त्यांना मंडूकाचे जग विशाल झालेले दिसे, मंडूकांचे डोळे लोक हरिणासारखे मानितात असे आढळले, मंडूकांचे गाणे गोड मानून घेतात असे ते पाहत आणि उंटाला सौष्ठवाबद्दल बक्षीस मिळते असे ते अनुभवीत, तेव्हा त्यांना तीव्र दुःख होई. पण असे मंडूक, असे उंट सर्वच काळात असतात, याची त्यांनी जाणीव ठेविली असती तर समतोलपणा आला असता. इतके असले

तरी समृद्ध कलेचा गौरव करिताना ते चोरून लिहीत नसत हे गोहरजान, भास्करबुवा, भाऊराव कोल्हटकर यांच्याविषयीच्या त्यांच्या लेखांमधून स्पष्ट दिसते. त्यानी शास्त्रीय संगीताला धक्का लाविला नाही, पण ललित संगीताला शास्त्राचे लंगरही अडकावून दिले नाहीत. नाट्यकलेविषयीच्या त्यांच्या अनेक कल्पना तत्त्वांवर किंवा उपपत्तीवर आधारलेल्या नसून ' सौभद्र ', ' शारदा ', ' मृच्छकटिक ', ' भाऊराव ' ' गणपतराव जोशी ' यांसारख्या केवळ आदर्शांवर आधारिलेल्या होत्या. त्यामुळे नवनाट्याच्या निर्मितीची आगामी दिशा दाखविण्याला या कल्पनांचा आज उपयोग नाही. आदर्शांच्या या लंगरांमधून गोविंदराव हे सहसा बाहेर पडले नाहीत. त्यामुळे या आदर्शांचे अनुकरण अथवा अनुसरण करावे, हा त्यांच्या लेखनाचा टोका झाला आहे. गोविंदरावांची विचारसरणी स्थूल मानाने अशी होती. ' अहो, जे नाट्य जुन्या काळी निर्माण झाले त्याचे केवळ शिरपेच आपल्यापर्यंत येऊन पोहोचले आहेत. त्यांच्या अस्सल जोषजल्लोषाची केवळ धुकट कल्पना काय ती आपल्याला आहे. आजचे सर्व नाट्य स्थूल, पसरट, हलके, सवंग, पाणचट, चरबट आहे. पीठ कालविलेले हे पांढरे पाणी आपण धारोष्ण दूध म्हणून मोठ्या चविष्टपणाने पीत आहो; आणि त्याने आपल्या अंगात तकवा आणि अंगावर तजेला येईल अशी वेडी आशा आपल्याला झुलवीत आहे. ' ही विचारसरणी ऐकिल्यावर आपण गप्प राहतो. मनातल्या मनात चुळबुळतो. भाऊराव, गणपतराव या आदर्शांना आपण मानही लववितो. आणि गोविंदरावांना दिसणार नाही, अशा बेताने नापसंतीची मान हलवितो ! गोविंदराव धूर्त होते. ते हेही ओळखीत असत. पण आपले सोडीत नसत.

संगीताबद्दलही त्यांच्या विचारसरणीचा काही भाग अशाच स्वरूपाचा आहे. राग आणि रस, राग आणि भावना, स्वर आणि भावना, नाटक आणि संगीत यांच्या विषयीच्या त्यांच्या विचारात चिकित्सेपेक्षा वकिलीच वाटते. त्यात केवळ फेरमांडणी आहे. तीत या समस्यांचा तलस्पर्श आढळत नाही. त्याचप्रमाणे अल्लादियाखाँच्या चरित्रात मोघूबाईचे गाणे हे खाँसाहेबांच्या गायकीपासून तोडून काढण्याचा जो त्यांनी प्रयत्न केला आहे तोहि वृथा आहे, हे बाईचे गाणे ऐकणाऱ्या कोणाही समजदार श्रोत्याला जाणवेल. मग त्यांनी हे असे का केले ?—त्याला आपल्यापाशी उत्तर नाही. गोविंदरावांच्या ठिकाणी काही पेच होते, ते कसे सोडवावयाचे, ते अंतरंगस्थालाच कळण्यासारखे होते.

काही असले तरी जुन्या नाट्यादर्शांची गोविंदरावांनी इमानदारीने राखण केली. संगीताची जिद्दीने रखवाली केली. त्याचा वारसा त्यांनी फारसा ठेविला नाही, हे दुर्दैव आहे. तनाइतीसाठी जे घराणे प्रसिद्ध त्याचे समर्थक असूनहि गोविंदरावांनी तानबाजीवर सतत प्रहार केले. ही विसंगती नव्हती. मार्मिकता होती. विद्यमान संगीतांतली कारणहीन तानबाजी म्हणजे गळेबाजी, असे त्यांचे मत होते. कारण तीत मांडणीचा अभाव आहे. सरगमीवरही त्यांनी टीका केली. योजनाहीनता त्यांना आवडत नसे. पण गवयांची कुचेष्टा मात्र त्यांनी कधी खपवून घेतली नाही. गवयांच्या बाबतीतला शिक्षणाचा अभाव, व्यसनाधीनपणा, संकुचितपणा, विक्षिप्तपणा, विद्येबद्दलचा कंजूषपणा, आत्मकेंद्रितता असे दोषही त्यांनी पोटात घातले आहेत. कारण त्यांची संगीताबद्दलची ईर्ष्या आणि श्रद्धा जबर होती. त्याचमुळे ' संगीताचे मराठीकरण ' आणि ' संगीतातील नवमतवाद ' हे दोन वाद ते शेलारमामाच्या हिरिरीने लढले. अशाच नाट्यविषयक ईर्ष्येमुळे त्यांनी ' मृच्छकटिका 'बद्दलही खळखळून वाद घातला. या दोन प्रकारच्या वादांनी आत्तापर्यंत सांगितलेले त्यांचे मूलभूत श्रद्धेचे ध्रुवबिंदु पुन्हा एकदा प्रकट झाले.

मित्र हो, गोविंदराव हे अनेक विषयांत पहिले होते;—निदान कालक्रमाने होतेच. नाटकातले पहिले ख्याली गायन, पहिला बोलपट, पेटीचे पहिले वादनकार, संगीताचे पहिले सौंदर्यमीमांसक, आणि स्वरनाट्याचे पहिले प्रवर्तक.महाराष्ट्राला एका परीने त्यांनीच प्रथम पेटीवादन ऐकविले. पानाला चुना लावण्यापासून पटविहागाची अथवा त्रिवेणीची चर्चा करण्यापर्यंत, किंवा ' शारदा ' नाटकाचे ' रीति ' सौष्ठव विवरून सांगण्यापासून ' आंबळयांच्या शाळे 'च्या परीक्षणापर्यंत ज्यांची सौंदर्यदृष्टि जागती होती; आयुष्याच्या सायंकाळच्या सावल्यातहि जे कधी विसावले नाहीत; ज्यांच्या सहवासाने उमाप आनंद व्हावा; त्यांच्याशी चर्चा केल्याचा अभिमान बाळगावा; मैफलीत आल्यावर ज्यांच्यामुळे मैफलीची शान वाढावी; ते स्वतःबद्दल प्रायः अबोल राहणारे गोविंदराव जाऊन आज कितीतरी वर्षे झाली; पण त्यांचा कलानंद आणि साहित्यानंद आजही स्मृतीमध्ये अवीट आहे.

# १९६१ सालचे कन्नड साहित्य विहंगमावलोकन

गोविंदमूर्ति देसाई

गेल्या दशकात कन्नड साहित्याला जणू महापूर आल्यासारखे दिसत होते. पण या दशकाच्या प्रारंभीच हा पूर ओसरल्यासारखा झाला आहे. साहित्य म्हणताना प्रथमतः कादंबरीचा विचार सुचतो. साहित्यज्ञाला कादंबरीसृष्टीचेच प्रथमतः दर्शन घडते. ही सृष्टी वाढत विकसत चाललेली असली तरी या वाढीत किंवा विकासात तिचे सौंदर्य हळूहळू लोप पावत चालल्याचा संशय चिकित्सक टीकाकारांना येतो. निसर्गाची वाढ कोणी मुद्दाम करीत नसतो. तो आपोआप वाढत जातो आणि त्या वाढीत एक प्रकारचे नित्य नूतन सौंदर्य सहजतेने प्रकट होत असते. अशा प्रकारच्या सौंदर्याचा आढळ आपल्या साहित्यसृष्टीतही दिसून यायला हवा. साहित्य जणू घरच्या अंगणात लावलेली वेल ! ही वेल योग्य प्रकारे जोपासली गेली नाही, तिला खतपाणी योग्य प्रकारे योग्य वेळी दिले गेले नाही तर तिचे प्राकृतिक सौंदर्य नष्ट झाल्याशिवाय राहणार नाही. कन्नड कादंबरीसाहित्यात अशा प्रकारे सौंदर्यहानीचा प्रसंग आता आल्यासारखे वाटते.

१९६१ साली इतर साहित्य-प्रकारांपेक्षा कादंबरी विपुल प्रमाणात प्रकाशित झाली. कुमार यांची ' कुगुतिवे कल्लुगळु ', श्री. नवगिरि नंद यांची ' गेद्ददेण्णु ', या कृती १९६१ सालातील सामाजिक कादंबऱ्यात प्रामुख्याने आढळतील. या सामाजिक कादंबऱ्या बहुतांशी परंपरागत स्वरूपाच्या उतरल्या असल्याने चिकित्सक वाचकांना त्यात फारसे नावीन्य आढळून येत नाही. बंगाली किंवा मराठी कादंबऱ्यात दिसून येणारे नवे नवे

श्री. ' तरासु ' यांची ' शिल्पश्री ', श्री. बेटगेरी कृष्णशर्मा यांची ' मल्लिकार्जुन ', श्री. ' मैसूरी ' यांची ' संचिय होन्नम्म ', श्री. श्रीनिवास कोरटी यांची ' म्हैसूर हुली ', श्री. ' विश्वामित्र ' यांची ' अभयाराणी ', यांचा समावेश ऐतिहासिक आणि चरित्र–विषयक कादंबऱ्यांत होईल.

श्री. भैरवप्पा यांची ' धर्मश्री ', श्री. ' अ. न. कृ. ' यांची ' कागदद हू ', श्री. पुराणिक यांची ' कोन्नार किंकिणी ', श्री. बिरादार यांची ' बेळाकिनडाकि ', श्री. मसळी यांची ' नरकदल्लि नंदादीप ', श्री. देवेंद्र

प्रयोग कन्नड साहित्यात करण्याची वेळ अद्याप आलेली दिसत नाही. काही काही ठराविक कादंबरीकार गेल्या. दहाबारा वर्षात अक्षरशः शेकडो कादंबऱ्या ठराविक ठशाच्या खरडीत चालले आहेत. त्यामुळे त्यांच्या या कलाकृती एकाच साच्याच्या गणपती-प्रमाणे एकसारख्या आणि वैशिष्ट्यहीन दिसणे स्वाभाविकच. तरीपण श्री. बेटगेरी यांची ' मल्लिकार्जुन ' ही कादंबरी वैशिष्ट्यपूर्ण उतरली असून ती या सालातील श्रेष्ठ कन्नड कादंबरी असे म्हणता येईल. या कलाकृतीत विजयनगरच्या इतिहासाचे आदर्श व सजीव चित्रण झालेले आहे. कादंबरीचे नांव ' मल्लिकार्जुन ' असले तरी तिच्यात प्रभावी चित्रण चंदलांबिकेचेच झाले आहे. युवराज वीर विजयकुमार ह्याच्याशी विवाहबद्ध होऊन सम्राज्ञीपदावर बसण्याची महत्त्वाकांक्षा असलेली ही चंदलांबिका युवराजाच्या अकाली मरणाने विकल झाली. तिने आपले हृदय युवराजाला अर्पिले होते. त्यामुळे इतर कोणाशीही विवाह करण्याचा आग्रह झाला तरी ही क्षत्रियकन्या आपल्या कृतनिश्चयापासून ढळली नाही. ती आपल्या आईवडिलांच्या आग्रहालाही बळी पडली नाही. साम्राज्याचा हितशत्रु विरुपाक्षराय याच्या अपेक्षेला किंवा दुसऱ्यालाही तिने भीक घातली नाही. तिच्या जीवनात एकच आशा उरली होती ती म्हणजे आपल्या प्रियकराच्या बांधवांचे कल्याण साधावयाचे, प्रियकराचा भाऊ मल्लिकार्जुन याचा डोळ्यात तेल घालून ती प्रतिपाळ करीत होती. तो राजपदावर बसावा अशी तिची इच्छा. या इच्छापूर्तीच्या मार्गावर अनेक संकटे होती. त्यांच्यापासून मल्लिकार्जुनाचा बचाव करण्यासाठी ही त्याच्या मागे सतत राहिली. तिच्या साहाय्यामुळे तो अनेक संकटातून पार पडला. शेवटी रणसंग्रामात त्याच्या छातीत घुसणारा भाला तिच्याच छातीत घुसला, तरीपण गुलबुर्गाच्या सुलतानाचा पाडाव होऊन मल्लिकार्जुनाचा जय झाल्याची वार्ता कानी पडेपर्यंत तिच्या कुडीत जीव होता. आपल्या प्रियकराच्या भावाचा शेवटी विजय झाल्याची आनंददायक वार्ता ऐकून तिला धन्य वाटले आणि याच धन्यभावनेत तिचे प्राण विसर्जन झाले. चंदलांबिकेचे उदात्त जीवन हाच या कादंबरीचा आशय. या जीवनचित्राला ऐतिहासिक पार्श्वभूमीची सुयोग्य जोड देऊन श्री. बेटगेरी यांनी त्यांत चांगल्या तऱ्हेने रसरंग भरलेले आहेत.

त्याचप्रमाणे श्री. 'तरासु' यांची ' शिल्पश्री ' हीही एक गेल्या सालची एक ऐतिहासिक कादंबरी श्रेष्ठ कलाकृतीत गणली जाईल. श्रवणबेळगोळा येथील गोमटेश्वराची प्रतिष्ठापना करणाऱ्या चावुंडरायाची कथा या कादंबरीत गुंफण्यात आलेली आहे. ऐतिहासिक आधार या कादंबरीला थोडासाच असला तरी कथानकात रसपरिपोष उत्कृष्ट झाला आहे.

वंग साहित्यातून तसेच महाराष्ट्र साहित्यातून अनेक कलाकृतींचा अनुवाद कन्नड साहित्यात झालेला आहे. गेल्या वर्षी एका चांगल्या मराठी कादंबरीचा अवतार कन्नड वाङ्मयात झाला. श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांची ' भंगलेले देऊळ ' ही ती कादंबरी होय. कर्नाटकाचे सुप्रसिद्ध कादंबरीकार व विमर्शक श्री. श्रीरंग यांनी या कादंबरीचा अनुवाद केला आहे. ' भंगलेले देऊळ ' ही एका मानिनीची आत्मकथा आहे. विवाहसंस्थेची उपयुक्तता आता संपुष्टात आलेली आहे अशा आशयाचे दारुण चित्र या मानिनीने आपल्या जीवनकथेतून परिणामकारक रीतीने रंगविलेले आहे. मराठी वाचकांना श्री. माडखोलकरांची ही कादंबरी सुपरिचित असल्याने तिच्या कथानकाची पुनरुक्ति येथे करण्याचे कारण नाही. मात्र या कादंबरीचे महत्त्व कर्नाटकातील स्त्रीजीवनाच्या दृष्टीने विशेष उल्लेखनीय वाटते. महाराष्ट्रातल्या सामाजिक जीवनात स्त्री ही जेवढी पुढे आलेली दिसते तितकी अद्याप कर्नाटकात आलेली नाही. पण कर्नाटकातदेखील आता स्त्रियांचा सामाजिक विकास हळू-

हळू होत चालला आहे. विकसित स्त्री-जीवनात निर्माण होणाऱ्या समस्यांचे या कादंबरीत घडून येणारे दर्शन कन्नड वाचकांना अभिनव व विचाराई खचित वाटेल. अशा प्रकारची कादंबरी अद्याप कन्नड वाङ्मयात नव्हती.

गेल्या सालची सर्वोत्कृष्ट कादंबरी म्हणून म्हैसूर सरकारच्या बहुमानास पात्र झालेली ' कूगुतिवे कल्लुगलु ' ही कादंबरी एक सामान्य कलाकृति आहे. प्रथमार्ध कंटाळवाणा झाला असून उत्तरार्धात थोडीशी उत्कंठा वाचकांना वाटेल तेवढीच.

यानंतर काव्याकडे वळून पाहता तेथेही अमाप पीक आलेले दिसते. श्रीमती सुमित्रा यांची ' काव्यकावेरी ', श्री. कैय्यार यांची ' पुनर्नवा ', श्री. राजशेखर यांची 'रुद्राक्षी', श्री. राघवेंद्र गिरी यांचा ' क्षितिजकोदंड ', श्री. द. रा. बेंद्रे यांचा १९६१ सालचा नवा कवितासंग्रह ' मुगिलिन मल्लिगे ', श्री. परमेश्वर भट्ट यांनी अनुवादलेले ' भर्तृहरीचे शतकत्रय ' श्री. सण्ण गुड्डय यांची ' अभीष्ट ' इत्यादि काव्यकुसुमे कन्नड साहित्याच्या बागेत गेल्या वर्षी फुलली. श्री. कणवी यांच्यासारख्या जुन्या कवींच्या काव्याची पुनर्मुद्रणेही गेल्या साली प्रकाशात आली.

कन्नड काव्यप्रपंच आमच्या परंपरेप्रमाणे आपली स्वप्ने आणि कलाधने राखून आहे. याचा प्रत्यय गेल्या सालीही आला. म्हैसूर सरकारने गेल्या सालची श्रेष्ठ काव्यपुस्तके म्हणून तीन काव्यसंग्रहांना पारितोषिके दिली आहेत. त्यात ' पुनर्नवा ' या संग्रहाचा समावेश असून त्यातल्या बावीस कवितात देशभाषा, देशप्रेम वगैरे भावना ओतप्रोत भरलेल्या आहेत. उपनिषदांपासून स्फूर्ति घेतलेल्या काही कविताही त्यांत असून गोवा स्वतंत्र होण्यापूर्वीच्या तेथील जीवनाविषयी लिहिलेल्या कविता विशेष उल्लेखनीय वाटतात. असे असले तरी संप्रदायाची चाकोरी सोडीत नाही असे दिसते. नवीन विषयाकडे ओढ कमी.

श्रीमती सुमित्रा यांच्या ' काव्यकावेरी 'त तेहतीस काव्यसुमनांची माळ गुंफलेली आहे. दुष्काळ, कारावास इत्यादिकांचे अनुभव आहेत. आठवणींनी भरलेले हृदय आहे—त्यात मधुर भावना सरळ सुंदर भाषेत व्यक्त झाल्या आहेत, या कवयित्रीच्या हातून भावी काळात उज्ज्वल कार्य घडेल अशी आशा वाटते.

श्री. बेंद्रे यांचे 'मुगिल मल्लिगे' ( आकाशमोगरा ) हे एक सुवासिक पुष्प आहे. देशात सर्वत्र साजरा होणाऱ्या रवींद्रनाथ टागोर यांच्या शताब्दीनिमित्त उत्स्फूर्त होऊन श्री. बेंद्रे यांनी अनेक सुंदर कवितांची रचना केलेली आहे. या संग्रहांत कवी रवींद्र यांनी कर्नाटकातील कारवार या रम्य स्थळाला भेट दिली त्या प्रसंगावर आधारलेले एक छोटे रूपक आहे. सिद्ध कवींचे काव्यसत्त्व जणू या कवितासंग्रहांत उमटले आहे असे वाटते. ' कवितुंबि रवितुंबि ' या कवनात भावाविष्कार परिपूर्ण झाला आहे.

> कोंकोंकु छंदवे बंध।
> इदक्किल्ल अनर्थद गंधा
> इदुकट्टिदल्लि नूतु
> मुत्तु इट्टहांगे बंदवु मातु
> तमगे तावे सोतु

( वाकड्या वाकड्या छंदांचे बंध असले तरी अनर्थाचा गंध नाही. याची रचना करताना जणू मुक्ताहार आपोआपच बांधला गेला.) असे सांगून कवी आपले आत्मनिरीक्षण आपणच करतो. चिंचेचे झाड म्हातारे झाले तरी चिंचेचा आंबटपणा कमी होत नाही अशा आशयाची कन्नड भाषेत एक म्हण आहे. त्याप्रमाणे श्री. बेंद्रे यांच्या काव्यांतले सत्त्वहि कधी कमी होणार नाही असेच म्हणता येईल. वयाच्या परिपक्वतेबरोबरच त्यांचे काव्यफळही अधिकाधिक पक्व होत चालल्याची साक्ष हा संग्रह खचित देईल.

कथासंग्रहाबाबत सांगायचे तर मनाला संकोच वाटतो. अलीकडे कथासंग्रहांची संख्याही कमीकमी होत चालली आहे. नियतकालिकात प्रसिद्ध झालेल्या गोष्टी वाचल्यानंतर

त्याच पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाल्यावर वाचक वाचणार नाहीत या कल्पनेने जणू प्रकाशकांना ग्रासलेले दिसते. तरी पण गेल्या वर्षी श्री. भारतीसुत यांचा 'चिंच दिडिद मीन', श्री. अश्वत्थ यांची 'जयंती,' श्री. रा. सु. मणी यांचा 'अस्वीकृत' वगैरे कथासंग्रह निघाले, ते उल्लेखनीय वाटतात. कथाक्षेत्रातहि बंगाली किंवा मराठीप्रमाणे नवे प्रयोग करण्याचा उपक्रम कन्नड वाङ्मयात दिसून येत नाही. डायजेस्ट पद्धतीच्या मासिकात भिन्न आणि अन्य भाषांतील उल्लेखनीय कथांचे अनुवाद कानडीत प्रसिद्ध होत असतात. तुलनात्मक रीतीने पाहता पंजाबी, मराठी किंवा अन्य देशी भाषांतील कथांच्या दर्जाला साजेशी स्वतंत्र कन्नड कथा निर्माण अद्याप होत नाही असे म्हणणे भाग आहे.

कन्नड नाटकांनी गेल्या साली कथांचाच मार्ग अवलंबिला आहे असे म्हणता येईल. श्रीरंग, पर्वतवाणी यांच्यासारखे समर्थ नाटककार कर्नाटकात आहेत. एन. के. (कुलकर्णी) यांच्यासारखे विनोदी नाटके लिहिणारे श्रेष्ठ लेखकही आहेत. तरीपण अलीकडे या नाटककारांकडून नवीन नाट्यकृती निर्माण झालेल्या नाहीत. श्री. सी. के. वेंकटरामय्या यांची 'उभय भारती' श्री. शांतरस यांचे 'सत्य स्नेही', श्री. गिरीश कर्नाड यांचा 'ययाति', श्रीरंग यांचे 'अमृतरंग', श्री. पर्वतवाणी यांचे 'प्रत्यक्ष प्रमाण' श्री. कृष्णमूर्ती यांचे 'लायर हिकमत' वगैरे नाटके गेल्या वर्षी प्रसिद्ध झाली. श्री. श्रीरंग यांनी आपल्या 'अमृतरंग' नाटकाची रचना एका विदेशी कथेच्या आधारे केली आहे. श्रीरंगाची नाटके प्रेक्षकांना कळत नाहीत असा गैरसमज आहे तो या नाटकाबाबतीतही होईल. विपन्नावस्थेला पोचलेल्या कन्नड रंगभूमीने श्री. श्रीरंगासारख्या मातब्बर नाटककारांकडून रसदार आणि कसदार नाटकाची अपेक्षा करणे साहजिकच आहे. जनजीवनाची नाडी ओळखून जनतेच्या अपेक्षा पूर्ण करणारी नाटके निर्माण करण्याचे आमच्या नाटककारांनी ओळखले पाहिजे. श्री. पर्वतवाणी यांचे 'प्रत्यक्ष प्रमाण' हे नाटक त्यांच्या इतर कलाकृतीप्रमाणे विनोदी आहे. एकुलती एक मुलगी पंकज ही कृष्णमूर्तीवर अनुरक्त होते. तिचे वडीलही त्याच्या कुलाच्या अपेक्षेने तिचे लग्न कोदंडरावांच्या मुलाशी ठरवतात. वडलांचा बेत ऐकून पंकज वाटेत मूर्च्छित पडते. यामुळे शेजारच्या कुटुंबात काही गैरसमज निर्माण होतात. तितक्यात कृष्णमूर्ती तेथे आल्याने हा गैरसमज वाढतच जातो. शेवटी पंकजला कृष्णमूर्तीलाच द्यावयाचा निर्णय ठरतो. कथावस्तु सामान्य असली तरी तिचा नाट्यदृष्ट्या परिपोष चांगला झाला आहे.

इतर साहित्य प्रकार पाहताना गेल्या वर्षी विचारप्रवर्तक साहित्याचा चांगला लाभ कन्नड वाङ्मयाला झाला असे अभिमानाने सांगता येईल. 'मिंचन बळ्ळी' प्रकाशन संस्थेने रामानुजांचे चरित्र प्रसिद्ध केले असून त्यांनीच कै. श्री. लक्ष्मणराव किर्लोस्कर यांच्या मराठी चरित्राचा कानडी अनुवाद प्रसिद्ध केला आहे. बेचाळिसाव्या कन्नड साहित्य संमेलनाच्या चालकांनी 'प्रसाद' नांवाचे प्रकाशन प्रसिद्ध केले असून साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्रो. के. जी. कुंदनगार यांच्यासमवेत डॉ. आर. सी. हिरेमठ यांच्या संपादकत्वाखाली निघालेले 'कुंदण' नावाचे प्रकाशन हे उद्बोधक विचारांनी संपन्न झाले आहे. श्री. के. कृष्णमूर्ति यांचे 'कन्नड ध्वन्यालोक' आणि 'लोचनसार', श्री. बेटगेरी कृष्णशर्मा यांचे 'साहित्यवु सागिरुव दारि' श्री. शिवप्रसाद यांचे 'पूर्व-पश्चिम' श्री. कृष्णराव यांचे 'हरिकथामृतसार' श्री. एस्. अनंतनारायण यांचे 'बाळ गंगाधर टिळक', श्री. अेम्. व्ही. सीतारामय्या यांचे 'जीवननाटक' हे उल्लेखनीय ग्रंथ कन्नड वाङ्मयातील विचार साहित्याला परिपोषक झाले आहेत.

'नडेदु बंदु दारि' या ग्रंथाचा तिसरा व शेवटचा भाग १९६१ साली प्रसिद्ध

झाला. हा ग्रंथ अविस्मरणीय झाला असून विमर्शक वाङ्मयात त्याचा दर्जा बराच वरचा ठरेल. तीन्ही भागांची मिळून पृष्ठसंख्या २१०० आहे. या कृतीचे प्रकाशक श्री. जी. बी. जोशी आणि प्रो. के. बी. कुर्तकोटी हे अभिनंदनास प्रात्र आहेत. या तिसऱ्या भागात श्री. आनंदकंद यांचा 'मल्लिकार्जुन', श्री. दिनकर देसाई यांचे 'नाकंड पडुवण' (प्रवासवर्णन) व वेगवेगळ्या प्रबंधकारांचे प्रबंध प्रसिद्ध झाले आहेत. याऱ्याच बरोबर श्री. कुर्तकोटी यांचा ऐतिहासिक प्रबंध हे समालोचन देण्यात आले आहे. इतके व्यापक समालोचन आजपर्यंत कन्नड भाषेत कोणी केले नव्हते. श्री. कुर्तकोटी यांचा व्यासंग वाखाणण्यासारखा आहे.

आपल्या प्रबंधांत श्री. कुर्तकोटी यांनी काही जणांवर पूर्वग्रहदूषित टीका केलेली दिसते असा गैरसमज पसरवण्यात येतो पण त्यात विशेष तथ्य नाही. 'नडेदु बंद दारि' या ग्रंथाच्या तीन्ही भागात काही प्रातिनिधिक साहित्याचा अंतर्भाग देण्याचे राहून गेलेले आहे येवढीच रास्त टीका त्यावर करण्यासारखी आहे. ज्ञानकोश निर्माण करण्यासारखे हे प्रचंड कार्य श्री. जडभरत (जो. बी. जोशी) यांनी शिराबर घेऊन यशस्वी रीतीने पार पाडले ही कौतुकाची गोष्ट होय. 'नडेदु बंद दारि' (क्रमण केलेला मार्ग) हा साहित्य-प्रांतात चालत आलेल्यांना आणि चालत जाणाऱ्यांना खचित मार्गदर्शक ठरेल.

एकूण कन्नड विचार-विमर्शक साहित्यांत गेल्या साली उत्कृष्ट भर पडलेली आहे. कन्नड साहित्य आपले सत्त्व व सौंदर्य यांचे संवर्धन करीत गेल्यास ते इतर पुढारलेल्या साहित्याच्या दर्जास खचित पोचेल असा विश्वास वाटतो. कन्नड वाङ्मयांत साहित्य नाही असा याचा अर्थ नव्हे. इतर साहित्यापेक्षा मुळात काही कमी मूल्ये कन्नड वाङ्मयात आहेत असा प्रकार मुळीच नाही. पण नव साहित्यनिर्मितीत गुणवत्ता वाढत चालली पाहिजे.

१९६१ झाली प्रसिद्ध झालेल्या सगळ्या कन्नड पुस्तकांचा परामर्श येथे घेण्यात आलेला नाही. तरी पण प्रमुख पुस्तकांचा स्थूल परामर्श देण्यात आलेला आहे. सगळ्या पुस्तकांची यादी देणे व त्यांचा समाचार घेणे या गोष्ठी या छोट्या लेखात साधणे अशक्य. ज्यांचा उल्लेख प्रस्तुत लेखात नाही त्यांनी कृपा करून लेखकाला क्षमा करावी.



# भाषाशास्त्र आणि व्यवहार : (कोकणीच्या संदर्भात)

—ना. गो. कालेलकर

कोकणीच्या प्रश्नात भाषाशास्त्रज्ञ मार्गदर्शन करू शकतील असे पुष्कळांना वाटते. शास्त्र या शब्दाचा अर्थ आणि शास्त्र या विषयाच्या मर्यादा लक्षात घेतल्या तरच हे मार्गदर्शन कशा स्वरूपाचे असेल याची कल्पना येईल.

उदाहरणार्थ, तर्कशास्त्र हेही एक शास्त्र आहे. काही प्रश्नांची उत्तरे तर्कशास्त्राच्या दृष्टीने बिनतोड देता येतील. हिंदु-मुसलमानांचे पटत नाही तर दोघांनी वेगळे रहावे हे तर्कनिष्ठ उत्तर आहे. पण अशा प्रकारचे उत्तर प्रत्यक्ष व्यवहारात आणताना काय अडचणी उभ्या राहतील याकडे हा शास्त्रज्ञ लक्ष देत नाही. दोन भावांनी वेगळी बिऱ्हाडे करण्याइतके हे सोपे नाही. इतिहास, परंपरा आणि भावना यांनी निर्माण केलेल्या अड-

चणी व प्रश्न केवळ तर्काने सुटत नाहीत, हे प्रत्यक्ष अनुभवाने सिद्ध होऊ शकते.

अशा प्रकारच्या अडचणी सामाजिक प्रश्नांचा निकाल लावताना उभ्या राहतात. या प्रश्नांचा आणि समाजजीवनाच्या विविध अंगांचा अभ्यास करणारी वेगवेगळी शास्त्रे आहेत. ही शास्त्रे आणि निसर्गजीवनाचा अभ्यास करणारी शास्त्रे यात फरक आहे. पहिली सामाजिक शास्त्रे आहेत. त्यातले सिद्धान्त समाजजीवनातल्या सवयी, मानवी जीवनातल्या सवयी यांच्या अभ्यासावर आधारलेले असतात, स्थलकालसापेक्ष असतात. तर निसर्गजीवनाचा अभ्यास करून काढलेले सिद्धान्त स्थलकालनिरपेक्ष असतात. सामाजिक शास्त्रे जीवनातल्या अखंड परिवर्तनक्षम घटनांचा अभ्यास करतात, त्यांचे वर्णन करतात, त्यांचा इतिहास लिहितात. नैसर्गिक शास्त्रे निसर्गचमत्कार म्हणून मानल्या जाणाऱ्या घटनांमागील अखंड परिवर्तनातील विकारग्राह्य नियम शोधून काढतात. समाजशास्त्रज्ञ मानवी जीवन कुठे कशा प्रकारचे आहे, अमुक काळी, अमुक देशात कशा प्रकारचे होते, ह्याची माहिती देते, तर निसर्गशास्त्रज्ञ अमुक परिस्थितीत काय घडून येईल, काय घडते, हे सांगतो. समाज-शास्त्रज्ञाला तसे सांगता येणार नाही. तसे त्याने सांगितले तर ते त्याचे वैयक्तिक मत होईल. व्यक्तिनिरपेक्ष सिद्धान्त होणार नाही.

समाजजीवनात परंपरा आणि व्यक्तीच्या भावना यांचे फार मोठे स्थान आहे. परंपरेच्या अभिमानातून आणि लोकांना काय वाटते यातून या भावनांचे दर्शन आपल्याला घडते. अमुक एक गोष्ट अनिष्ट आहे असे एखाद्या व्यक्तीला पटले तरी लोकांना ते पटवून देणे ही गोष्ट सोपी नाही. हा प्रश्न मतपरिवर्तनाचा आहे. वस्तुतः हे कठीण नसावे. बदलणाऱ्या परिस्थितीचे ज्ञान हे प्रगतीचा मार्ग दाखवणारे असते, पण ही प्रगती करताना जुने टाकून द्यावे लागते. भावनांवर मात करावी लागते. ती लोकांच्या उपदेशापेक्षा स्वतःच्या अनुभवानेच अधिक लवकर करता येण्याची शक्यता असते. दुसऱ्याच्या भावनांच्या विचार करण्याची ताकदही या अनुभवानेच येऊ शकते.

समाजजीवनाचा सूक्ष्म अभ्यास केलेला शास्त्रज्ञ स्वतःच नेतृत्व करू लागला तर तो शास्त्रज्ञाच्या म्हणजे निरपेक्ष अभ्यासकाच्या भूमिकेवर राहू शकणार नाही. आणि त्यामुळे त्याचा अभ्यास आणि संशोधन निरपेक्ष दृष्टिकोणातून होणार नाही. त्याने फार तर आपल्या ज्ञानाच्या प्रकाशाने समाजधुरीणांना आणि सत्तावंतांना सामाजिक प्रश्नांचे स्वरूप स्पष्ट करून दाखवावे.

भाषाशास्त्रज्ञ हा अशाच शास्त्रज्ञांपैकी एक आहे.

* * *

कोणत्याही भाषेचे वर्णन करणे ही फार कठीण गोष्ट नाही. मृत भाषा, अपरिचित भाषा किंवा समृद्ध भाषा यांचा अभ्यास सुसंस्कृत समाजात फार प्राचीन काळापासून चालत आलेला आहे आणि आपल्या देशात तर भाषावर्णनाच्या शास्त्राची, म्हणजे व्याकरणशास्त्राची परंपरा फार जुनी असून या शास्त्राला फार मान दिला जात असे. एखाद्या माणसाला व्याकरण येते, त्याचे व्याकरण पक्के आहे, असे समजताच त्याच्याबद्दल आदर, निदान दरारा तरी उत्पन्न होत असे. बरोबरच आहे. अशा माणसाशी फार जपून बोलायला पाहिजे, डोळ्यात तेल घालून लिहिले पाहिजे. तो कुठे तुमच्या उच्चाराचीच चूक काढेल, कुठे रूपच चुकीचे आहे, शब्दच चुकीचा वापरला आहे असे दाखवून देईल.

इतका दरारा आज राहिलेला नाही, याचे कारण ठराविकपणेच लिहिणाऱ्या आणि पुस्तकी बोलणाऱ्या विद्वानांचा भाषा हा मक्ता राहिलेला नाही. समाजाच्या अंतर्गत विविधतेप्रमाणे, त्याच्या प्रवृत्तीचे वाहन

जी भाषा तिचेही विविधत्व आता दिसून आलेले आहे. वस्तुस्थितीचे यथार्थ चित्र रेखाटणारे संशोधन सामाजिक शास्त्रांच्या प्रगतीला अपरिहार्य आहे, याची जाणीव आता अभ्यासकांना झालेली आहे.

समाजजीवनाचे अंग, विनिमयाचे साधन, संस्कृति साठवून ठेवणारे भांडार, इत्यादि अनेक कारणांनी भाषा ही एक अव्वल दर्जाची सामाजिक संस्था आहे, हे दिसून येते. भाषेबद्दल वाटणारी आत्मीयता ही नेहमी अनुभवाला येणारी गोष्ट आहे. आपली भाषा बोलणारे लोक परदेशात भेटले म्हणजे किती आनंद होतो याचा अनुभव अनेकांना असेल. तर ज्याची भाषा आपल्याला कळत नाही, त्याबद्दल बेफिकिरी किंवा उदासीनता वाटणे हेही स्वाभाविक आहे. आपलीच भाषा आपल्यापेक्षा वेगळ्या रीतीने वापरणाऱ्या, म्हणजे बोलीचा उपयोग करणाऱ्या लोकांची उपेक्षा, टिंगल आणि अवहेलना या गोष्टी तर अजून आपल्या डोळ्यांसमोर घडत आहेत.

वस्तुतः ज्यांना आपण आपल्या समाजाचे घटक समजतो, जे समाज आपल्या राष्ट्राचे अविभाज्य घटक आहेत असे मानतो, त्यांच्याशी आपणाला विनिमय करता आला पाहिजे, दळणवळण चालू ठेवता आले पाहिजे. कारण हा विनिमय आणि हे दळणवळण ही एकराष्ट्रीयत्वाची एक महत्त्वाची अट आहे. सर्वांनी राष्ट्रीय वृत्तीचा अंगीकार करावा हे म्हणणे ठीक आहे; पण अज्ञानामुळे किंवा अपुऱ्या दळणवळणामुळे बाजूला पडलेल्या लोकांची गत काय ? जोपर्यंत राष्ट्रात काय चालले आहे, हे त्यांच्यापर्यंत पोचत नाही, राष्ट्रीय जीवनाशी त्यांना समरस होता येत नाही, राष्ट्रातील इतर नागरिकाप्रमाणेच आपणही आहोत असा विश्वास उत्पन्न होत नाही, तोपर्यंत केवळ एका राजकीय सत्तेखाली असलेल्या लोकात एकराष्ट्रीयत्वाची भावना दृढमूल होणे कठीण आहे. सामाजिक आणि आर्थिक समानता आणि सर्वांशी विनिमय करता येण्याची सुलभता यांना ही गोष्ट अधिकाधिक साध्य होत जाईल.

या दृष्टीने आपल्याकडे चाललेला प्रचार अगदी उलट्या दिशेने चाललेला आहे. सार्वत्रिक विनिमयासाठी हिंदी भाषेचा वापर व्हावा या तत्त्वाला ज्यांचा पाठिंबा आहे असे हिंदी मातृभाषा असणारे आणि ऐतिहासिक कारणामुळे हिंदी फार प्रयास न करता समजू आणि बोलू शकणारे संस्कृतोद्भव भाषा बोलणारे लोक बाजूला ठेवूनच हिंदीला विरोध करणाऱ्या लोकांचा विचार केला पाहिजे. राष्ट्राभिमानाचा मक्ता काही हिंदी बोलणाऱ्या आणि हिंदीचा पुरस्कार करणाऱ्या लोकांनाच दिलेला नाही. पण अशा प्रकारची वृत्ती ठेवून हिंदी प्रसाराची मोहीम बऱ्याच लोकांनी चालवल्यामुळे राष्ट्रीय हिताच्या दृष्टीने अत्यावश्यक अशा एका विनिमयसाधनाचा, म्हणजे हिंदीचा, प्रसार मंदावला आहे आणि हिंदीचा मध्यवर्ती कारभारांत स्वीकार अधिअधिक लांबणीवर पडत आहे.

आपण ज्यांची उपेक्षा करतो असे अन्यभाषिक समाज केवळ उपेक्षितच राहिले, तर ही चूक आपल्या लक्षात येताच ती दुरुस्त करून तिचे परिमार्जन करता येईल. पण आता तसे राहिलेले नाही. आपल्या धर्माचा प्रसार आणि प्रचार कुठे होईल याच्या मागावर असलेल्या परधर्मोपदेशकांनी, असे समाजही आपल्या चळवळीची केंद्रे बनवली आहेत. या उपेक्षितांची भाषा शिकून, त्यांना धर्मोपदेश करून, शिकवून आणि नोकऱ्या देऊन, त्यांची अनेक प्रकारे सेवा करून, त्यांच्यावर या प्रचारकांनी उपकारांचे एवढे ओझे टाकलेले आहे की धर्मगुरुशी इमानदार असणे हे या लोकांच्या दृष्टीने त्यांचे आद्य कर्तव्य ठरते. नागाप्रदेशात चाललेला गोंधळ, हा बाहेरच्या सहानुभूतीने आणि मदतीने अधिक तीव्र बनलेला आहे. त्यांच्याशी विनिमय करण्याचे भाषिक ज्ञान मिळवावे, अशी धडपड आता कुठे सुरू होत आहे. त्यांनी ख्रिस्ती धर्मो-

पदेशकांचे नेतृत्व मान्य केले आहे. कारण मागासलेल्या जमाती, वन्य जाती, आणि दळणवळणही होऊ शकणार नाही अशा ठिकाणी पसरलेले मानवसमाज यांच्यात जाऊन या धर्मोपदेशकांनी त्यांच्या भाषेचा अभ्यास केला, व्याकरणे लिहिली, शब्दकोश तयार केले.

हे सर्व विवेचन करण्याचे कारण एवढेच की कोणत्याही समाजाच्या जवळ येऊन त्याचा स्नेहभाव आणि विश्वास संपादन करण्यासाठी प्रथम त्याच्या भाषेचे ज्ञान असावे लागते. लोकजागृति किंवा लोकमत तयार करणे या लोकशाहीच्या मूलभूत तत्त्वासाठी लोकांच्या, म्हणजे ठिकठिकाणी विखुरलेल्या आणि भिन्न भाषा, भिन्न बोली वापरणाऱ्या, भिन्न संस्कृति असणाऱ्या, लहानमोठ्या सर्व समाजांच्या जवळ आपणांला जाता आले पाहिजे. त्यांचे विनिमय-साधन आणि त्यांच्या भावना ज्यांच्याशी एकरूप झाल्या आहेत अशा त्यांच्या परंपरा समजाजून घेतल्या पाहिजेत.

आज आपल्या राष्ट्रात निर्माण झालेली परिस्थिति फार परस्परविरोधी स्वरूपाच्या घटकांनी बनलेली आहे. भौतिक साधने आणि शास्त्रीय प्रगतीचा जीवन सुसह्य करण्याकडे उपयोग या दृष्टीने सर्व भारतीयच काय, पण जगातले सर्व लोक परस्परांच्या जवळजवळ येत चालले आहेत. उलट आपण ज्यांच्याबरोबर एकत्र राहाणार आहोत ते भाषिक बहुसंख्य, जातिक बहुसंख्य, धार्मिक बहुसंख्य आपल्या विशिष्ट संस्कृतीचा घात तर करणार नाहीत ना, असा अविश्वास आणि संशय या देशात आणि इतरत्र बऱ्याच ठिकाणी वाढीला लागलेला दिसत आहे.

अशा परिस्थितीत अगदी अल्पसंख्य लोकांच्या भाषा, पोटभाषा, बोली नीट शिकून त्यांच्याशी संपर्क साधणे किती महत्त्वाचे आहे ते दिसून येईल. लोकांना योग्य मार्गदर्शन करण्यासाठीही हे अत्यंत आवश्यक आहे.

भारतीय संविधानाने चौदा प्रमुख भाषांचा निर्देश केलेला आहे. या सर्व भाषा आर्य व द्रविड वंशातल्या आहेत. पण याशिवाय दोन वंशांतल्या भाषा या देशात बोलल्या जातात, एक मुंड किंवा आस्ट्रो-एशियाटिक आणि दुसरा सिनो-तिबेटन किंवा तिबेटो-बर्मन. या दोन भाषांनी व्यापलेला प्रदेश बिहारपासून पूर्वेकडे भारताच्या सीमेपर्यंत पसरलेला आहे. अत्यंत डोंगराळ प्रदेशात राहून खडतर जीवन कंठणारे हे लोक, आपल्यापासून इतक्या दीर्घकाळपर्यंत दूर राहिले आहेत की त्यांना आत्मसात् करून घेणे सोपे नाही. शिवाय धर्मप्रसारकांच्या हाती जाऊन त्यांना एक वेगळी दृष्टी प्राप्त झाली आहे. तिला आपण फुटीर किंवा अराष्ट्रीय वृत्ति म्हणू, पण ती निर्माण होण्याची जबाबदारी पूर्णपणे आपल्यावर आहे. राष्ट्रीयत्व ही कल्पना समजायला आणि आचरणात आणायला फार कठीण आहे. तिचा प्रत्यय येण्यासाठी कुटुंब, जात, धर्म आणि भाषा यांच्या पलीकडे जावे लागते. म्हणजेच या वर्तुळात राहिल्यामुळे वर्तुळाबाहेरच्या लोकांबद्दल जे पूर्वग्रह असतात ते टाकून द्यावे लागतात. या प्रकारे विचार केला तर आपल्यापैकी तरी किती जणांना ही कल्पना समजली आहे आणि ती आचरणात आणण्याचा नैतिक दर्जा प्राप्त झाला आहे, याबद्दल मन साशंकच होते.

शिवाय राष्ट्र या कल्पनेचे स्वरूपही ठाम नाही. पहिल्या महायुद्धाच्या शेवटी प्रेसिडेंट विल्सन याने स्वयंनिर्णयाचे तत्त्व लागू केले; पण तत्त्वतः गोंडस दिसणारे हे बाळ व्यवहारात किती अनर्थकारक ठरले हे इतिहासाने दाखवून दिले आहे. स्वयंनिर्णय ही एक तात्त्विक भूमिका आहे, पण व्यवहारासाठी तिच्या मर्यादा नक्की न केल्यामुळे ती हानिकारक ठरली.

महायुद्धानंतर हे तत्त्व युरोपातील देशांना लागू केले आणि त्याच्या आधारावर अनेक लहानलहान राष्ट्रे निर्माण झाली. ती सर्व एकभाषिकत्वाच्या तत्त्वावर आधारलेली होती असे दिसून आले. पण अशी भिन्नभाषिक

राष्ट्रे निर्माण करणे सोपे नव्हते. याचे सर्वात महत्त्वाचे कारण हे की भाषांना काही नैसर्गिक मर्यादा नसतात. विशेषतः एकमेकांशेजारी असणाऱ्या दोन संबंधित म्हणजे एकवंशीय भाषातली एक कुठे संपते आणि दुसरी कुठे सुरू होते हे भाषाशास्त्रज्ञही सांगू शकणार नाहीत. कारण या दोहीतले संक्रमण हे इतके संथ आणि स्वाभाविक असते की एक रेषा काढून तिच्या एका बाजूला पहिली आणि दुसऱ्या बाजूला दुसरी भाषा बोलली जाते असे म्हणता येणार नाही. फ्रेंच भाषाशास्त्रज्ञ आंत्वान मेये यांच्या मते हा प्रश्न सरहद्दीवरच्या लोकांचा कौल घेऊन त्यांच्या भावना अजमावूनच सोडवला पाहिजे. उदाहरणार्थ, खानदेशीसारखी संक्रमक भाषा मराठीतच समाविष्ट होते याचे कारण आपण महाराष्ट्रीय आहोत ही तिथल्या लोकांची दृढ भावना. त्यामुळेच ती गुजरातीची पोटभाषा आहे या ग्रिअर्सनच्या मताला किंमत रहात नाही. उलट डांगसारख्या प्रदेशातल्या भाषेचे स्वरूप संक्रमक असले तरीही स्वतःच्या प्रादेशिकत्वाविषयी मत बनवण्याइतकी जागृति तिथल्या जनतेत नसल्यामुळे हा प्रश्न राजकर्त्यांनी स्वतःच्या मतानुसार सोडवला आहे. या निर्णयामुळे काही पिढ्यांनंतर ही गुजरातीचीच पोटभाषा समजली गेली तर नवल नाही.

कोणतीही बोली एखाद्या भाषेची पोटभाषा आहे की काय हे ठरवणे वाटते तितके सोपे नाही. या प्रश्नाच्या उत्तरासाठी अनेक पर्याय सांगण्यात येतील. त्या सर्वात परस्पर आकलन हा मुद्दा महत्त्वाचा आहे. दोन बोली जर अशा असल्या की त्यातली एक बोली बोलणाराला दुसरी बोली पूर्वाभ्यास नसताही विनायास बव्हंशी समजली तर त्या बोली एकाच भाषेच्या पोटभाषा आहेत असे म्हणता येईल. नुसते शब्द समजून उपयोग नाही. विधानाचा आशय समजला पाहिजे. ही कसोटी लावली तर पुष्कळशा मराठी बोलीसुद्धा, म्हणजे ज्या बोलींना आपण मराठी या सदरात दाखल केल्या आहेत, त्यासुद्धा, परभाषाच ठरतील. यामुळे बिचकून जाण्याचे कारण नाही. हिंदू असूनही अस्पृश्य अशा जाती ज्याप्रमाणे आपल्या समाजात आहेत, त्याप्रमाणे मराठी ही चिट्ठी कपाळावर असलेल्या बोलीहि आपल्या प्रदेशात आहेत. सामाजिक उपेक्षेचा हा एक भाषिक नमुना आहे. त्या बोलींचे ज्ञान मिळविणे आणि त्या ज्ञानाचा विनिमयासाठी आणि लोकजागृतीसाठी उपयोग करणे हे आपले काम आहे.

कोकणी ही मराठीची पोटभाषा आहे की स्वतंत्र भाषा आहे हा प्रश्नही मी आतापर्यंत जे म्हणालो ते लक्षात घेऊन सोडवा सुटला तर.

आधी कोकणीच्या व्याप्तीबद्दल महाराष्ट्रीय सामान्य जनतेच्या कल्पना पहा. पुष्कळांना वाटते, मराठी नाकात बोलले की झाली कोकणी. किंवा कोकणात बोलली जाते ती कोकणी. सध्या चालू असलेल्या वादाच्या संदर्भात गोव्यात बोलली जाणारी ती कोकणी.

या सर्व कोकणी एकच आहेत का?

एक गोष्ट ठामपणे म्हणता येईल. कोकणी, मग ती या सर्वांपैकी कुठचीही असो ही एक आर्यवंशीय, म्हणजे संस्कृतोद्भव भाषा आहे. मराठीप्रमाणेच ती अतिपश्चिमेकडली आहे आणि मराठीहूनही अधिक दक्षिणेला पसरली आहे. मराठीवर जसे फारशी आणि इंग्रजीचे दीर्घ आणि दृढ संस्कार झालेले आहेत, त्याचप्रमाणे कोकणीवर, विशेषतः अतिदक्षिणेकडील कोकणीवर, कानडी आणि पोर्तुगीज यांचा ठसा उमटला आहे. कोणत्याही भाषेचे वर्णन तिच्यातले ध्वनि, तिच्यातली रूपसिद्धी आणि तिचा शब्दसंग्रह यांच्या साह्याने होऊ शकते. स्वरांच्या बाबतीत कोकणी ही मराठीहून थोडीशी भिन्न, व्यंजनांच्या बाबतीत पूर्ण

साम्य असलेली, रूपसिद्धीत मराठीहून किंचित् वेगळी पण इतर कोणत्याही आर्य-भाषेपेक्षा मराठीला अधिक जवळची आणि शब्दसंग्रहाच्या बाबतीतहि पुष्कळच वेगळी अशी आहे. तिचा अभ्यास खिस्ती मिश-नऱ्यानी केला, तिची व्याकरणे खिस्ती मिश-नऱ्यांनी रचली, तिच्यात बायबलचे भाषांतर केले आणि भक्तिगीते रचली.

हे सगळे धर्मांतरित लोकांसाठी केले, पण केले. आज अनेक सुशिक्षित हिंदूंनाही कोकणीचा लेखनात, शिक्षणात उपयोग करावासा वाटतो. त्याने कोकणी बोलीला मानाचे स्थान मिळेल, तिची जोपासना होईल आणि मराठीचे कोणतेहि नुकसान होणार नाही.

भाषाशास्त्रदृष्ट्या कोकणी ही मराठीपासून पुष्कळच भिन्न आहे. जर गुजराती किंवा हिंदी या वेगळ्या भाषा असतील, तर कोकणी ही वेगळी भाषाच आहे. कोकणी म्हणजे गोव्यापासून कारवारपर्यंत पसरलेल्या कोकणी बोली.

एवढी वर्णनात्मक माहिती भाषाशास्त्रज्ञ देऊ शकेल. भाषाशास्त्रज्ञाचे किंवा सामा-जिक शास्त्रांचा अभ्यास करणाऱ्या इतर शास्त्रज्ञांचे काम प्रश्न सोडवण्याचे नाही, माहिती पुरवण्याचे आहे. प्रश्न सोडवण्याचे काम त्या प्रश्नाशी संबंधित असलेली जनता आणि ती जिच्या आधिपत्याखाली आहे, ती राजकीय सत्ता या दोघांचे आहे. तो सोडवताना केवळ भाषेचे स्वरूप नव्हे तर ती बोलणाऱ्या जनतेच्या भावना, तिचे ऐति-हासिक आणि विशेषतः सांस्कृतिक ऋणानु-बंध यांचा विचार करावा लागेल. राष्ट्र-हिताच्या दृष्टीने काय हितावह आहे ते राज्यकर्त्यांनी, राजकीय आणि सामाजिक नेत्यांनी, सर्व प्रकारची माहिती मिळवून ठरवायचे आहे. भाषाशास्त्रज्ञ त्यांना फक्त एकाच प्रकारची माहिती पुरवू शकेल. अमुक भाषा वेगळी आहे की नाही याचे तो दिग्दर्शन करू शकेल; पण गोवा महारा-ष्ट्रात समाविष्ट करावा, स्वतंत्र ठेवावा की इतर कोणत्या प्रदेशात सामील करावा यावर त्याने दिलेले मत हे त्याचे वैयक्तिक मत होईल. भाषिक वर्गीकरण करायचे झाले तर तो कर्नाटकात जाऊ शकणार नाही हेही तो म्हणू शकेल. कारण तसे त्याला शास्त्रीय भूमिकेवरून सांगता येईल.

आकाशवाणीच्या मुंबई केंद्रावरून कोकणी कार्यक्रम प्रसारित होतात. कोकणी न येणारे किती महाराष्ट्रीय लोक ते ऐकतात ते मला माहीत नाही. पण आपल्याला कोकणी येते की नाही हे अजमावण्यासाठी त्याचा उप-योग होईल. आपणा सर्वांना गोव्याबद्दल जिव्हाळा वाटतो ही फार समाधानाची गोष्ट आहे. पण केवळ वर्तमानपत्र वाचून मते बनविण्यापेक्षा आणि वाद निर्माण करण्या-पेक्षा कोकणी शिकू या. निदान कोकणी माणसाला कोकणीतून 'तू आमच्यापैकीच आहेस' इतके सांगण्याइतपत तरी शिकू या. मग त्याला कदाचित आपल्या अधिक जवळ यावेसे वाटेल. हाच आपला खरा विजय ठरेल.



# पदनामकोश : काही विचार—

– मराठी माणूस

महाराष्ट्र सरकारचा राज्यकारभार पूर्णपणे मराठीतून चालू करण्याच्या स्वागतार्ह धोरणाचा पहिला टप्पा म्हणून ' भाषा सल्लागार मंडळा 'ने तयार केलेल्या ' पदनामकोशा 'कडे बोट दाखवता येईल. मराठीकरण, किंवा प्रादेशिक संस्कृतीच्या आविष्कारासाठी उपयोगात आणल्या जाणाऱ्या भाषिक साधनाला महाराष्ट्राच्या सरकारी कारभारात अग्रमान देणे, ही गोष्ट स्वाभाविक आहे. तिच्यासाठी मुद्दाम चळवळ करण्याची किंवा भांडण्याची जरूर नाही असे पुष्कळ लोकांना वाटेल; पण वस्तुस्थिति मात्र निराळीच आहे. मराठी ही इंग्रजीइतकी प्रभावी रीतीने व्यवहारोपयोगी होणे शक्य नाही असे म्हणणारा एक पक्ष, तर राष्ट्रहिताच्या दृष्टीने हिंदीचाच वापर सर्वत्र ( राज्यव्यवहाराचे साधन म्हणून किंवा विद्यापीठाचे माध्यम म्हणून ) व्हावा असे म्हणणारा दुसरा पक्ष, असे दोन पक्ष या मराठीकरणाच्या विरुद्ध आहेत. इंग्रजी गेली तर राज्यकारभार विस्कळीत होईल, अर्थबोध नीट होणार नाही, गोंधळ उत्पन्न होऊन अनर्थ उद्भवेल, या भीतीने ग्रासलेला, मराठीच्या अंगी कितपत कुवत आहे, किंवा आणता येईल याचा अंदाज घ्यायलाही तयार नसलेला पहिला पक्ष. यात उच्च अधिकारीवर्ग, परप्रांतीय ' पाहुणे, ' कन्व्हेंटमध्ये मुलांना पाठवून त्यांना इंग्रजी फाडफाड बोलता येते, पण मराठी नीट येत नाही असे कौतुकाभिमाने म्हणणारा आणि या इंग्रजीच्या ज्ञानावर आपल्या मुलांचे शिक्षण निकोप होऊन त्यांना नोकरीत भराभर बढती मिळेल किंवा परदेशी शिष्यवृत्ति मिळायला अडचण पडणार नाही एवढीच धाव असणारा उच्च मध्यमवर्गीय, यांचा समावेश होतो. दुसऱ्या पक्षाच्या मते भारताचे भावनात्मक ऐक्य साधायचे असेल तर हिंदीचा वापर वाढला पाहिजे, एकभाषिकत्वाचे खत मिळाले तर एकराष्ट्रीयत्वाची भावना जोराने फोफावेल असा या मंडळींचा भाबडा हिशोब आहे.

इंग्रजीचे ज्ञान भारतीयांना अनेक दृष्टींनी उपकारक ठरलेले आहे, ठरत आहे आणि ठरणार आहे. तरीही प्रादेशिक भाषांच्या क्षेत्रात तिचे स्थान दुय्यमच ठेवले पाहिजे. हवे तर इंग्रजीचा अभ्यास सक्तीचा करावा कारण त्यात आपला फायदाच अधिक होणार आहे. पण केव्हातरी, आज ना उद्या दहा, वीस, पन्नास वर्षांनी का होईना, प्रादेशिक भाषांचा दर्जा इंग्रजीच्या बरोबरीने व्हावा अशी महत्त्वाकांक्षा आपण बाळगणारच नाही का ? आणि ही न्याय्य आकांक्षा जर आपण बाळगत असलो तर आजपासून, या क्षणापासून मराठीला ज्या ज्या क्षेत्रात, ज्या ज्या विषयात तिला प्रथम स्थान देता येईल तिथे तिथे आपण ते दिलेच पाहिजे.

अशी विचारसरणी बाळगणारी व्यक्ति जेव्हा ' पदनामकोश ' उघडून महाराष्ट्राचे मंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांनी त्याला लिहिलेले प्रास्ताविक शब्द वाचते, तेव्हा मराठीच्या उज्ज्वल भवितव्याचे आपले स्वप्न साकार होणार याबद्दल तिच्या मनात कोणताही संदेह उरत नाही.

मुख्यमंत्र्यांची ही प्रस्तावना केवळ स्वप्नाळू वृत्तीच्या माणसाने व्यक्त केलेले सात्त्विक विचार नसून, तिच्यामागे एक जोरदार, नैतिक तत्त्वज्ञानाची भूमिका आहे. लोकशाही समाजवाद हे त्या भूमिकेचे अधिष्ठान आहे. म्हणूनच ठामपणे आणि तर्कशुद्धपणे ते म्हणू शकतात की, " लोकशाहीत **जनतेची भाषा** हीच राजभाषा म्हणून सर्वमान्य ठरली तर

आजचे सचिवालयीन कारभाराचे केंद्रीभूत स्वरूप नष्ट होऊन ग्रामीण स्तरावरील लोकांमध्ये राज्यकारभाराविषयी आत्मीयतेची व विश्वासाची भावना निर्माण होऊ शकेल." राजकीय सत्तेशी आपलाही संबंध कमीअधिक प्रमाणात आहे. किंबहुना आपण व आपले राज्यकर्ते एकच आहोत, ही भावना निर्माण करण्याचे सामर्थ्य जिच्यात आहे ती आपली मराठी भाषा योग्य दिशेने उत्क्रांत होत जावी ही विचारसरणी या धोरणातून आपोआपच प्राप्त होते.

मराठीचे शब्दवैभव या दृष्टीने तपासून पाहण्याची ही संधी आहे. अर्थ व्यक्त करून दाखवण्याची शब्दाची शक्ती अमर्याद आहे. पण परिस्थिती अनुकूल नसेल तर ही शक्ती सुप्तच रहाते. शब्दसंग्रह संपन्न होतो तो केवळ त्याची संख्या फुगीर असते म्हणून नव्हे, तर प्रत्येक शब्दाला जितक्या विविध संदर्भात जितके विविध अर्थ किंवा अर्थच्छटा व्यक्त करण्याची संधी मिळते, जीवनातल्या जितक्या अधिक क्षेत्रात तो वापरला जातो, त्यामुळे. इंग्रजीत एका शब्दाचे तीन, पाच, दहा अर्थसुद्धा आहेत. सामाजिक, राजकीय किंवा अनेक प्रकारचे सांस्कृतिक जीवन किती अर्थपूर्ण आहे याचा हा पुरावा आहे. ही संधी आजपर्यंत मराठीला मिळालेली नाही. गेल्या दीडशे वर्षांत शैक्षणिक, राजकीय आणि सरकारी क्षेत्रात तिला मोकळेपणाने वावरायला न मिळाल्यामुळे तिच्या शब्दांच्या अंगी असलेली अनेकार्थ व्यक्त करण्याची शक्ती पडून राहिलेली आहे. या अपंग, खुरटलेल्या शब्दांना नवचैतन्य देण्याची संधी स्वातंत्र्योत्तर काळात तिला मिळणाऱ्या व्यापक कार्यक्षेत्राच्या अनुषंगाने आपल्याला मिळालेली आहे.

" इंग्रजी भाषेत आजवर रूढ असलेल्या शब्दप्रयोगासाठी **समर्पक, सोपे आणि नेमके पर्याय शोधून वा निर्माण करून** " भाषा सल्लागार मंडळाने या कामी सरकारला मार्गदर्शन करायचे आहे. भाषांतर समर्पक असावे यांत कोणतीच शंका नाही. त्याचप्रमाणे कोणत्याही शब्दासाठी दिलेला पर्याय नेमका असावा म्हणजे तो शब्द उच्चारताच मूळ इंग्रजी शब्द कोणता असेल त्याबद्दल किंवा बोलणाराला नेमके काय सांगायचे आहे, याबद्दल संदेह राहू नये, ही गोष्टदेखील तितकीच खरी आहे. याला फक्त एकच अपवाद आहे आणि तो अगदी नवनिर्मित शब्दांचा. काही कल्पनांचा आपल्या जीवनात एकदीड वर्षांपूर्वी मागमूसही नव्हता, कारण आपली संस्कृति वेगळ्या मार्गाने घडलेली आणि वेगळ्या वैशिष्ट्यांनी बनलेली आहे. पण ऐतिहासिक आवश्यकतेच्या नियमानुसार पाश्चात्त्य समाजजीवनातली हितकारक तत्त्वे आपण प्रचंड प्रमाणावर आत्मसात करत आहोत आणि त्यामुळे त्याला आवश्यक असे भाषिक आविष्कराचे साधन निर्माण करणे अपरिहार्य झालेले आहे. उदाहरणार्थ, ज्ञानदानाच्या क्षेत्रात आपल्या परंपरेप्रमाणे गुरुत्वाची कल्पना उच्च, पवित्र, अविभाज्य आणि दिव्य मानली जात असे. आज वेतनश्रेणीच्या मानदंडाने हे गुरुत्व मापले जात आहे आणि तदनुसार प्रोफेसर, रीडर, लेक्चरर, इत्यादि शब्दांना पर्याय देणे प्राप्त झाले आहे. अशा ठिकाणी पर्याय 'निर्माण करून' किंवा नवनिर्मिति करून पुढे जावे लागते. हीच गोष्ट शास्त्रीय प्रगतीने उपलब्ध करून दिलेल्या रेडिओ, टेलिफोन इ. साधनांच्या बाबतीतही खरी आहे.

पण मी उद्धृत केलेल्या विधानातला सर्वांत महत्त्वाचा शब्द आहे 'सोपे.' भाषा सल्लागार मंडळ विद्वानांचे बनलेले असले तरी त्याने केलेले काम आम जनतेचे आहे. सोपे पर्याय म्हणजे शक्यतोवर सहजासहजी **सर्वांना** समजतील असे पर्याय. अनेक बोली आणि भेद यांनी संपन्न अशी मराठी भाषा ही सर्वांची भाषा आहे. पंडितांची, सुशिक्षितांची, अशिक्षितांची, पांढरपेशा शहरवासियांची, जमिनीशी तद्रूप झालेल्या खेडुतांची, स्त्री-

अनुक्रमणिका

पुरुषांची, आबालवृद्धांची ती भाषा आहे. या सर्वांना जितक्या अधिक प्रमाणात राज्य-कारभाराची ही नवभाषा कळेल तितकी ती अधिक स्वागतार्ह आणि टिकाऊ ठरेल.

आणि हे करण्यासाठी एका विशिष्ट व्यापक मनोवृत्तीची जरूर आहे.

त्या मनोवृत्तीची कल्पना येण्यासाठी ' सोपे ' म्हणजे काय याचा विचार झाला पाहिजे.

सोपे म्हणजे सहज कळणारे. जितका परिचय अधिक तितके आकलन अधिक. भाषेच्या दृष्टीनेच पहायचें झाले तर जे रूढ ते परिचित. रूढ म्हणजे जुने, अंगवळणी पडलेले, स्वाभाविक जिभेच्या टोकावर येणारे. मला जमीन शब्द सहज स्फुरतो, भूमि किंवा भू नाही; सरकार आणि सरकारी या शब्दानी मी माझा व्यवहार करतो, शासन आणि शासकीय या शब्दांनी नव्हे. मी डॉक्टरला डॉक्टर आणि स्टेशनला स्टेशन म्हणतो. फौजदार, छापखाना, तुरुंग, रेडिओ इत्यादि शब्द माझ्याकडून स्वाभाविकपणे उच्चारले जातात आणि माझ्याशी बोलणाऱ्या माणसाला तें सहज समजतात.

अडखळावे लागते ते या स्वाभाविक शब्दांऐवजी पर्याय वापरल्याने. डॉक्टरला चिकित्सक आणि रोग्याला रुग्ण म्हटल्याने मराठीशी समरस झालेल्या शब्दांना कोणत्याही कारणासाठी अशा रीतीनें तडकाफडकी स्थान-भ्रष्ट करणे भाषेच्या विकासाच्या दृष्टीने घातुक आणि हास्यापद ठरेल. जुने शब्दही वापरा-तून जात चालले आहेत ही गोष्ट खरी आहे. उदाहरणार्थ, मास्तर व प्रोफेसर हे शब्द जाऊन त्या जागी गुरुजी व प्राध्यापक बऱ्याच प्रमाणात आले आहेत. पण असा बदल सावकाश घडून येतो. कोणीतरी गुरुजी व प्राध्यापक हे नवा शब्द वापरांत आणायला सुरुवात केली. मास्तर व गुरुजी आणि प्रोफेसर व प्राध्यापक हे शब्द एकदमच वापरले जाऊ लागले आणि हळूहळू गुरुजी व प्राध्यापक या शब्दांचा वापर वाढू लागला. अजूनही मास्तर व प्रोफेसर हे शब्द पूर्णपणे वापरातून गेलेले नाहीत, पण जाण्याची शक्यता आहे. कोणत्याही नव्या शब्दाचा एखाद्या क्षेत्रात प्रवेश, तेथील जुन्या शब्दाशी त्याची स्पर्धा, मग त्यातला एक अधिक मानला जाऊन दुसरा मागे पडणे, ही जी शब्दजीवनातली प्रक्रिया ती या ठिकाणी दिसून येते. कदाचित या स्पर्धेत नव्या शब्दालाच माघार घ्यावी लागणे शक्य आहे. उदाहरणार्थ, रेडिओ किंवा टेलिफोन यासारख्या शब्दांना पर्याय देणे सोपे नाही याचे कारण हे शब्द सुट-सुटीत आहेत आणि सर्वांच्या तोंडी आहेत. एखादी नवी कल्पना येतानाच स्वाभाविक पर्याय घेऊन आली तर तो पर्याय चटकन स्वीकारला जातो. आगगाडी, विमान, सुई, टोचणे, निवडणूक, कायदा, हे अशा प्रकारचे शब्द आहेत. पण वस्तूबरोबर पर्यायही आपण परभाषेतून आयात केला, रेडिओ, टेलिफोन-डॉक्टर इ.– तर मात्र त्याला हुसकावून लावणे सोपे नसते. तसे करणे हे प्रतिगामी मनोवृत्तीचे द्योतक ठरेल. पण अशा प्रकारची मनोवृत्ति या कोशात ठिकठिकाणी डोकावत आहे.

वास्तविक मुख्य मंत्र्यांनीच एका ठिकाणी म्हटले आहे ' संस्कृतप्रमाणेच उर्दू, फारसी कानडी, इंग्रजी अशा विविध भाषातील कित्येक शब्द मराठीने आत्मसात केले म्हणून ते व्यवहारात प्रचलित आहेत. अशा आणि शिवकालीन व तदनंतरच्या राजवटींत आणि संस्थानिक राज्यव्यवहारात वापरात असलेल्या रूढ शब्दांना डावलून त्याऐवजी नवीन शब्द तयार केल्याने भाषेचा समतोलपणा बिघडून तीत कृत्रिमता निर्माण होण्याची शक्यता आहे. सामान्य माणसाला पेलेल, रुचेल आणि नित्याच्या व्यवहारात सहज रूढ होईल अशीच राज्यकारभाची भाषा असणे आवश्यक आहे.'

मुख्यमंत्र्यांच्या या विधानाशी मतभेद असण्याचे कोणालाही कारण नसावे. पण

पदनामकोशातल्या बऱ्याचशा संज्ञा या तत्त्वाला धरून नाहीत; आणि नव्या शब्दांच्या शोधात मंडळाने शिवकालीन, तदनंतरच्या आणि अगदी अलीकडेही संस्थानी कारभारात वापरात असलेल्या कित्येक पर्यायांकडे मुळीच लक्ष दिलेले नाही असे म्हणणे प्राप्त आहे.

मराठी समाजाच्या संस्कृतीचा आणि भाषिक व्यवहाराचा ठसा उमटण्याऐवजी या कोशावर संस्कृत पांडित्याचा ठसा उमटलेला दिसतो. संस्कृतिनिष्ठेऐवजी संस्कृत निष्ठेवर भर देणाऱ्या या विद्वानांना एवढाच इशारा द्यावासा वाटतो की, कोशात उपयोगात आणलेली संस्कृत रूपे पुष्कळदा इंग्रजी शब्दांइतकी सामान्य मराठी माणसाला दुर्बोध आणि अपरिचित आहेत; आयुक्त, निगम, दंडाधिकारी, लेखा, अभियांत्रिक, विद्युत् पारेषण, सर्वेक्षण, प्रभारी, चिकित्सक, अधिष्ठाता इ. अनेक शब्द पुनर्विचार करण्यासारखे आहेत.

काही ठिकाणी सुबोध मराठीचे आल्हाददायक दर्शन या कोशात घडते हे कबूल केले पाहिजे. पाटबंधारे, आवकमाल कारकून, इमारती व दळणवळण मंत्री, कापूसपैदासकार, दूधवाटणी, नायब तहसिलदार, परीट, बांधकाम, छपाई, लोखंडपुरवठा ही काही उदाहरणे आहेत. त्याचप्रमाणे काही संस्कृत पर्यायही सुबोध आहेत. स्वच्छतानिरीक्षक वर्ग, अतिसूक्ष्मरोगाणुशास्त्र विभाग, अनुवाद अधिकारी, अपघात वैद्यकीय अधिकारी, आरोग्यशिक्षणकेंद्र इ. याचे कारण हे की हे शब्द मराठीत रूढ होऊन आता मराठीच बनले आहेत. पण त्याबरोबरच अभि, आयुक्त, निगम, प्रभारी, अभियंता, पोषकार इत्यादि शब्दांतील दुर्बोधता लक्षात घेतली पाहिजे. या दुर्बोधतेचे एक गमक म्हणजे इंग्रजी व संस्कृत उत्तम येणाऱ्या सुशिक्षित माणसालाही इंग्रजीवरून संस्कृत किंवा संस्कृतवरून इंग्रजीकडे जाणे कठीण वाटेल.

पोलीस, मोटार, इंजिन, अपील, रबर, गॅस इ. इंग्रजी शब्द आणि कारकून, महसूल, जिल्हा, जाहिरात, जमाबंदी, इ. फारसी-अरबी शब्द स्वीकारणाऱ्या सल्लागार मंडळाने रूढ मराठी शब्दांचा आधिक धिटाईने आणि जोरदारपणे पुरस्कार करणे आवश्यक होते. तो न केल्यामुळे या मूठभर मराठी प्रतिनिधींना या कोशात मिळालेला प्रवेश हा केवळ समजूत काढण्यापुरता आहे असे वाटू लागते.

तसेच काही ठिकाणी कायम ठेवण्यात आलेले इंग्रजी शब्द किंवा फारसी शब्द बुचकळ्यात टाकतात. प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट यातील मॅजिस्ट्रेटचा बहुसंख्यांना ( बहुसंख्य सुशिक्षित आणि सर्व अशिक्षित यांना ) अपरिचित असलेला दंडाधिकारी हा पर्याय होऊ शकतो, तर प्रेसिडेन्सी याचा पिढ्यान् पिढ्या परिचित असलेला इलाखा हा अनुवाद करायला काय हरकत होती ! एकवेळ मॅजिस्ट्रेट हा शब्द तसाच ठेवला असता तरीही चालण्यासारखे होते, कारण तो सामान्य लोकांच्याही परिचयाचा आहे.

अशा प्रकारच्या कोशावर एकाच शब्दात मत देणे कठीण आहे. त्यात शुद्ध मराठी आणि सुबोध संस्कृत शब्द आहेत, त्यात काही रूढ फारसी व इंग्रजी शब्दांना त्यांच्या जागी चालू ठेवले आहे, पण त्यातल्या बहुसंख्य शब्दांचे बऱ्याच ठिकाणी अनावश्यक असे क्लिष्ट संस्कृतीकरण कायम ठेवणे हे मराठीच्या स्वभावाला न जुळणारे असे आहे. याच विषयावरचे आधीचे साहित्य पाहिले तर या संस्कृतीकरणाच्या प्रवाहाचा उगम आज प्रचारात येऊ पहाणाऱ्या कृत्रिम व बोजड हिंदीच्या अंध अनुकरणात आहे ही गोष्ट स्पष्ट दिसून येते.

मराठीच्या संसारात अशा प्रकारे ढवळाढवळ केल्याने जे भाषिक रूप निर्माण होईल ते नित्यव्यवहाराच्या मराठीपासून इतके दूर जाणार आहे की इंग्रजी जाऊन मराठी राज्यकारभाराची भाषा बनली आहे हे सामान्य

माणसाच्या लक्षातही येणार नाही. लोकव्यवहारातली मराठीच शक्यतोवर राजभाषा म्हणून मिरवली पाहिजे. पण त्यासाठी तिच्या गतीत व्यत्यय येईल अशी संस्कृताची जड झूल आणि न पेलणारे, खुपणारे अलंकार तिच्यावर चढवण्याची गरज नाही. ज्या वेषात ती शेतकऱ्याच्या झोपडीत, गवळ्याच्या गोठ्यात मिरवते, ज्या रूपात ती दळणकांडण करणाऱ्या वहिणाबाईंच्या जिभेवर नाचते, त्याच वेषात, त्याच रूपात ती राजसिंहासनावर विराजमान झाली तर आपली ' मायबोली ' मराठी आहे असे म्हणणाऱ्या कोणाही व्यक्तीला लाज न वाटता सानंद अभिमानच वाटेल.



# नामदेव व तत्सम कवींचे काव्य

– ज. शा. देशपांडे

प्राचीन महान संतकवींपैकी नामदेव हे एक प्रमुख कवी आहेत; परंतु दुर्दैवाने त्यांच्या अधिकृत गाथा मिळत नाहीत व त्यामुळे त्यांच्या नावावर असलेल्या काव्याबद्दल संदेह उत्पन्न होतो. छापील गाथात असलेल्या कविता एकापेक्षा अधिक कवींच्या आहेत असे उघड दिसते. संतचरित्रकार आजगावकरांनी (१) ज्ञानेश्वरकालीन शिंपी नामदेव, (२) बाळक्रीडाकार नामदेव, (३) महानुभावीय नामदेव, (४) नामा पाठक, (५) विष्णुदास नामा व (६) संतचरित्रकार नामदेव असे सहा नामदेव कल्पिले. या सर्वांच्या नावाने उपलब्ध असलेल्या प्रकाशित व विशेषतः अप्रकाशित काव्यांचा आढावा घेऊन आद्य नामदेवांचे काव्य कुठले याबर काही प्रकाश पडतो काय यांचा या लेखात विचार केला आहे.

बाळक्रीडेचे अभंग रसाळ आहेत खरे, पण त्यांची भाषा अर्वाचीन आहे. त्यात बहिरंभट, भानुदास, कान्होपात्रा यांचा उल्लेख येतो. यास्तव हे अभंग आद्य नामदेवांचे नसणार. संतचरित्रातही तसाच प्रकार. संतचरित्रांची भाषा व बाळक्रीडेची भाषा भिन्न वाटते. छापील गाथेत एक ध्रुवचरित्र आहे. 'राजा म्हणे बाळा देतो पंचग्राम। तो म्हणे आत्माराम देतो आहे ॥' व 'चंद्रसूर्य तारा शशी ऋषी थोर। हे ज्या आधारे हिंडताती ॥' इत्यादि ओळी वाचल्यावर उद्धवचिद्घनांच्या ध्रुवाख्यानाची ही नक्कल वाटल्याशिवाय राहणार नाही.

एकनाथपूर्वकालीन असा नामदेवांचा उल्लेख महानुभावीय वाङ्मयात आढळतो. 'एकु दिसु नामदेव सींपा पंडितबासांसि भेटला: चर्चा केली' इत्यादि ओळीत दामोदर पंडितांनी नामदेवांना उपदेश केला व नामदेवांनी 'दिस गेले वायावीण' अशी पदे केल्याचे ही स्मृति (स्मृतिस्थळ २४४) सांगते. हीच हकीगत वृद्धाचारात आहे. दामोदर पंडितांनी उपदेश करण्याला हे नामदेव शिंपी ज्ञानेश्वरकालीनच असणार. वरील पद गाथेत सापडते. मग ज्ञानेश्वर प्रभावळीतले नामदेव व हे नामदेव एकच का निराळे? गोपिराज महाराजांच्या मते दोन्ही एकच. विष्णुदास नाम्याच्या भारताच्या पोथ्या महानुभावीय मठात आढळतात ही गोष्टही लक्षात घेण्याजोगी आहे. या मुद्याबद्दल जास्त माहिती उपलब्ध झाल्याशिवाय निश्चित मत करणे कठीण आहे.

गाथेमध्ये अनेक कवनात कवीचे नाव नामा, विणुदास नामा, नामा विष्णुदास, किंवा नुसते विणुदास असे निरनिराळ्या तऱ्हेचे आढळते. साहाजिकच हे कवी निरनिराळे की काय असा प्रश्न उपस्थित होतो. शुकाख्यानातलि मन्मथ संवत्सराच्या उल्लेखावरून हे आख्यान इ. स. १५९५ मधे लिहिल्याचे कळून येते व सोळाव्या शतकातला हा विष्णुदास नामा आद्यनामदेवापेक्षा निराळा असे निश्चित होते. विष्णुदास नाम्याच्या नावावरील भारत व अन्य काव्ये शुकाख्यानापेक्षा जुनी वाटतात व त्यांची भाषाहि भिन्न आहे. तेव्हा विष्णुदास नामा हे नाव एकापेक्षा अनेक कवींनी वापरले असावे असे दिसते. आद्य नामदेवांनीही ते वापरले असेल.

वरील निरनिराळ्या नावांखाली गाथेतील आख्यानाशिवाय (१) भारत, (२) हरिश्चंद्र पुराण, (३) मूळकासुरवध, (४) एकादशीकथा, (५) बुधनावगी, (६) अनंतव्रत कथा, (७) संतावळी आख्यान अथवा कमळाकर ब्राह्मणाची कथा, (८) तीर्थावळी, (९) हनुमंत भेटि, (१०) कृष्णजन्म आख्यान, (११) कलियुगमाहिमा, (१२) लवकुश कथा, (१३) वस्त्रहरण प्रकरण व (१४) कपोताख्यान इतक्या आख्यानांचा उल्लेख

अनुक्रमणिका

आढळतो. ही बहुतेक अप्रकाशित आहेत व त्यांची मिळाली तेवढी साधारण माहिती खाली देत आहे.

भारताच्या अनेक प्रती जागोजागी आढळतात व त्यात फार फरक आढळतो. तथापि त्या प्रतीतली जुन्यात जुनी प्रत शोधता यावी असे वाटते. भारताची भाषा ज्ञानेश्वरोत्तर-कालीन पण एकनाथ-पूर्वकालीन वाटते. पण कृष्णदास दामा हा प्राचीन कवी भारत नामदेवांनी लिहिले (नवे नवनीत पृष्ठ १३०) असे आदरपूर्वक सांगतो, व हा उल्लेख आद्य नामदेवांचा वाटतो. या भारताच्या प्रती महानुभावीय मठात आढळतात व महानुभावीय वाङ्मयात ज्ञानेश्वरकालीन नामदेवाचा उल्लेख येतो हेही लक्षात घेण्याजोगे आहे. सध्यातरी या गोष्टी परस्परविरोधी दिसतात. 'भारता'वर संशोधन होऊन यावर काही आणखी माहिती मिळेल तर बरे होईल. 'चक्रव्यूह कथा' नावाचे स्वतंत्र काव्य असून विष्णुदास स्वतःला त्यात पंडित म्हणवितो, अशी जी कल्पना आहे ती बरोबर नाही. 'चक्रव्यूह कथा' हे 'भारता'च्या द्रोणपर्वापैकी जरा फरक झालेले एक द्रोणपर्व असून 'सांगे विष्णुदास पंडितें' म्हणजे 'विष्णुदास पंडितांना कथा सांगतो' असा खरा अर्थ आहे. 'भारता'च्या शल्यपर्वाच्या एका प्रतीत गोपिनाथाच्या प्रसादाचा उल्लेख आढळतो. हा गोपिनाथ कृष्ण असू शकेल.

हरिश्चंद्रपुराणाच्या तीन प्रती ठाऊक आहेत. त्यांपैकी एकच पूर्ण असून तिहीत आशय एकच साधारणतः होता; पण शब्दात भिन्नता होती. पूर्ण प्रतीची सुरवात—

" चौदा विद्यांचा प्रकाशु । तो नमावा गणेशु । महाविघ्न करी नाशु । समरसमात्रे ॥१॥ कुभाव अतिलेने । तो वर्णावा गुरुराणे । तेणे नासती महाविघ्ने । गणपतिप्रसादे ॥२॥ तो ज्ञानांकुर काढी । आणि विघ्न मात्र मोडी । कविजनासि सांडी । अज्ञानमडळ ॥३॥ " अशी होऊन शारदा, भवानी, वाल्मीकि यांच्या प्रसादाने व अनुज्ञेने आपण काव्य केले असे कवी म्हणतो. पंधराव्या ओवीत 'मग नामदेव विनवी हरिचरणी' असा उल्लेख असून "नामा म्हणे विष्णुदास । ऐशी कथा सुरस । श्रोती स्मरावे तयास येकचित्ते ॥" अशी चवथ्या म्हणजे शेवटल्या प्रसंगाची ओवी आहे. या तीन प्रतीत ८३३ते साधारण ११०० ओव्या असाव्यात. ८३३ ओव्यांच्या त्रुटित प्रतीत शेवटी कवीचे नाव नाही. हरिश्चंद्रपुराणाचे इसवी सनाच्या सतराव्या शतकारंभी भाषांतर झाले होते ही गोष्ट लक्षात घेता मूळ पुराण एकनाथ-पूर्वकालीन असून हे शुकाख्यानकर्त्या विष्णुदास नाम्याचे नाही असे म्हणता येईल. पुराणाची भाषाही जुनी वाटते. मूलकासुरवध हे पाच प्रसंगांचे काव्य असून त्यात सुमारे साडेचारशे ओव्या आहेत. ' आता असो रामु भद्रि बैसला । जयजयेकारु प्रवर्त्तला । सुग्रीव अंगदु बोलाविला । दिधली अलंकार भुशणे ॥१॥ ' अशी काव्याची सुरवात होते या कथेचे मूळ 'आनंदरामायणा'च्या राज्य. कांडात ४, ५, ६ या सर्गात आढळते. ( गोपाळ नारायण प्रत. इ. स. १९२६ ). कथेच्या शेवटी 'प्रेमभावे आइकिजे ॥९७॥' असे म्हटले आहे. काव्याची भाषाही जुनी दिसते.

एकादशी कथा छापली आहे. छापील प्रतीत १८८ ओव्या आहेत. या कथेचेही हरिश्चंद्रपुराणासारखे पोर्तुगीज भाषांतर झाले व हे काव्यही तसेच जुने असावे. या काव्याची एक१२१ओव्यांची प्रत पाहाण्यास मिळाली.

बुधवावणी हे उपदेशपर काव्य आहे. तुकारामापूर्वीहि उपदेशपर काव्यरचना होत असे. या काव्याच्या छापील प्रतीखेरीज ८१ व ५९ ओव्यांच्या बुधवावणी आहेत व या सर्वात पुष्कळच साम्य आहे. छापलेल्या प्रतीत नामदेवांचा उल्लेख काव्यातच येतो; पण हा उल्लेख दुसऱ्या प्रतीत नाही. त्यामुळे, या उल्लेखावरून निश्चित निष्कर्ष काढता येणार नाही. आणखी एक विशेष म्हणजे

जवळ जवळ अशीच बुधचावणी महालिंगदासाच्या नावावर आहे. यामुळे बुधचावणीचे कर्तृत्वही संशयास्पद होते.

अनंतव्रतकथेच्या ९२ ओव्या एका हस्तलिखितात आहेत. ' जन्मोजये म्हणे अपण। हे जाळे घालण। परि कृस्नकथा रसाळपण। वैसंपायेनु सांगेल ।।१।। आता श्रीकृस्न येईल। अनंतव्रुत उपदेसेल। ते कथा ऐकता निर्मल। म्हणे नामा विष्णुदास ।। २ ।। ' हा कथेचा आरंभ असून ' विष्णुदासु नामा म्हणत। आइका देउनि चित। पांडव वैराटाघरी जात। तेथे कैसे वर्तले ॥ ९२ ॥' हा शेवट होतो. शेवटी ' इति श्री भारथे वणपर्वणि अनंतव्रुतकथा संपूर्णमस्तु ' असे म्हटले आहे व त्यावरून ही कथा भारताच्या वनपर्वातली असावी असे दिसते.

संतावळी आख्यान अथवा कमलाकर ब्राह्मणाची कथा या ७३ ओव्यांच्या आख्यानात नामदेवांनी ब्राह्मणाचा मृत पुत्र जिवंत केल्याची कथा आहे. शेवटी ' ऐसे संतसेवेचे महिमान। म्हणउनि संतासि जावे शरण। त्याचे चुकेल जन्ममरण। म्हणे नामा विष्णुदास ।।७३।। ' ही ओवी येते. हेच आख्यान संत कमलाकर ब्राह्मणचरित्र या नावाने ( ओव्या ६९ ) थोड्याफार फरकाने आढळते. नामदेवांची गोष्ट विष्णुदास नामा सांगतो असाच प्रकार हा आहे असे निश्चितपणे म्हणता येणार नाही. कोणीतरी नामदेवांच्यावर कथानक रचून शेवटी ' म्हणे नामा विष्णुदास ' हे पालुपद ठेवून दिले असेलही.

' तीर्थावली ' हे नाव एका काव्याच्या सुरवातीला आढळते. पण प्रत्यक्ष काव्यात गोष्ट सुल्तान, नामदेव व गाय यांची आहे. गाथेत तीर्थावळीचे अभंग आढळतात ते अगदी निराळे. तीर्थावळीचे १४ अभंग सुबंधु गाथेत छापले आहेत तेही निराळे ( लेखनकाल शके १५०३ ). प्रस्तुत १७६ अभंगात सुरवातीला ' नामा म्हणे नाम महिमा ' (२) असा नामदेवांचा उल्लेख येतो. या हस्तलिखिताचा काळ शके १५५६ आहे. तेव्हा हे काव्य जुने दिसते. पण स्वतः नामदेव आपल्याबद्दल अशी गोष्ट लिहितील हे जरा असंभवनीय वाटते.

या तीर्थावळी प्रकरणाबरोबरच एक कृष्णजन्मकथा आढळते. या कथेत १२३ ओव्या आहेत; परंतु सुरवात चवदाव्या ओवीने होते. ' ऐसा करीती संप्रधारु : वीनवे नामा दामोधरु : अवतरीला सारंगधरु : तो दातारू भक्तांचा ॥ १२२ ॥ सदा हरिनाम घेइजे वाचे : पाप टळेल जन्माचे : बंधन तुटे कर्माचे : पद प्रेमाचे पाविजे : ।।१२३।। ' हा काव्याचा शेवट आहे. शेवटी ' प्रसंगु ' असे लिहिलेले असल्याने हे प्रकरण मोठ्या आख्यानाचा भाग दिसते.

हनुमंतभेटी हे सुमारे २९० ओव्यांचे प्रकरण व नामा पाठकांचे हनुमंतगरुड आख्यान ही जवळ जवळ एकच आहेत. हे काव्य खरे कोणाचे ही गोष्ट ठरवावी लागेल.

कलियुगमहिमा अथवा स्वर्गारोहण या चौपन्न ओव्यांच्या प्रकरणाशेवटी ' सवे घेऊन द्रुपदीसी। पांडव चालीले उत्तरेसी। पुढे कथा चालीली कैसी। ते सांग रे विष्णुदास नामया ।।५४।।' ही ओवी आहे व हे प्रकरण भारताच्या स्वर्गारोहणपर्वातले असावे असे दिसते.

लवकुशकथेच्या सुमारे साडेचारशे ओव्या आहेत. या कथेच्या तीन प्रती ठाऊक आहेत. एकीत ' मति विवेकनामा विष्णुदास ', दुसरीत ' राजमति विवेकनामा विष्णुदास ' व तिसरीत ' नामा विष्णुदास ' असा कवीचा उल्लेख आहे.

कै. चांदोरकरांना १५३ ओव्यांचे कपोताख्यान उपलब्ध झाले होते. त्याचा शेवट ' विष्णुदासाचा दातारु। पावला भक्तालागी सारंगधरु। प्रसन्नरुपी हरिहरु। नामस्मरणे पावतुसे ' असा ते देतात. हे प्रकरण कुठे आहे ते कळत नाही. ' शिबी राजाची कथा ' या असल्याच नामा पाठकांच्या प्रकरणाचा

उल्लेख कै. अजगावकरांच्या ' प्राचीन मराठी संतकवी ' या ग्रंथात आढळतो. कपोताख्यानात ' रामभारथी दिगंबर ' गुरूचा उल्लेख आहे.

' वस्त्रहरण ' प्रकरणात ' हरी नामया दातारु ' असा कवीचा उल्लेख येतो. यातल्या काही ओव्या नामा पाठकांच्या वस्त्रहरण प्रकरणातील ओव्यांशी जुळतात. तसेच या प्रकरणात बऱ्हाणपूरचा उल्लेख आसल्यामुळे हे प्रकरण ज्ञानेश्वरकालीन नामदेवांचे नसावे.

नामा पाठक हे निःसंशय निराळे कवी आहेत व ते साधारण इसवी सनाच्या पंधराव्या शतकात होऊन गेले. त्यांचे वंशज अजून केंदूरगावी विद्यमान आहेत. त्यांचा प्रमुख ग्रंथ अश्वमेध, त्यातली चंद्रहासकथा ' प्राचीन मराठी कविता खंड १ ला ' या ग्रंथात नुकतीच छापली आहे, व त्यांची स्फुट काव्ये लवकरच दुसऱ्या खंडात छापली जातील. नामा पाठकांच्या चंद्रहासकथेच्या एका प्रतीत दोन प्रसंगात कवीचे नाव ' विष्णुदास नामा ' आहे व एका प्रसंगात ' नामा पाठक' हे आहे. असाच घोटाळा 'हनुमंतभेटी' या प्रकरणासंबंधी आहे. भारताच्या एका प्रतीत द्रोणपर्वात पाठक नामा हे कवीचे नाव विष्णुदास नाम्याऐवजी येते. नामा पाठक व विष्णुदास नामा ही नावे विशेषणार्थी वापरली जात असण्याचा संभव आहे. विष्णुदास नामा या नावाने असलेली काही कथानके नामा पाठकांचीच तर नाहीत ना असा प्रश्न उद्भवतो व ही सर्व काव्ये प्रकाशित झाल्या-खेरीज त्याबद्दल अनुमान करणे कठीण आहे.

भारताच्या एका प्रतीत कवीचे नाव कधी कृष्णदास नामा असे होते. चक्रव्यूहकथेत ' कवि कृष्ण ' असा उल्लेख चवथ्या प्रसंगात येतो व एका ठिकाणी कवी स्वतःला कृष्णाचा दास म्हणवितो. कृष्णदास नामा, कृष्णदास या नावांवर आढळणारी जी दुसरी काव्ये आहेत त्यांचा ' विष्णुदास नामा ' बरोबर काय संबंध आहे ते ठरवावे लागेल.

नामदेवांच्या स्फुट अभंगाची भाषा अर्वाचीन वाटते व त्यांचे खरेखुरे काव्य कोणते हा प्रश्न अनिर्णीतच राहतो. एकनाथांच्या ' जयांचे ग्रंथ पाहता ' या उल्लेखावरून ( भागवत ११।१२२ ) नामदेवांची आख्याने होती असे दिसते. त्यांच्या अभंगांचे अर्वाचिनीकरणहि झाले असेल. याचा विचार होण्यासाठी वरील निरनिराळ्या नावांवर आढळणाऱ्या सर्व काव्यांचा अभ्यास झाला पाहिजे. महाराष्ट्रसरकारच्या नामदेवगाथा समितीतले विद्वान या प्रश्नाचा थोडाफार उलगडा करतीलच.

प्रस्तुत लेख लिहिण्यास भारत इतिहास संशोधक मंडळ पुणे, सरस्वतीमहाल ग्रंथालय तंजावर, सत्कार्योत्तेजक सभा धुळे, राजवाडे संशोधन मंदिर धुळे, एकनाथ संशोधन मंदिर औरंगाबाद, इत्यादि संस्थांनी व नगरचे बाबासाहेब मिरीकर, बडोद्याचे श्री. एन्. जी गोखले इत्यादि व्यक्तींनी माहिती पुरवून मदत केली त्याबद्दल सर्वांचा फार आभारी आहे.

# विष्णुदासनाम्याचे महाभारत : एक अभ्यास

– व. वि. पारखे

## –( २ ) स्त्रीपर्व –

साहित्यपरिषदेच्या एक अंकात विष्णुदासनाम्याच्या ऐषीक पर्वाचा तौलनिक अभ्यास प्रसिद्ध करण्यात आला होता. ह्या दुसऱ्या लेखात त्याच्या स्त्रीपर्वाचा तौलनिक अभ्यास प्रसिद्ध करण्यात येत आहे.

**सूत्रारंभ–:** स्त्रीपर्वाचे उपपर्वान्वये (१) विशोक पर्व, (२) स्त्रीपर्व, (३) श्राद्धपर्व आणि (४) जलप्रदानिक पर्व असे चार भाग पडतात.

विशोकपर्वात, धृतराष्ट्रास पुत्रवधामुळे झालेला वृहद्-शोक, संजयकृत त्याचे सान्त्वन करण्याचा प्रयत्न, विदुराने शोकविनाशासाठी धृतराष्ट्राशी केलेली तात्विक चर्चा आणि तदनंतर कृष्णद्वैपायन व्यासांनी त्यास केलेला तात्त्विक उपदेश हा भाग आलेला आहे.

धृतराष्ट्र शोकमुक्त व्हावा म्हणून विदुराने जीं तात्त्विक चर्चा केलेली आहे त्या चर्चेतून प्रामुख्याने खालील मुद्दे आलेले आहेत:–

(१) प्राणिमात्रास मृत्यु हा अटळ आहे. (२) दुर्योधन आणि त्याचे सुहृद आप्त सर्व स्वर्गात गेलेले आहेत. (३) देहनाशामुळे प्रज्ञावंतांनी आपल्या मनाची चलबिचल होऊ देता कामा नये. (४) शोकाबद्दल काहीही प्राप्त होत नाही. (५) सुखदुःखाबद्दल मन उदासीन असावे. (६) देह जरी बदलत गेले तरी आत्मा मात्र अविनाशी आहे. (७) ज्याप्रमाणे कुंभकाराच्या चक्रावर तयार होत असतानाच काही घट फुटतात तर काही आर्द्र किंवा शुष्क असताना भंग पावतात तर कित्येक नंतरच्या निरनिराळ्या अवस्थातून जात असताना फुटतात, त्याचप्रमाणे माणसाला कर्मानुसार भिन्नभिन्न देहावस्था प्राप्त होते. (८) जीवन हे आदि, मध्य, अंती, नेहमीच दुःखपूर्ण असते. परंतु वासनांच्या आहारी गेल्याने मनुष्य हे सत्य विसरतो, तेव्हा या दुःखातून मुक्त व्हावयाचे असेल तर त्याने धर्मपरायण राहिले पाहिजे. (९) मनुष्याच्या देहाला काल, जरा, तृष्णा, व्याधी व मृत्यू यांनी जखडलेले असून त्यामुळे देहाचा नित्य क्षय होत असतो. (१०) तो क्षय थांबविण्यासाठी देहरथाच्या वासनारूपी अश्वांना आत्म्याने, सत्कर्म आणि सम्यक् ज्ञानाचा लगाम घातला पाहिजे. (११) इतरांचे अनिष्ट करणे मृत्युसमान असल्याने मनुष्याच्या हृदयात 'सर्वांभूती दया-भाव' असणे अत्यंत महत्त्वाचे आहे. येथे विशोकपर्व संपते.

यानंतरचे दुसरे उपपर्व 'स्त्रीपर्व' हे आहे. कुंती, गांधारी इत्यादि कुरू स्त्रियांसह धृतराष्ट्र समरांगणावर जाण्यासाठी निघाला असता, वाटेत एका कोसावर त्यास कृपाचार्य, अश्वत्थामा आणि कृतवर्मा भेटतात. भीमाने अधर्माने दुर्योधनास मारल्याने आपणहि तशाच प्रकारे, पांडव शिबिरात सुप्त असता त्याजवर धाऊन धृष्टद्युम्नासह सर्व पांचाल, द्रुपदाचे पुत्र आणि द्रौपदेय यांचा वध केला इत्यादि वृत्त ते धृतराष्ट्रास कथन करून पांडवांच्या भयाने तदनंतर त्याचा निरोप घेतात व गंगेच्या दिशेने सत्वर पलायन करतात. युधिष्ठिराला धृतराष्ट्र समरांगणावर–गेल्याचे समजल्यावरून तो आपल्या अनुजांसह त्यास भेटण्यासाठी तेथे जातो. त्या ठिकाणी धृतराष्ट्र क्रमाक्रमाने पांडवांना आलिंगन देत असता भीम येण्याच्या वेळेस त्याच्या मनांत क्रोध जागृत होतो. ते श्रीकृष्णास समजते व तो भीमास बाजूस सारून भीमाची लोहमूर्तीच त्याच्यापुढे सारतो. धृतराष्ट्र तिलाच भीम समजून महाक्रोधावेशाने

अनुक्रमणिका

तिला कवटाळतो व त्यामुळे तिचे चूर्ण बनते ! आपल्या मनातील क्रोध मावळल्यावर भीमासाठी जेव्हा धृतराष्ट्र शोक करू लागतो तेव्हा श्रीकृष्ण त्यास सत्य प्रकार कथन करून भीमास पुढे जाण्याची अनुज्ञा देतो. नंतर प्रेमभावाने धृतराष्ट्र त्या पांडुपुत्रांना आलिंगन देतो. नंतर पांडव गांधारीच्या दर्शनास जातात. गांधारीचा त्यांना शाप देण्याचा मानस असतो पण ते श्रीव्यासांना कळते व ते तेथे येतात व त्या कृत्यापासून तिला परावृत्त करतात. तदनंतर दुर्योधनास अधर्माने मारल्याबद्दल ती भीमास दूषण देते. " दुर्योधनाने आमच्याशी अधर्माचरण केले म्हणून आम्हांसहि अधर्माने वागावे लागले " असे सांगून भीम तिचा आरोप मान्य करतो. त्याच ठिकाणी आपण दुःशासनाचे रुधिर प्राशन केलेले नसून प्रतिज्ञा रक्षणासाठी आपण ते केवळ ओठांना माखले, असेहि भीम तिला सांगतो. गांधारीची तीक्ष्ण नजर नेत्रांवरील पट्टीच्या फटीतून युधिष्ठिराच्या पायावर पडते. त्यामुळे त्याच्या पायाची नखे निःसत्त्व व मलीन होतात. नंतर तिचा क्रोध मावळतो व ती पुत्रस्नेहाने त्यांना आलिंगन देते. यापुढे ती आपल्या दिव्यचक्षूंनी समरांगणावरील कारुण्यपूर्ण देखावा पाहते व त्याचे वर्णन ती श्रीकृष्णाजवळ करते. याच ठिकाणी श्रीव्यासांनी गांधारीने दुर्योधन, दुःशासन, शकुनि, विकर्ण, दुर्मुख, अभिमन्यु कर्ण, जयद्रथ, शल्य, भीष्म, दोण इत्यादि थोर व महान योद्धयांबद्दल केलेला शोकविलाप वर्णन केलेला आहे. या सर्व मानवसंहाराबद्दल ती श्रीकृष्णास दूषण देते व त्याला शाप देते. श्रीकृष्ण त्या शापाचे स्वागत करतात परंतु मानवसंहाराची सर्व जबाबदारी मात्र तिच्याच शिरावर टाकतात. तेथे हे उपपर्व संपते. स्त्रीपर्वाच्या एकंदर उपपर्वांत हे उपपर्व फार मोठे आहे.

यानंतरचे उपपर्व 'श्राद्धपर्व' हे होय. येथे धृतराष्ट्राने युधिष्ठिरास, या भारती युद्धात एकूण किती लोक मेले, त्या मृतवीरांना कोणकोणती गति प्राप्त झाली; एखाद्या सिद्धाप्रमाणे तुला कोणत्या ज्ञानबलाने हे सर्व समजते, असे प्रश्न विचारलेले असून त्यांची उत्तरेही युधिष्ठिराने दिलेली आहेत. तदनंतर या सर्व मृतवीरांचे और्ध्वदेहिक कार्य युधिष्ठिराज्ञेवरून विदुर व संजय यांच्याकडून केले जाते आणि युधिष्ठिर धृतराष्ट्रास पुढे करून गंगेवर मृतांना जलप्रदान करण्यासाठी जातो. असा कथाभाग या उपपर्वात आलेला आहे.

'जलप्रदानिक पर्व' हे स्त्रीपर्वाचे शेवटचे उपपर्व होय. युधिष्ठिरादि लोकांनी व कुरुस्त्रियांनी आपल्या मृत आतेष्टांना गंगेत जलप्रदान केल्याचा प्रसंग या पर्वात वर्णिला आहे. याच ठिकाणी कुंती प्रथमच धर्मराजास कर्ण हा त्याचा ज्येष्ठ भ्राता असल्याचे वृत्त कथन करते. ह्यानंतर कर्णासाठी पांडवांनी केलेला विलाप व युधिष्ठिराने कर्णाची केलेली उत्तरक्रिया, कुरुस्त्रियांचा आर्त शोक इत्यादि वर्णन येते व हे उपपर्व संपते आणि महाभारताचे स्त्रीपर्व पण संपते.

नीलकण्ठी टीकेत स्त्रीपर्वाचे जलप्रदानिकपर्व, स्त्रीविलापपर्व व श्राद्धपर्व असे तीन विभाग केलेले आढळतात. भांडारकर प्रतीतील विशोकपर्व आणि स्त्रीपर्वाचा युधिष्ठिराच्या पायाची नखाग्रे निःसत्त्व व मलीन होण्यापर्यंतचा भाग नीलकण्ठी टीकेतील जलप्रदानिक पर्वात आलेला असून स्त्रीविलापपर्वात गांधारीने कौरव-पांडव योद्धयांसाठी केलेला शोक व तिने श्रीकृष्णास दिलेला शाप इतक्या भागाचे कथानक आलेले आहे व उरलेला स्त्रीपर्वाचा सर्व भाग श्राद्धपर्वातून आलेला आहे. दोन्हीही प्रतींची अध्यायसंख्या सारखीच असली तरी दोघांच्या श्लोकसंख्येत मात्र फरक आढळतो. हा फरक भाण्डारकार प्रतीने प्रक्षिप्त मानलेला आहे.

विष्णुदासनाम्याच्या स्त्रीपर्वाचे आठ प्रसंग असून त्यांची ग्रंथसंख्या सुमारे ६८१ इतकी आहे.[1] याच कवीच्या स्त्रीपर्वाच्या मुंबईप्रतीत

१. सरस्वतीमहाल लायब्ररी, तंजावर, मराठी हस्तलिखित क्रमांक १३९७.

मात्र अकरा प्रसंग असल्याचे आपणांस दिसून येते.

विष्णुदासनामा सौप्तिकपर्वामध्ये, स्त्रीपर्वाबद्दल माहिती देताना सांगतोः– [१]

ऐसे स्त्रीपर्व जाले। भारथी बहुत नाही बोलीले।
ते कृपे आवलोकीले। म्हणे नामा विष्णुदासु ॥
प्रसंग १ ला. ओवी ९७

या ओवीतील 'भारताच्या' उल्लेखानुसार, विष्णुदासनाम्याने महाभारत पाहून मगच स्त्रीपर्वाचा विस्तार केला अशी वाचकांची कल्पना झाली तर ती साफ चूक ठरते! कारण विष्णुदासनाम्याने महाभारतास न अनुसरता आपल्या स्त्रीपर्वाची रचना केलेली आहे हे त्यातील प्रसंग वाचताच स्पष्टपणे नजरेस येते. विष्णुदासम्याच्या स्त्रीपर्वाची कल्पना यावी म्हणून तेथील प्रसंगांचा सारांश देण्यात येत आहे.[२] हे सार तंजावर येथील स्त्रीपर्वाच्या प्रतीचे आहे.

**प्रसंग १ ला**

भारती युद्धात कौरवांचा निःपात होऊन पांडवांना राज्यप्राप्ती झाली म्हणून श्रीकृष्णाला अत्यंत आनंद झाला. युद्धात कौरवांचा सम्राट दुर्योधन ठार मारला गेल्याने दुर्योधनपत्नी भानुमतीने सती जाण्याचा विचार केला. याच ठिकाणी विष्णुदासनाम्याने सतीचा महिमा गाइलेला आहे.

**प्रसंग २ रा**

रणांगणात भीष्म शरपंजरी पडलेला होता. त्याचे दर्शन घेण्यासाठी धर्मराज श्रीकृष्णासह निघाला. या ठिकाणी विष्णुदासनाम्याने स्मशानाचे वर्णन केलेले आहे. भीष्माला पाहिल्यावर युधिष्ठिराने घेतलेले राज्य त्यास परत देण्याची इच्छा व्यक्त केली.

**प्रसंग ३ रा**

कौरव स्त्रियांना भीष्माने सती जाण्याचा उपदेश केला. रणांगणात ज्या ठिकाणी आपला पती ठार मारला गेला असेल, तेथे स्त्रियांनी चिता रचावी आणि पतीबरोबर सती जावे असे भीष्माने त्यांना सांगितले. यानंतर कौरवस्त्रियांनी केलेल्या शोकाचे वर्णन विष्णुदासनामा करतो. भीष्माच्या सल्ल्यानुसार भानुमती सती जाण्याची तयारी करते.

**प्रसंग ४ था**

भीमाला युद्धातील आपल्या पराक्रमामुळे गर्व झालेला असतो. त्याचा गर्वपरिहार करण्यासाठी श्रीकृष्ण युक्ति योजतो. तो भीमास भानुमतीला ओढून आणावयास सांगतो. (द्रौपदीला कौरवांनी सभेत फरफटत ओढून आणले होते. तेव्हा त्याचा बदला नको का घ्यायला?) या ठिकाणी विष्णुदास नामा भानुमतीचा शृंगार वर्णन करतो. भानुमतीला ओढून आणावयास निघालेल्या भीमाचा, भानुमतीच्या दासीच पराभव करतात! अशा प्रकारे त्याची फजिती होऊन त्याचे गर्वहरण होते! नंतर अर्जुन भानुमतीला श्रीकृष्णाच्या भेटीसाठी बोलावण्यास जातो तेव्हा ती वीस हजार दासींना घेऊन धर्माकडे येते. त्या ठिकाणी पांडवांकडून भानुमतीचे आगतस्वागत होते. दुर्योधनाला स्वर्गात जाच होत असतो, तो कमी व्हावा म्हणून भानुमती श्रीष्णाला शरण जाते!

**प्रसंग ५ वा**

तदनंतर भानुमती स्वतः सती जाण्यासाठी चिता रचते! चितेवर आरूढ होण्यापूर्वी ती स्त्रियांना व रुक्मिणीला सौभाग्यवाणे व दान देते; स्वतःचे अलंकारही ती त्यांना वाटून टाकते. आपण दुर्योधनाला

---

१. भा. इ. सं. मं. पुणे : हस्तलिखित क्रमांक २२. १३०.
२. विष्णुदासनाम्याच्या महाभारताचा विवेचनात्मक अभ्यास : स्त्रीपर्वाचा सारांश (मुंबई व तंजावर प्रत) पाने १९६-२१७,

अनुक्रमणिका

सोडवून आणीपर्यंत कोणीही सती जावयाचे नाही असे कौरवस्त्रियांना बजावून सांगून ती चितेवर चढते. दुर्योधन स्वर्गात गेलेला असल्यामुळे ती श्रीकृष्णाला स्वर्गात जाण्याविषयी विचारते. श्रीकृष्णाच्या सांगण्यानुसार, भानुमती वाऱ्याच्या झुळकीवरून स्वर्गप्रवेश करते. आपण जसे केलेले असते त्या कर्मानुसार आपणास फलप्राप्ती होते, असे श्रीकृष्ण धृतराष्ट्रास सांगतो.

**प्रसंग ६ वा**

भानुमती स्वर्गाजवळ येते परंतु तिचा प्रवेश होऊ शकत नाही. कारण स्वर्गाचे रक्षक तिला मना करतात. तेव्हा ती त्यांच्याशी युद्ध करते. या युद्धात त्या स्वर्गरक्षकांचा पराजय होतो. ती तेथून यमपुरीत जाते. यमपुरीत दुर्योधनाचा छळ होत असतो, ते पाहून ती अतिशय क्रुद्ध होते.

याच वेळेस यमदूत यमाला झालेल्या युद्धाची वार्ता कळवितात. ती बातमी ऐकून स्वतः यम युद्धास येतो. तेव्हा भानुमती वायूचे साहाय्य घेऊन यमाचाही पराभव करते ! तदनंतर भानुमती अग्नीला प्रत्यक्ष यमपुरीच जाळून टाकण्यास सांगते. युद्धात पराभव झाल्यावर यम इंद्राकडे जातो. तेव्हा इंद्र ससैन्य युद्धास येतो. परंतु भानुमतीपुढे त्याची डाळ शिजत नाही ! तेव्हा इंद्र शिवास शरण जातो.

**प्रसंग ७ वा**

इकडे भानुमती दुर्योधनाला स्वर्गाच्या सिंहासनावर बसविते व त्याचे रक्षण करण्यासाठी वाऱ्याला रक्षक म्हणून ठेवून पृथ्वीवर परत येते. भानुमतीला आपल्या पतीचे दर्शन झालेले असते. तेव्हा इतर स्त्रियासुद्धा श्रीकृष्णाजवळ, आपल्यालाही पतिदर्शन व्हावे असा आग्रह धरतात. त्यांची दृढ इच्छा पाहून श्रीकृष्ण श्रीव्यासांचे स्मरण करून त्या मृत वीरांना जिवंत करतो ! आपल्या पतींबरोबर कौरवस्त्रिया तीन दिवस दिव्य भोग उपभोगतात. तीन दिवस झाल्यावर श्रीव्यास, 'ज्यांना आपल्या पतीबरोबर स्वर्गात जावयाची इच्छा आहे त्यांना तेथे जाता येईल,' असे त्या स्त्रियांना सांगतात. काही स्त्रिया स्वर्गात जातात तर काही सती जाण्याची अनुज्ञा मागतात.

**प्रसंग ८ वा**

इंद्र शिवास शरण गेल्यावरून, शिव भानुमतीशी युद्ध करावयास येतो. भानुमती व शिव यांचे युद्ध होऊन त्यात शंकराचा पराभव होतो. भानुमतीचा प्रताप पाहून शंकर प्रसन्न होऊन तिला वर देतो, तो असा– "तुम्ही दोघांनी सहा वर्षे नरकवास भोगल्यावर, धर्मराज स्वर्गात येताच तुम्हाला स्वर्गलाभ होईल." तदनंतर शिव यमपुरीची पूर्वीप्रमाणे रचना करून निघून जातो.

यानंतर ह्या पर्वाचे पठण केल्यास होणारी फलश्रुति वर्णन करून झाल्यावर विष्णुदास नाम्याचे स्त्रीपर्व ( तंजावर प्रत ) संपते.

विष्णुदासनाम्याच्या स्त्रीपर्वाची मुंबई प्रत उपलब्ध असून ती सुद्धा व्यासांच्या महाभारतापेक्षा फारच भिन्न असल्याने, कल्पना येण्यासाठी तिचाही सारांश आम्ही येथे देत आहोत.

**प्रसंग १ ला**

मंगलाचरण, भीमास शतचूर्ण करण्याची धृतराष्ट्रास झालेली इच्छा, भानुमती सती जाण्यासाठी युधिष्ठिराची आज्ञा मागते, द्रौपदीचे श्रीकृष्णाला पाचारण, पारिजातकथा, कृष्णविवाह, गरुडगर्वपरिहार, भामारूपगर्वपरिहार, गरुडाची कथा, पर्वतांचे पक्षच्छेदन, गरुडाचा नंदीकडून पराभव, ही सांगितलेली आख्याने.

**प्रसंग २ रा**

गरुड-हनुमंत भेट, कृष्णदानाची कथा, कृष्णाचे ब्रह्मचारित्व, सत्राजित व स्यमंतक मणि आख्यान, गणपतीच्या गजवदनाची कथा, गणेश चतुर्थीच्या चंद्रदर्शनाने कृष्णावर आलेला चौर्यकर्माचा आळ, इत्यादि कथानक.

**प्रसंग ३ रा**

स्यमंतक मण्याचा शोध, जांबुवताच्या गुहेत कृष्ण जातो, दोघांचे युद्ध, जांबुवंताच्या कन्येशी कृष्णाचा विवाह, स्यमंतकाचे आंदण, कालियामर्दनाची कथा, कृष्णाचे हस्तिनापुरी गमन, धृतराष्ट्र लोहभीमाचे चूर्ण करतो व नंतर कृतकर्मामुळे लज्जित होतो; मृत्युकाळी पांडव व कृष्ण आपल्या भोंवती असावेत अशी भीष्माने दर्शविलेली अंतिम इच्छा.

**प्रसंग ४ था**

कुरुक्षेत्राचे वर्णन, परमेश्वराला अनुसरणे व मोक्षमार्ग, नाममाहात्म्य, नवविधा भक्ती यांचे विवेचन, उत्तरायणी मृत्यूचा हेतु, गजेन्द्रमोक्ष.

**प्रसंग ५ वा**

धर्मास आलेला उद्वेग, चंचल मन स्थिर कसे करावे याबद्दल काही दृष्टान्त, धर्माच्या मनाचे भीष्माने केलेले निदान.

**प्रसंग ६ वा**

चार पदार्थ व त्यांचा अर्थ, आपल्या कर्माप्रमाणे वागावे, हत्तीची गोष्ट, राजनीतिविषयक भीष्माचे निवेदन, कौरव स्त्रियांना सती जाण्याविषयी सल्ला.

**प्रसंग ७ वा**

कुरुक्षेत्र पाहून भीमास गर्व होतो हे पाहून, द्रौपदीवस्त्रहरणाचे उट्टे काढण्यासाठी, श्रीकृष्ण त्याला भानुमतीचे केस धरून ओढत आणावयास सांगतो; कृष्णमायेने भीमाची शक्ति नाहीशी होते. त्याला भानुमतीच्या दासी पळवून लावतात, त्याची फटफजिती होते. भानुमती श्रीकृष्णास भेटते, विदुर तिला कृष्णाला शरण जाण्यास सांगून, कृष्णकृपेने दुर्योधनाचा स्वर्गात होत असलेला छळ थांबवून त्यास सोडवून आणण्याचा सल्ला देतो.

**प्रसंग ८ वा**

भानुमती पांडवांच्या सभेत, श्रीकृष्णाला शरण जाते, तिचे संभाषणचातुर्य, भानुमतीने केलेल्या साजशृंगाराचे विस्तृत वर्णन, तिने पशु व पक्षी यांचा घेतलेला निरोप, भानुमतीने केलेला दानधर्म, कौरवस्त्रिया सती जाण्यासाठी वेगवेगळ्या वाहनांतून निघतात.

**प्रसंग ९ वा**

सती जाण्याच्या वेळची वेषभूषा, वायनदान, कृष्णस्तुति व प्रार्थना, श्रीकृष्ण अग्नि व वायु यांना भानुमतीस साहाय्य करण्यास सांगतो. भानुमती चितेत उडी घेते व वाऱ्याबरोबर स्वर्गी जाते. परंतु तेथील दारे बंद असतात; तेव्हा अग्नीच्या मदतीने तिचा स्वर्गात प्रवेश.

**प्रसंग १० वा**

कृष्णाच्या कृपेने भानुमती स्वर्गात आल्याचे पाहून दुर्योधन रागावतो व यमसैन्यासह तो तिच्यावर चाल करून जातो. वाऱ्याच्या साहाय्याने ती त्याचा पाडाव करते!

**प्रसंग ११ वा**

इंद्र व भानुमतीचे युद्ध, स्त्रीला मारू नये म्हणून चिंता व शिवाचे स्मरण, शिव भानुमतीचे सांत्वन करून पृथ्वीवर माघारा जाण्यास सांगतो; ती परत येते. इतर कौरव स्त्रियांना अग्नी दिला जातो; पांडव तिलांजलि देतात व श्रीकृष्ण द्वारकेला जातो; पर्वाची फलश्रुति.

येथे विष्णुदासनाम्याच्या स्त्रीपर्वाची मुंबई प्रत समाप्त होते.

व्यासांच्या महाभारतातील स्त्रीपर्वाचा सारांश पूर्वी दिलेला आहेच. त्या सारांशाबरोबर जर आपण विष्णुदासनाम्याच्या स्त्रीपर्वाच्या दोन्ही प्रती पडताळून पाहिल्या तर या कवीचा सर्व वाग्जल्प, व्यासांची संगति सोडून झालेला आहे हे चटकन दिसते.

इतके असूनही या स्त्रीपर्वाची व्यासमहाभारताबरोबर तुलना करावयाची म्हटली तर तुलना करताना प्रथम खटकणारी गोष्ट म्हणजे त्याने केलेला दुर्योधनपत्नीचा नामोल्लेख. दुर्योधनपत्नीचे, 'भानुमतीचे' हे नाव महाभारतात कोठेही न येता ते स्कंद-

पुराणात येते;[1] तसेच नामा पाठक सुद्धा त्याचा उल्लेख करतो.[2] त्याचप्रमाणे दुसरा खटकणारा भाग म्हणजे कौरवस्त्रियांचे सती जाणे. दुर्योधनपत्नीच काय, परंतु इतर कोणत्याही कौरवस्त्रिया सती जात असल्याचे वर्णन स्त्रीपर्वात येत नाही; त्याचप्रमाणे विष्णुदासनाम्याने वर्णन केलेले 'सतीचे माहात्म्य' पण सबंध महाभारतात कथन केलेले आढळत नाही.

विष्णुदासनामा, युधिष्ठिर श्रीकृष्णासह भीष्मास भेटावयास गेल्याचा उल्लेख स्त्रीपर्वात करतो; परंतु महाभारतात असे सांगितलेले नसून उलट धृतराष्ट्रच, वासुदेवास पुढे करून, धर्मराजास कुरुक्षेत्रावर घेऊन गेल्याचा उल्लेख मात्र महाभारतात आलेला आहे. कुरुक्षेत्रावर गेल्यावर श्रीकृष्णाचे लक्ष, गांधारीच भीष्माकडे वळविते. या दोघांच्या आगमनप्रसंगी भीष्माचे प्राणोत्क्रमण झालेले असते. त्याच्या वियोगामुळे व्याकूळ होत गांधारी श्रीकृष्णाजवळ म्हणते,

धर्मेषु कुरवः कं नु परिप्रक्ष्यन्ति माधव।
गते देवव्रते स्वर्गं देवकल्पे नरर्षभे ।।
११-२३-२५ ॥

अशा प्रकारे भीष्म स्वर्गात गेला असता धर्मराजाने त्याला राज्य प्रदान करण्याची कल्पना हास्यास्पद ठरत नाही काय? धर्मराजाच्या राज्यप्रदान करण्याच्या उल्लेखातून जरी धर्माचे औदार्य प्रगट होत असले तरी त्यामुळे भीष्माच्या मानी, करारी स्वभावास न्यूनत्व प्राप्त होत आहे हे विष्णुदासनामा विसरलेला आहे! धर्माने देऊ केलेले राज्य भीष्माने स्वीकारले म्हणजे वार्धक्याने व्यापलेल्या केसरीने हत्तीच्या गंडस्थळातील शुभ्र कवळ भक्षण करण्याचे सोडून तृणपर्णावर जीवन जगण्यासारखेच आहे! परंतु आपल्या भारतात श्रीकृष्णभक्तिगायन करण्याच्या भरात महाभारतातील निरनिराळ्या व्यक्तींची जिवंत 'व्यक्तिरेखा' निष्प्रभ होत असल्याचे मात्र विष्णुदास नाम्याच्या ध्यानात आलेले नाही!

त्याच्या स्त्रीपर्वात आढळणारा, धर्मराज आणि श्रीकृष्ण यांनी भीष्माची भेट घेऊन त्याला राज्य देण्याचा कथाभाग जसा स्वतंत्र आहे तसाच भीष्मानेही-मृत झाल्यामुळे निरुपायास्तव-कौरवस्त्रियांना सती जाण्याबद्दल केलेला उपदेश सुद्धां महाभारतावर आधारित नाही! विष्णुदास नामा सतीमाहात्म्याने खूपच प्रभावित झालेला आहे, असे आपणास त्याने उल्लेखिलेल्या सती जाण्याबद्दलच्या निरनिराळ्या उल्लेखावरून वाटते.

श्रीकृष्णाने भीमाला, भानुमतीस पकडून आणावयास सांगून त्याचा गर्वपरिहार केल्याचा कथाभाग सबंध महाभारतात येत नाही. या ठिकाणी विष्णुदासनाम्याने एकाच दगडात दोन पक्षी मारलेले आहेत. त्याने प्रबळ भीमाचे गर्वहरण झाल्याचे तर वर्णिलेले

---

१. तत्र गत्वा विवाहं तु चक्रुः संहृष्टमानसाः।
दुर्योधनस्य भूपस्य भानुमत्या समं तदा ॥ २ ॥
श्रीस्कंद पुराण, (६) नागरखंड, अध्याय ७३

स्कंद पुराणाची अति प्राचीन प्रत इ. सनाच्या सुमारे सहाव्या शतकातील असून ती नेपाळ दरबारच्या ग्रंथालयात बघावयास मिळते. या प्रतीनुसार स्कंद पुराण इ सनाच्या ६ व्या शतकापूर्वी रचिले गेले, हे उघड आहे. वेणीसंहाराचा कर्ता भट्टनारायण इ. सन ६७५ ते ७५० च्या कालखंडात झाला असावा, असे समजतात. म्हणजे त्याने आपल्या नाटकात योजलेले भानुमतीचे नाव स्कंद पुराणातून घेतले असावे, असे दिसते.

२. नामा पाठककृत द्रौपदीवस्त्रहरणाख्यान– ओवी ७९, 'ते भानुमतीया आलिंगली.' नामा पाठकाप्रमाणेच चंद्रात्मज रुद्र सुद्धा भानुमतीचा निर्देश करीत म्हणतो, 'दुर्योधनाचि मुख्य राणि।। भानुमति नामें सौंदर्यखाणि। येउनि लागलि श्रीकृष्णचरणि। आनंद मनि न समाये। उद्योगपर्व प्रसंग –ओवी ८८

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

आहेच; शिवाय दुर्योधनाच्या दुःखविमोचनासाठी उद्युक्त झालेल्या शक्तिशाली भानुमतीलाहि श्रीकृष्णाच्या कृपाप्रसादाशिवाय आपले कार्य साधणे अति कठिण आहे असे वाटल्यावरून,श्रीकृष्णचरणी लीन केलेले आहे !

या कथाभागात, भीमाची भानुमतीच्या दासीकडून होणारी वर्णिलेली फजिती, हास्योत्पादक टरते. परंतु हास्यरसास हे पर्व योग्य नव्हे; कारण-स्त्रीपर्वाचा आत्माच करुण रसात न्हाऊन निघालेला आहे ! ' भीम-भानुमती भेट; तिचे वीस हजार स्त्रियांसह श्रीकृष्णाकडे आगमन व तत्पदी लीन होणे, इत्यादि कथावर्णनही संपूर्णपणे स्वतंत्र आहे.

विष्णुदासनाम्याने यानंतर वर्णिलेला, भानुमतीचे वायुलहरीवर आरूढ होऊन स्वर्गात जाणे, तिचे तेथे स्वर्गरक्षकांशी झालेले युद्ध, तसेच यम, इंद्र, शिव यांच्याबरोबरही तिचे युद्ध होऊन त्यात त्यांचा झालेला पराभव, युद्धात, वायु व अग्नि यांनी इंद्राविरुद्ध लढून तिला केलेली मदत, इत्यादि कथाभाग महाभारतात ( कोणत्याही प्रतींत ) येत नसून तोही सगळा स्वतंत्रच आहे.

भानुमती इंद्राविरुद्ध लढण्याचे जे दिव्य करते, त्याला कारण म्हणजे तिच्या पतीचा, ' दुर्योधनाचा ' स्वर्गात होत असलेला छळ ! इंद्राच्या स्वर्गात मानवाचा छळ व्हावा, ही विष्णुदासनाम्याची कल्पना चिंत्य आहे. कारण महाभारतातील स्वर्गाबद्दलची कल्पना फार भिन्न आहे.

' जे सत्यनिष्ठ, शांत, जितेंद्रिय व संग्रामात मृत झालेले लोक असतात ते स्वर्गात पोहोचतात. तेथे नंदनादिक पवित्र उपवने असून सुगंधी वायु वाहत असून मनोहर शब्दांचे कूजन चाललेले असते. या लोकांची शरीरे तेजोमय असतात. स्वर्गात क्षुधा, तृष्णा, ग्लानी शीत, उष्ण, भीती ही नाहीत व बीभत्स किंवा अशुभही नाही. येथे शोक नाही, जरा नाही, आयास किंवा विलापही नाहीत. असे वर्णन महाभारतात स्वर्गाबद्दल केलेले आढळते.[१] तसेच स्वर्गलोक आणि नरकलोक यांच्या दिशाही परस्पर विरुद्ध, म्हणजे यमलोक दक्षिणेस कल्पिलेला असून स्वर्गलोक उत्तरेस, मेरूच्या शिखरावर कल्पिलेला आहे, अशीही माहिती आपणास महाभारतात मिळू शकते.[२]

महाभारतातील या वर्णनाशी जर विष्णुदासनाम्याच्या स्वर्गाची कल्पना ताडून पाहिली तर विष्णुदासनाम्याने वर्णन केलेला इंद्राधिपती असलेला स्वर्गलोक भिन्न दिसतो. कारण स्वर्गात दुर्योधनाचा छळ होत असतो असे विष्णुदासनामा स्वतःच सांगतो. यावरून असे वाटते की विष्णुदासप्रणीत स्वर्गलोक म्हणजे मृतात्म्यांना आपापल्या पापपुण्यानुसार विष्णुलोकात किंवा नरकलोकात जावयास लागण्यापूर्वीच मधले ठिकाण (Junction) असावे. अशा प्रकारचा मधला स्वर्गलोक असल्याची माहिती आपणांस जेम्स हेस्टिंग्जच्या कोशांत मिळते ती अशी[3]—

"...he (Indra,) still remains a true rain and air god with this cortege of Maruts and storm devas, since his heaven (Indraloka or Svarga) lies beneath that of Vishnu, and Vishnu 's beneath that of Siva, where at last the soul attains repose and release from transmigration ...... Indra himself is only the prince of these devas, who need the amrit to keep them alive."

---

१. " म. भा. ३-२४७. श्लोक " १ ते ३५ आणि प्रक्षिप्त भाग ११९३, पान ८६८ ( BORI Ed )

२. म. भा. ५-१०७. १ ते २१ आणि ५-१०९. १ ते २६ (BORI Ed)

३. Encyclopaedia of Religion and Ethics Vol : 1, A-Art p-.254.

परंतु या ठिकाणी हे दिसून येते की, या प्रकारच्या स्वर्गात मृतांचा छळ होत असल्याचे कोठेही सूचित केलेले नाही ! याचे कारण असे आहे की, स्वर्गात सुद्धा मृतांचा छळ होत असल्याची कल्पना वैदिक धर्माधिष्ठित नसून ती बुद्ध व जैन धर्मीयांची आहे ! या संदर्भात इ. जे. थॉमस म्हणतो–[1]

" The Buddhists also modified the conception of Yama. In the Vedas he is king of the dead in the happy world of the fathers, i.e. the deceased ancestors. For the Buddhists he is still king of the dead, but of those dead who are condemned to a period in hell (niraya), and he is in charge of the tortures inflicted there. "

इ. जे. थॉमसच्या ग्रंथात, यम किंवा इंद्र स्वर्गाचा शासक असल्याचा उल्लेख आपणांस आढळतो.[2]

अशा प्रकारे वरील सर्व विवेचनावरून हे स्पष्ट होते की, विष्णुदासनाम्याने आपले स्त्रीपर्व संपूर्णपणे स्वतंत्र रचलेले असून त्यास व्यासमहाभारताचा केवळ ' नाम ' मात्र आधार, त्याने घेतलेला आहे !

विष्णुदासनाम्याच्या ' स्त्रीपर्वाचा ' मुख्य गाभा वीर व अद्‌भुतरसाधिष्ठित आहे तर व्यासमहाभारतातील ' स्त्रीपर्वाचा ' आत्मा करुण रसात न्हाऊन निघालेला आहे. कौरव-पांडवांच्या महाकथेचा शेवट आता जवळ येत चालल्याचे ' निदर्शक पर्व ' म्हणजे स्त्रीपर्व. अठरा अक्षौहिणी सैन्याचा, अठरा दिवस चाललेल्या संग्रामात, अनेक रथीमहारथींसह झालेला भीषण संहार, प्रत्यक्ष देवांनाही पराक्रमात व चारित्र्यात लाजविणाऱ्या द्रोणाचार्य व भीष्माचार्य यांना रणांगणात प्राप्त झालेली चिरनिद्रा; सर्व पृथ्वी आपल्या बलशाली बाहूंनी काबूत ठेवू पाहणारे, सुईच्या अग्रावर राहील इतकीहि भूमि पांडवांना देऊ न करणारे बलोद्धत शतकौरव युवराज आपल्या सम्राटासह, कालाच्या सामर्थ्याने भग्न होत, मृत्यूला आलिंगन देत रणभूमीवर पडल्याचे होत असलेले भेसूर दर्शन; इत्यादि सर्व कथाभागातून, राज्यतृष्णा किती भयंकर असते व तिचे दुष्परिणाम किती घोर होतात याचे अतिविदारक चित्र श्रीव्यास आपल्यासमोर उभे करतात. या विदारकतेचे दर्शन विष्णुदासनाम्याचे स्त्रीपर्व घडवू शकत नाही.

व्यासभारतातील स्त्रीपर्वाचे आणखी एक वैशिष्ट्य, त्यांनी केलेल्या मानवी मनाच्या कुशल भावनाविष्कारात दिसून येते. आपल्या शतपुत्रांसह ज्याने साम्राज्य गाजविले त्या धृतराष्ट्राची स्थिति, आपले शतपुत्र युद्धात ठार झाल्याचे ऐकून कशी झाली असेल हे व्यासभारताचे स्त्रीपर्व वाचल्याशिवाय कळू शकणार नाही ! केवळ अगतिक झाल्यामुळे आता त्याला पांडवांचा आसरा घ्यावा लागलेला असतो, त्याला मायेची वत्सलता कशी प्राप्त होणार ? तशात आपल्या पुत्रांचे वैरी मात्र आता निर्विघ्नपणे पृथ्वीचे साम्राज्य उपभोगीत राहणार, ह्याचे शल्यहि धृतराष्ट्रास नित्य टोचीत राहाणार, हे व्यासांनी आधीच जाणले होते. म्हणूनच श्रीव्यासांनी धृतराष्ट्राच्या मनात पांडवांबद्दल वसत असलेला सुप्त द्वेष भीमभेटीद्वारेच अत्यंत कौशल्याने चित्रित केलेला आहे. धृतराष्ट्रास अभिवादनास आलेल्या भीमास जर श्रीकृष्णाने धृतराष्ट्राच्या मगरमिठीत जाऊ दिले असते तर नागायुत बल असलेल्या धृतराष्ट्राकडून भीमाचे केव्हाच चूर्ण झाले असते ! विष्णुदासनाम्याने धृतराष्ट्र–पांडव भेटीचा व धृतराष्ट्राकडून भीमाच्या लोखंडी प्रतिमेचे चूर्ण होण्याचा संपूर्ण कथाभागच गाळून टाकलेला आहे ! स्त्रीपर्वाच्या मुंबई प्रतीत मात्र या

1. The History of Buddhist thought, (1953) Page 111.
2. Ibid , Page 111.

प्रसंगाचा उल्लेख विष्णुदासनाम्याने केलेला आढळतो.[१]

स्त्रीपर्वामध्ये श्रीव्यासांनी कौरवस्त्रियांचे केलेले वर्णनही मनास अत्यंत व्याकूळ करणारे आहे. आपल्या शतपुत्रांचे रडतरडत कृष्णाजवळ गुनगान गाणारी गांधारी, दुर्योधनाचे शव जोडीत असलेली दुर्योधनपत्नी व व्यासांनी तिची वर्णिलेली दयनीय अवस्था, अभिमन्यूच्या शवास कवटाळून शोक करीत असलेली उत्तरा; या सर्वांचे विलाप आपले मन क्षणभर विषण्ण करतात. तसेच भेसूर व बीभत्स रणांगणाच्या पार्श्वभूमीवर, कुररीप्रमाणे आर्त विलाप करीत असलेल्या कोमल कुरुपांचालांगनांनी, क्षणभर आपले पती जिवंतच आहेत असे समजून, केलेल्या चेष्टा व विलास यांचेहि अत्यंत करुणरम्यचित्र, महर्षी व्यास आपल्यासमोर उभे करीत असतात. विष्णुदासनाम्याने करुणरसपरिवर्धक असा, हा भागसुद्धा संपूर्णपणे वगळला असून प्रसंगास अनौचित्यपूर्ण अशी रचना केलेली आहे. उदाहरणार्थ, विष्णुदासनाम्याने केलेले भानुमतीचे वर्णन येथे पाहावे. तो वर्णितो[२] :—

हारिद्रा उटिली वदनी। करपार दोन्ही जाण।
कासे कासिला पूर्ण। सोनसोळा॥
कंचुकी लेइली जडीत। अंगी घातली तटतटीत।
निडळी मीरवत। मळिवट कुंकमाचे॥
माथा कुरळ शोभत। गळा हार रुळत।
भाळी अर्धचंद्र मीरवत। भूमध्य स्थानी
मागे मीरवे वीर गुंठी। मुद्रा खंडी नेहटी।
सुवर्ण गोंडे मिरवति पुष्टी। केतकी पत्र शोभे।
खोप चापेकळी शोभत। त्यात पाच मिश्रीत॥
येकीकरी लावित। कुरळ पाटीयेसी॥
नेत्रपाती शोभति पाहे।
देखोणि चकीत होय कुरंगीनी॥
श्रवणी तानवडे गोपाळमूर्ती।
वरि झुबक वाळिया मिरवीती।
बुगडीया शोभती।
जडित रत्नी॥
नाकिचे मुक्ताफळ। वदन दीसे मुडाळ॥
आधर रंगले वाहळ।
दंतपंक्ती विराजति॥
जैसी हिरयाची ज्योति।
तैसी शोभे दंतपंक्ती।
गळा हार शोभती। नवरत्नाचे॥
गळा पदक शोभत।
वरी येकावळी मिरवत।
मोतियांची जाळी रुळत।
त्यामाजी रत्ने आसति॥
सर्वसौंदर्याची पेटी।
गळसरी शोभे कंठी।
कडदोरा कटी।
जडीत मिरवे॥
बाह्यवटे शोभती।
भेडसरे काकणे मीरवती।
आंगोळिया मुद्राजडित। शोभा देत॥
कुंकुमे रेखिले पाय तेथे।
पैंजण धुंगरू आहे।
जोडवी विरुदिया पाहे। पोल्हारे अंगुलिया

येथे, सती जाणाऱ्या भानुमतीचे, विष्णुदासनाम्याने जे वर्णन केलेले आहे त्यास महाभारताचा आधार नाही. संस्कृत महाभारताच्या स्त्रीपर्वात एकही स्त्री सती गेल्याचा उल्लेख नाही. विष्णुदासनाम्याने भानुमतीच्या वस्त्रांचे व अलंकारांचे जे वर्णन केलेले आहे ते महाभारत कालातील वेषभूषेस धरून झालेले नाही. महाभारतकालीन स्त्रियांची वेषभूषा अंतरवस्त्र आणि परिधानम् या दोन वस्त्रांनीच बनत असे. क्वचित्, विशिष्ट प्रसंगी, स्त्रिया कलाकुसर

१. विष्णूदासनामा—स्त्रीपर्व : मुंबई प्रत. प्रसंग ३ रा.
२. विष्णुदासनाम्याच्या महाभारताचा विवेचनात्मक अभ्यास पाने : २१५–२१६

केलेल्या शालीसारख्या वस्त्राचा, डोक्यावरील पदरासारखा उपयोग करीत असाव्यात.[१] विष्णुदासनाम्याने भानुमतीच्या तटतटीत कंचुकीचा निर्देश केलेला आहे; ( कंचुकी लेइली जडीत । अंगी घातली तटतटीत ) परंतु महाभारतकालात कंचुकीचा वापर केला जात नव्हता. इतकेच नव्हे तर उच्चकुलीन स्त्रियांना शिवलेल्या वस्त्रांचा तिटकाराच वाटत होता ! इस्लामी कारकीर्दीत मात्र कंचुकीचा वापर मोठ्या प्रमाणात होऊ लागला.[२] याच रितीने,विष्णुदासनाम्याने भानुमतीच्या नासिकालंकाराचा केलेला उल्लेख ( नाकिचे मुक्ताफळ । वदन दीसे सुढाळ ) सुद्धा कालाच्या दृष्टीने पाहता महाभारतकालबाह्य ठरतो. हिंदुधर्मात नथ, किंवा चमकी अथवा अन्य तत्सम अलंकार जरी सौभाग्याचे लेणे समजला गेलेला असला, तरी तो आपण इस्लामियांकडून घेतलेला असून भारतात त्याचा प्रसार इस्लाम कारकीर्दीनंतर झालेला आहे. [३] अशा प्रकारे या सर्व वर्णनात कालविपर्यासाचा दोष ( anachronism ) घडलेला आहे.

विष्णुदासनाम्याने या ठिकाणी भानुमतीच्या वस्त्रालंकाराचे जे अत्युल्वण दर्शन आपणांस घडविलेले आहे, ते महाभारतात आढळत नसल्यामुळे, कदाचित् स्वतंत्र वाटण्याचा संभव आहे; परंतु वस्तुस्थिति तशी नसून एका स्त्रीच्या अग्निप्रवेशाच्या वेळचे जे वर्णन पद्मपुराणात वर्णिलेले आहे, त्याचाच विस्तार विष्णुदासनाम्याने केलेला आहे. त्या स्त्रीच्या अग्निप्रवेशासंबंधी पद्मपुराणांत जे वर्णन येते ते असे,–

स्नानं मंगलसंस्कारो भूषणाञ्जनधारणम् ।
गन्धपुष्पं तथा धूपं हरिद्राक्षतधारणम् ॥७०॥
मङ्गलं च तथा सूत्रं पादालक्तकमेव च
शक्त्या दानं प्रियोक्तिश्च
प्रसन्नास्यत्वमेव च ॥ ७१ ॥
नाना मंगलवाद्यांना श्रवणं गीतकस्य च ।
व्यभिचारकृते पापे तत्पापस्य प्रशान्तये ॥७२॥
अतीतं पातकं पृष्ट्वा प्रायश्चित्तं तदीरितम् ।
कुर्यादथ स्वकां भूषां विप्राय प्रतिपादयेत् ॥७३॥

पद्मपुराण, पाताळखंड, अध्याय १०२

विष्णुदासनाम्याने भानुमतीच्या सती जाण्याच्या प्रसंगाचे केलेले वर्णन, पद्मपुराणातील वर्णनाचाच विस्तार आहे, हे वरील श्लोकांवरून सुस्पष्ट होईल. डॉ. आळतेकरांनी, सती जाण्याची पूर्वतयारी म्हणून या श्लोकांना आपल्या ग्रंथांत उद्धृत केलेले आहे.[४] परंतु ते श्लोक उद्धृत करताना, खुणा केलेले श्लोकार्ध मात्र त्यांनी वगळलेले आहेत ! त्या श्लोकपंक्तींचा आशय लक्षात घेतल्यास, हे वर्णन सती जाणाऱ्या स्त्रीबद्दल आलेले नसून ते, जारकर्माच्या पापापासून मुक्त होण्याच्या संदर्भात नारदमुनीने केलेले आहे, असे स्पष्ट दिसते.

विष्णुदासनाम्याच्या आसपासच्या कालात सती गेलेल्या स्त्रियांचे, ' चक्षुर्वैसत्यं ' वर्णन, काही परदेशी प्रवाशांनी करून ठेवलेले आहे. इ. स. १७९४ मध्ये तंजावर प्रांतातील पुदुपेटा या ठिकाणी एक स्त्री सती गेल्याचे आणि इ. स. १८०१ मध्ये खुद्द तंजावरात राजाच्या निधनोत्तर त्याच्या राण्यांच्या सती जाण्याचे, प्रत्यक्ष पाहिलेले वर्णन ड्युब्रॉईस ( Dubois ) याने केलेले आहे. या दोन्ही वेळी सती जाणाऱ्या स्त्रियांनी, विष्णुदासनामा वर्णितो त्याप्रमाणे, वस्त्रालंकारांचा साजशृंगार चढविला होता. ड्युब्रॉईसने त्या सतीचे वर्णन " Richly clothed and

१–४. The position of Women in Hindu Civilisation by Dr. A. S. Altekar, Benares, 1938, Page 335. 156. २. ibid, p. 354-355 ३. ibid, p. 364

adorned "[१] आणि "Loaded, rather than decked with jewels"[२] असे केलेले आहे.

परंतु महाराष्ट्रामध्ये मात्र, सती जाणाऱ्या स्त्रियांची जी काही तुरळक उदाहरणे आढळतात, त्यांच्या वर्णनात, सतींच्या वस्त्रालंकाराचे असे भडक वर्णन केलेले पहावयास मिळत नाही. नागदेवाचार्यांच्या स्मृतिस्थळात रामदेवरायाची पत्नी कामाई हिला, तिचा सावत्रपुत्र सिंगण याने सती जाणे भाग पाडल्याचा उल्लेख आढळतो.[३] तेथील वर्णन असे :—

'तेव्हळी न न्हातेनि नीगाली :
सीळेवरि उभी ठेली'

या उल्लेखानुसार राणी कामाई अगदी साध्या पोशाखात सती गेली असावी, असे वाटते. शंकर कवीनेही एक सुलोचना आख्यान रचिले असून त्यात, कवीनें सुलोचना सती जाण्यास निघाली असतानाच्या वेळचा प्रसंग वर्णिलेला आहे.[४] त्यात सुद्धा वस्त्रालंकारांचे वर्णन केलेले नाही. नजीकच्याच काळात महाराष्ट्रात थोरले माधवराव पेशवे यांची पत्नी रमाबाई सती गेली. त्या प्रसंगावर एका शाहिराने पोवाडा रचिलेला आहे. शाहीर वर्णितो[५]—

रमाबाई होती दुसऱ्या डेऱ्यात ।
कळली बातमी आली धावत ।।
पदर टाकीला खांद्यावर त्वरीत ।
धावत आली देवळात ।
जातो आम्ही नाही रहात ।।
चाल ।। करा बोलावण आम्ही
निजधामाशी जाणे
तुळशी मंजुळी तोडून ।
त्या माळा गळ्यात घालून ।
सर्व शृंगार उतरून ।
हे निर्वाणीचे लेणे ।।

या ठिकाणी तर रमाबाईने आपला सर्व साजशृंगार उतरवून ठेवून ती सती गेल्याचा स्पष्ट उल्लेख आढळतो.

सारांश महाराष्ट्रात, सती जावयाच्या गंभीर प्रसंगी, स्त्रिया अत्यंत साधा पोशाख करून सती जात असाव्यात, असे वाटते.

अशा प्रकारे, या वर्णनात आपणास भानुमतीचे जे दर्शन घडते ते, आपला पती मृत झाल्यामुळे व्याकूळ होऊन विलापाच्या आवंढा आतल्या आत गिळून टाकीत, नेत्रात येणारे अश्रू आपल्या हाताने पुसून पतीचे छिन्नविच्छिन्न शव जुळविणाऱ्या शोकविव्हळ दुर्योधनपत्नीचे घडत नसून, प्रियकराच्या मीलनासाठी उत्सुक होत, नटून थटून साजशृंगार चढवून निघालेल्या नवोढेचे घडते ! हे सर्व वर्णन एखाद्या शृंगारनायिकेस अत्यंत शोभणारे असून प्रस्तुतच्या चिरविरहदुःखाच्या प्रसंगी ते अप्रासंगिक दिसत असून करुण प्रसंगाची हानी करते !

अशा प्रकारे, विष्णुदासनाम्याच्या महाभारताच्या स्त्रीपर्वाची तंजावर प्रत संस्कृत भारतापेक्षा संपूर्णपणे भिन्न असून तिला महाभारताच्या स्त्रीपर्वातील कोणत्याही भागाचा आधार मिळत नाही. रसोत्पत्तीच्या दृष्टीनेही पाहता ती सुमारच वठली आहे. तिच्यातील करुणरसाचा अभाव प्रकर्षाने जाणवत असून त्या ठिकाणी आपणास वीर, अद्भुत या रसांचा प्रत्यय येतो. या दोन रसांच्या जोडीला त्याने भयानकाचीही अल्पशी साथ दिलेली आहे. संस्कृत महा-

१. Hindu Manners, Customs and Ceremonies by Abbe. J. A. Dubois translated by Henry K. Beauchamp. (3rd Edition). Oxford; P. 361.

२. ibid, page. 365.

३. नागदेवाचार्य : स्मृतिस्थळे : संपा. वा. ना. देशपांडे, १९३९, पान १२३.

४. लघुकाव्यमाला भाग ३ रा : संपा. न. चिं. केळकर, १९०२, पान २४.

५. इतिहास प्रसिद्ध पुरुषांचे व स्त्रियांचे पोवाडे : संग्राहक ऑक्वर्थ व शाळिग्राम; १९११; पान १४३

भारताच्या स्त्रीपर्वाची अंतःप्रवृत्ति बघता, विष्णुदासनाम्याने, वीर, अद्भुत, भयानक या रसांची, करुणरसाच्या ऐवजी केलेली योजना अनौचित्यकारकच ठरते.

जो भाग विष्णुदासनामाकृत स्त्रीपर्वाच्या तंजावर प्रतीचा आहे, तोच भाग साधारणतः त्याच्या स्त्रीपर्वाच्या मुंबई प्रतीचाही आहे. 'पाषाणादिष्टिका वरा' या वचनाप्रमाणे स्त्रीपर्वाच्या मुंबई प्रतीस महाभारताचा थोडासा आधार मिळतो. स्त्रीपर्वामध्ये, धृतराष्ट्राने लोहभीमाचे चूर्ण केल्याचा जो भाग वर्णिला आहे, त्याचा उल्लेख आपणांस विष्णुदासनामाकृत स्त्रीपर्वाच्या मुंबई प्रतीत केलेला आढळतो. परंतु हा अत्यल्पसा उल्लेख सोडल्यास विष्णुदासनाम्याच्या स्त्रीपर्वाची मुंबई प्रत सुद्धा महाभारतास पूर्णपणे सोडूनच वर्णिलेली आढळते.

स्त्रीपर्वाच्या मुंबई प्रतीत, विष्णुदासनाम्याने अनेक आख्याने टाकून भरलेली आहेत. काही आख्याने श्रीकृष्णलीला वर्णन करणारी आहेत. उदाहरणार्थ, श्रीकृष्णविवाह, कृष्णदान, कृष्णाचे ब्रह्मचारित्व, स्यमंतकमण्याचे आख्यान, कालियामर्दन कथा, गरुडगर्वपरिहार या आख्यानांव्यतिरिक्त त्याने काही पौराणिक कथासुद्धा वर्णिलेल्या आहेत. उदाहरणार्थ, गजेन्द्रमोक्ष, गणेश अवताराची कथा, (पार्वतीने आपल्या अंगावरील उटण्याची मूर्ति बनविल्याची कथा) नंदीकृत गरुडगर्वहरण, भक्तीचे तत्त्वज्ञान व वेदान्त वगैरे.

हनुमंताने गरुडाचे गर्वहरण करून श्रीकृष्ण रुक्मिणीस, रामचंद्र-सीतेचे रूप घ्यावयास लावल्याची जी कथा विष्णुदासनाम्याने गरुडगर्वपरिहारात वर्णिलेली आहे ती त्याने, नामा पाठकापासून उचललेली आहे. काही टिकाणी तर या दोन कवीत सारखीच रचना असल्याचे आपणास दिसून येते. उदाहरणार्थ हनुमंताने जेव्हा द्वारकेस येऊन श्रीकृष्णाच्या राखीव उद्यानाची मोडतोड आरंभिली तेव्हा बागेच्या रक्षकांनी त्याला राजाचे भय दाखविले. त्या वेळेस हनुमंताने त्यांना प्रश्न केला 'तुमचा राजा कोण आहे?' त्या वेळेस ते म्हणाले, 'कृष्ण बलराम' हे उत्तर ऐकून हनुमंताने प्रतिप्रश्न केला, 'रघुवंशातील रामाखेरीज हा दुसरा राम कोणता आहे?' उद्यानरक्षक म्हणाले, 'आम्हांस मर्कटांचा राजा राम ऐकून माहीत आहे!' हे उत्तर ऐकून हनुमंतास राग आला. त्याने त्या माळ्यांना मारण्यास सुरवात केली.[1] हाच कथाभाग नामा पाठक वर्णन करतो[2] –

वेधोनि हालवि तरुवर ।
तव ते हाकिती बनकर ॥
पाहा हो धिट कैसे वानर ।
म्हणोनि करे दाखविति ॥ ६४

तव तो उडाणे करितु । वृक्षे वृक्ष आदोळितु ॥
कौतुके फळे असे टाकितु ।
बनकरावरी परियसा ॥ ६५

तव ते म्हणति रे वानरा । धावों नको सैरावैरा!।
ठाउके होईल राजकुमरा ।
मग राजया जाणविति ॥ ६६

तयासि पुसे हनुमंत ।
कोण राजा असे नादतु ॥
तव ते म्हणति विख्यातु ।
रामकृष्ण परियसा ॥ ६७

मग हनुमंत म्हणे तयासि ।
काय भलतेचि रे बरळसि ॥
येकु राम सुर्यवंसि ।
दुसरा राम कैचा ॥ ६८

तव ते म्हणति स्वामि मर्कटांचा ।
आम्हीहि आयकिला हो तो ॥ ७६

१. विष्णुदासनाम्याच्या महाभारताचा विवेचनात्मक अभ्यास : पान ३२९.
२. नामा पाठककृत हनुमंत गरुडाख्यान, मराठी हस्तलिखित क्रमांक ६४४ (तंजावर). या प्रतीतील ओवी क्रमांक सर्वत्र (येथे व पुढे) आलेले आहेत.

आयिकोनि तयाचे उत्तर ।
रागे वाढिनला वानर ।।
उभारिला लोमांकुर ।
मिथ्या तारे पसरले ।। ७७

माळ्यांनी कथन केलेले वृत्त ऐकून श्रीकृष्णास कुतूहल वाटले, परंतु बलरामास संताप आला, तेव्हा त्या माकडाचे पारिपत्य करण्यासाठी श्रीकृष्णाने गरुडाचे नांव सुचविले. त्या वेळेस गरुडाने गर्वाने पुढे येऊन पैजेचा विडा उचलला. [1] नामा पाठक हेंच कथानक वर्णन करीत म्हणतो—

तव पुढा गरुड गर्वरासि ।
पंखि बहुबळे न माय आकासि ।।
गर्व जाणोनिया ऋसिकेसि ।
तयाप्रति बोलिला ।। १३६ ।।
अगा गरुडा माहा विरा ।
अरे तु समरंगणि परमधिरा ।।
वेगि जावे गा गरुडा ।
तयासि धरुणि आणावे ।। १३७ ।।
( गरुड म्हणतो )
केव्हडि असेल त्याचि सक्ति ।
जितुचि धरुनि आणिन तुम्हाप्रति ।।
भला भला म्हणोनि श्रीपति ।
यासि विडा दिधला ।। १४१ ।।

तेथून गरुड हनुमंतापुढे येऊन आपले शौर्य वर्णन करूं लागला. त्याची ती वल्गना ऐकून हनुमंत त्यास म्हणाला,

' जो सांगे आपुली कीर्ति ।
तो जाणावा मूढमती ।
स्वमुखे वर्णी स्वकीर्ति ।
तो वीर न म्हणावा '

तेव्हा गरूड रागावून त्याच्यावर चालून गेला. परंतु त्याचे बळ अवमानित हनुमंत पर्वतासारखा स्थिर राहिला. [2] नामा पाठक हा कथाभाग सांगत वर्णितो—

मग बोले हनुमंत विरु ।
भला भला गा बोल बोलसि धीरु ।।
नुसताचि बोलसि बडिवारु ।
काय सांगसि बाउगा ।। १५८ ।।
जो सांगे आपुलि किर्ति ।
तो जाणावा मुर्खमति ।।
नाम सारि हे गति तो । धिरु पै नव्हे ।।१५९।।
जिंतणे मोडणे हे क्षिति ।
अवघी जाण रे काळगति ।
तरि नाम सांगावे तुज मूर्खा उपपति ।
हे अनुचित जाण पा ।। १६२ ।।
ऐसे हेळणे शब्दाचे ।
वचन यैकोनि हनुमंताचे ।
रागे बळ केले पाखाचे ।
तयावरि चालिला ।। १६७ ।।
गगनि माहा नादु जाला ।
सिंहनादे गर्जिनला ।।
परम कोपे उडाला ।
गगनपंथे परियसा ।। १६८ ।।
कोपे भोवोन आकळि ।
बाह्या भुजा दंडे कवळि ।।
क्रोधे यउनीया जवळि ।
हनुमंतावरि लोटला ।। १६९ ।।
चंड चाचुचि पाति झडपितु ।
परि ते न मानि चि हनुमंतु ।।
जैसा भ्रमर गुंजारतु !
परि पर्वतु न ढळे ।। १७० ।।

नामा पाठक आणि विष्णुदासनामा या दोन कवीत आढळणाऱ्या रचनासादृश्याची कल्पना या उताऱ्यांवरून पूर्णपणे येऊ शकेल.

विष्णुदासनाम्याने या स्त्रीपर्वाच्या मुंबई प्रतींत वर्णिलेल्या, कृष्णदान, कृष्णाचे ब्रह्मचारित्व, कालियामर्दन, कृष्णविवाह, स्यमंतक मण्याचे आख्यान, इत्यादि कथांना हरिवंश, भागवतपुराणासारख्या संस्कृत ग्रंथांचा आधार असावा, असे वाटणे सहजशक्य आहे. परंतु तो तर्क सयुक्तिक ठरत नाहीं. कारण त्याने संस्कृत ग्रंथ पाहून जर आपल्या महाभारताची रचना करण्याचे मनात आणले असते

---

१. विष्णुदासनाम्याच्या महाभारताचा विवेचनात्मक अभ्यास पान–३२९–३३०
२. तत्रैव पान–३३०

तर त्याच्या महाभारताच्या स्त्रीपर्वात आणि संस्कृत महाभारताच्या स्त्रीपर्वात महद्‌दंतर आढळून आले नसते! असे महद्‌दंतर त्याच्या स्त्रीपर्वातच फक्त आढळते, असा भाग नसून त्याच्या महाभारताच्या इतरही पर्वांत ते दिसून येते, हे प्रस्तुत प्रबंधातील विष्णुदासनाम्याच्या महाभारताच्या अन्य पर्वांच्या झालेल्या तौलनिक अभ्यासावरून एकच निष्कर्ष निघू शकतो तो म्हणजे विष्णुदासनाम्याने, प्राकृत कवींच्या ग्रंथांवरून आपले महाभारत तयार केले असावे. हे विधान बळकट करणारे अनेक पुरावे आपणांस मिळू शकतात; त्यांपैकी नामा पाठकाचा निर्देश पूर्वी आलेला आहेच.

तेव्हा, या स्त्रीपर्वात आढळणाऱ्या श्रीकृष्णाच्या सर्व कथा, तसेच भक्ति, वेदान्त व तत्त्वज्ञानाचा भाग; ही रचना स्वतंत्र नसून ती त्याने गरुडगवपीरहाराच्या उसनवारी-प्रमाणेच कथाकल्पतरू या प्राकृत काव्य ग्रंथातून घेतलेली आहे. येथे आढळून येणारा कुतूहलजनक भाग असा की, कथाकल्पतरूच्या पूर्वार्धातील चवथ्या स्तबकातच, विष्णुदास-नाम्याने स्त्रीपर्वात वर्णिलेल्या जवळ जवळ सर्व सर्व कथा आढळून येतात; त्याचप्रमाणे भक्ति, वेदान्त तत्त्वज्ञानाचाही भाग तेथेच आढळतो!

ही आख्याने सांगण्यासाठी विष्णुदास-नाम्याने स्त्रीपर्वच का निवडावे कारण स्त्री-पर्वातील सर्वच वातावरण इतके कारुण्यपूर्ण बनलेले आहे की त्या ठिकाणी आख्यानकथा वर्णनांना कोणतीही वाव नसून, ही आख्याने ऐकण्याचा मनःस्थितीत सुद्धा त्या वेळेस कोणी नव्हते! तेव्हा येथे एकच कारण त्याबद्दल आपणांस दिसते, ते म्हणजे विष्णु-दासनाम्याने कथाकल्पतरूचे केलेले आंधळे अनुकरण! कथाकल्पतरूमध्ये, प्रसंगांचे तारतम्य न बघता, महाभारताची पर्वे वर्णन करताना, बाहेरच्या असंख्य कथा खचून भरलेल्या आढळतात. हाच दोष विष्णुदास नाम्याच्या महाभारतात शिरलेला न आढळला तरच केवळ नवल! त्यामुळे कथासकट कथांचीच नव्हे तर विष्णुदासनाम्याकडून दोषांचीही उसनवारी झालेली आहे!

सारांश, विष्णुदासनाम्याच्या महाभारताचे स्त्रीपर्व, ( कोणतीही प्रत ) स्थूलमानानें बघता, संस्कृत महाभारताच्या स्त्रीपर्वाच्या कोणत्याही प्रतीवर आधारित नसून त्यास बव्हंशी कथाकल्पतरूचा आधार मिळतो; हीच कल्पना या तौलनिक अभ्यासाने दृढ होते. तसेच रसोत्तिच्या दृष्टीने विचार करता, संस्कृत महाभारतातील स्त्रीपर्वात प्रत्ययास येणाऱ्या करुणरसाचा, विष्णुदासनाम्याच्या स्त्रीपर्वात संपूर्ण अभावच दिसून येत असून कारुण्याची हानी करणारी, अद्भुत, वीर, भयानक, हास्य या रसांवर अधिष्ठित अशी अप्रासंगिक रचना त्याने स्त्रीपर्वात केलेली आहे, असेच आपणांस स्पष्ट दिसते.

# संदर्भ-ग्रंथ


(१) इतिहास प्रसिद्ध पुरुषांचे व स्त्रियांचे पोवाडे. ऑक्वर्थ- शाळिग्राम. १९११.

(२) कथाकल्पतरु- छापील पोथी.

(३) कथाकल्पतरु- (गद्य) भाग १ ते ४ : प्रकाशक श्री र. दा. यंदे, आवृत्ति ४ थी

(४) चंद्रात्मज रुद्र उद्योगपर्व. भा. इ. सं. मं. पुणें हस्तलिखित क्रमांक २१,६६

(५) नागदेवाचार्य–स्मृतिस्थळे. वा. ना. देशपांडे १९३९

(६) नामापाठककृत–द्रौपदी वस्त्रहरण–सरस्वती महाल लायब्ररी तंजावर, मराठी हस्तलिखित. क्रमांक ८६८

(७) नामापाठककृत–हनुमंत–गरुडाख्यान. सरस्वती महाल लायब्ररी तंजावर, मराठी हस्तलिखित क्रमांक ६४४

(८) विष्णुदासनाम्याच्या महाभारताचा विवेचनात्मक अभ्यास. प्रा. डॉ. सरोजिनी शेंडे (Unpublished Ph.D. Thes is in the University Library Bombay)

(९) विष्णुदासनामा स्त्रीपर्व. सरस्वती महाल लायब्ररी तंजावर, मराठी हस्तलिखित क्रमांक १३९७

(१०) „ सौप्तिक भा. इ. सं. मं. पुणें, हस्तलिखित क्रमांक २२–१३०

(११) श्रीस्कंदपुराण. (६) नागरखंड. श्रीवेंङ्कटेश्वर मुद्रणालय, शके १८३१

(१२) लघुकाव्यमाला भाग ३ रा संपा. ना. चिं. केळकर १९०२

(13) Encyclopaedia of Religion and Ethics Vol. 1. Art Ed/- James–Hastings.

(14) Hindu Manners, Customs, and Ceremonies : Abbe. J. A. Dubois. Translated by Henry Beauchamp Oxford. 3rd edition.

(15) The History of Buddhist Ihought. E. J. Thomas 1953.

(16) The Mahabharata BORI Poona 4. critial edition.

(17) The Position of Women in Hindu Civilisation : Dr. A. S. Alekar; Benares 1938.




# तुलसीदासांची 'ज्ञानदीपिका'

ऑगस्ट ७ रोजी गोस्वामी तुलसीदास यांची जयंती असते व त्या निमित्ताने नागपूरच्या 'तरुण भारत'च्या ऑगस्ट ५, '६२ च्या अंकात डॉ. सदाशिव लक्ष्मीधर कात्रे (मॅन्युस्क्रिप्ट्स् ऑफिसर, नागपूर विद्यापीठ ग्रंथालय) यांनी एक लेख लिहिला आहे. गोस्वामी तुलसीदास यांनी रामायणावरील प्रसिद्ध रचना संवत १६३१ (१५७४) मध्ये लिहिली. ज्ञानदीपिका ह्या नावाच्या लहान ग्रंथाची जी प्रत हिंदी संशोधकांना मिळाली तिच्यावरून त्या ग्रंथाचा रचना काळ संवत १६३१ हाच ठरत असल्यामुळे हा ग्रंथ तुलसीदासांचा नसावा असे हिंदी संशोधकांचे मत झाले. हे मत बरोबर नसावे असे दाखविणारी 'ज्ञानदीपिके'ची एक हस्तलिखित प्रत डॉ. कात्रे यांना नागपूर विद्यापीठ ग्रंथालयाच्या संग्रही अलीकडे सापडली आहे. तिच्यामध्ये या ग्रंथाच्या रचनेचा काळ संवत १६३१ नसून संवत १६२२ असा स्पष्ट नमूद केलेला आहे; म्हणजे रामायणाच्या आधी दहा वर्षे हा ग्रंथ तुलसीदासांनी लिहिलेला आहे, असा डॉ. कात्रे यांचा निष्कर्ष आहे. 'ज्ञानदीपिके'चे समग्र परीक्षण करून रचनाशैली व विचारधारा या दोन्ही दृष्टींनी 'रामायण' व 'ज्ञानदीपिका' यातील साम्य दाखवून देणारा एक लेख ते हिंदी संशोधकांपुढे मांडणार आहेत. तुलसीदासांनी या दोन्ही ग्रंथात प्रतिपादन केलेले तत्त्वज्ञान 'केवळ शंकराचार्यांच्या अद्वैत ब्रह्मवादाचे आणि मायावादाचे अनुसरण करणारे आहे', 'कोणत्याही वैष्णव आचार्यांच्या प्रतिपादनाशी त्याचा मेळ बसत नाहीं' हा डॉ. कात्रे यांचा निष्कर्षहि चिंतनीय आहे. संतश्रेष्ठ ज्ञानेश्वर शांकर अद्वैताला मानणारे आहेत का नाहीत या प्रश्नासारखाच भक्तिमार्गी तुलसीदास तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने शांकरमतानुयायी आहेत की नाहीत हा प्रश्न आहे. या दोन प्रश्नांतील साम्य अनेक दृष्टींनी विचारात घेण्यासारखे आहे व यासंबंधीच्या वादात आणि विवेचनात मराठी व हिंदी संशोधकांनी विचारविनिमय करणे इष्ट होईल. तुलसीदास सारख्या श्रेष्ठ कवीच्या व संताच्या 'ज्ञानदीपिके' संबंधी नवा आणि संभवतः निर्णायक पुरावा उपलब्ध करून मराठी व हिंदी संशोधकांना डॉ. कात्रे यांनी ऋणी करून ठेवले आहे.

या निमित्ताने एक विनंती करावीशी वाटते ती अशी की संशोधनाच्या क्षेत्रातील अशा महत्त्वाच्या लेखांचा लाभ दैनिक व साप्ताहिक नियतकालिकांच्या वाचकांना व्हावयास हवा, परंतु असे लेख केवळ या नियतकालिकातूनच राहिल्यास त्यांची नोंद होणे अशक्यप्राय होते; यासाठी त्यांचे मासिके व त्रैमासिके यांतून पुनर्मुद्रण व्हावे. संशोधनालाच प्राधान्य देणाऱ्या नियतकालिकांतून हे पुनर्मुद्रण झाले तर उत्तमच. साहित्यसंस्थांच्या व ग्रंथालयांच्या कार्यालयांतून सर्व प्रकारच्या नियतकालिकांतून येणाऱ्या संशोधनाच्या लेखांची वर्गीकृत नोंदणी होणे शक्य झाले तर संशोधनाच्या दृष्टीने तेही फार सोयीचे व उपयुक्त होईल.

—दि. के. बेडेकर

# जनमेजयाच्या अठरा ब्रह्महत्या व विष्णुदासनामा *

— ना. ब. जोशी

संतोषमुनि कृष्णदासाच्या 'रुक्मिनी सैंवर' काव्याचा अभ्यास करीत असता श्रीकृष्ण-महिमेच्या ओव्या आढळल्या त्यातील एक ओवी अशी आहे—

आणि हेचि कथा बोलता भारत :
जयमुनीचे कुष्ट गेले
निभ्रांतः अठरा हत्या फीटलीया त्वरित :
जन्मेजयाचिया ।।

यातील हेचि कथा म्हणजे श्रीकृष्णकथा. 'भारत' ही श्रीकृष्णकथाच आहे असे संतोषमुनि समजतो.

जनमेजयाने भारत ऐकल्याने त्याच्या अठरा हत्यांच्या पातकाचा नाश झाला असे संतोषमुनि म्हणतो. परंतु जनमेजयाने अठरा हत्या केल्या होत्या व त्याच्या पापक्षालनार्थ त्याने भारत ऐकले असे महाभारतात तरी सांगितल्याचे दिसत नाही. पुराणांमध्येही अशी कथा कोठे असल्याचे वाटत नाही. मग ही अठरा हत्यांची कथा संतोषमुनीने कोठून घेतली हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. वैशंपायनाने ज्या जनमेजयास भारत सांगितले तो अर्जुनाचा पणतु—अभिमन्यूचा नातु व परीक्षितीचा मुलगा होय. यावरून असे दिसते की संतोषमुनीच्या वेळी एक कथा प्रचलित होती की परीक्षितीचा मुलगा जनमेजय याने अठरा हत्या केल्या होत्या व त्या पातकाच्या नाशाकरिता त्याने भारत ऐकले.

आता भारतामध्ये शांतिपर्वाच्या १५० ते १५२ या तीन अध्यायात एक कथा आली आहे, ती अशी:—धर्मराजाने भीष्माचार्यांना प्रश्न केला की, जे पातक बुद्धिपुरःसर केलेले नसते त्यांतून मनुष्याची मुक्तता कशी होते? त्यावर भीष्माचार्यांनी एक प्राचीन कथा धर्मराजास सांगितली. तिचा सारांश असा— पूर्वी परीक्षित् राजाचा पुत्र जनमेजय नावाचा राजा होऊन गेला. त्या राजाच्या हातून न कळत ब्रह्महत्या घडली तेव्हा त्याच्या पुरोहितासह सर्व ब्राह्मणांनी त्याचा त्याग केला, त्यामुळे तो राजा कष्टी होऊन अरण्यात निघून गेला. शोकाने ताप पावणाऱ्या त्या जनमेजयाने मोठी तपश्चर्या केली. पुढे तो शौनक कुलोत्पन्न इंद्रोतमुनीस शरण गेला. प्रथम इंद्रोतमुनीने जनमेजयाची फार निंदा केली, परंतु जेव्हा त्या जनमेजय राजाने आश्वासन दिले की, आता कायावाचामने ब्राह्मणाचा द्रोह करणार नाही तेव्हा त्या इंद्रोतमुनीने त्यास योग्य असा उपदेश केला व पातकनाशार्थ करावयाच्या धर्माचरणाची माहिती सांगितली. क्षार लावलेल्या मलिन वस्त्राचा मल जसा नाहीसा होतो त्याप्रमाणे कर्मनिष्ठ मनुष्याचे पातक नष्ट होते हा सिद्धांत सांगून इंद्रोतमुनीने जनमेजयाकडून अश्वमेध करविला त्यामुळे जनमेजय राजाचे ब्रह्महत्येचे पातक नष्ट होऊन तो पुन्हां आपल्या राज्यांत येऊन राज्य करू लागला.

भीष्माचार्यांनी धर्मराजास ही एक प्राचीन कथा म्हणून सांगितली असल्याने या कथेतील पारीक्षित जनमेजय हा ज्या पारीक्षित जनमेजयास वैशंपायनाने भारत सांगितले त्या जनमेजयाहून अगदी भिन्न व प्राचीन आहे हे उघड आहे. असे असता संतोष-

---

* भारत इतिहास संशोधक मंडळाच्या वार्षिक संमेलनांत दि. २८–५–६२ रोजी वाचलेला निबंध अवश्य त्या थोड्या फरकाने व काहीशा संक्षेपाने.

मुनीने भारतं कथा ऐकल्याने जनमेजयाच्या अठरा हत्यांचे पातक नाहीसे झाले हे कसे लिहिले हा प्रश्न उपस्थित होतो. त्याचे उत्तर विष्णुदासनामा या कवीने लिहिलेल्या भारताच्या आदिपर्वात मिळते. तेथे एक कथा सांगितली आहे. त्या कथेत याचा खुलासा मिळतो.

ती कथा सांगण्यापूर्वी ज्या हस्तलिखित पोथीच्या आधारें मी लिहिणार आहे तिची थोडी माहिती देणे योग्य वाटते. माझ्या माहितीप्रमाणे विष्णुदासनाम्याचे आदिपर्व अजून अप्रकाशित आहे. शिवाय विष्णुदासनाम्याच्या भारताच्या पोथ्यामध्ये पुष्कळ ठिकाणी फार महत्त्वाचे फरक दिसून येतात असे श्री वसंत पारखे यांनी म. सा. पत्रिकेच्या जानेवारी १९६२ च्या अंकात लिहिले आहे. त्यामुळे मजजवळील पोथीची थोडक्यात माहिती देणे अवश्य आहे.

मला आदिपर्वाची ही पोथी विजापुरातच मिळाली. तिचे एकूण ४९ अध्याय आहेत. या पर्वाची एकंदर ओवीसंख्या ४६५५ असल्याचे शेवटी नमूद आहे. शेवटच्या दोन ओव्या अशा आहेत—

**नामा विष्णुदास म्हणे : इतिहास अठरा पुराणे ॥**
**केली व्यासो नारायणे : भारत हा पाचवा वेद ॥**
अ. ४९ ओ. १२०
**इति श्री महाभारत आदिपर्व : जाले समाप्त सर्व ॥**
**पुढे असे सभापर्व : नामा म्हणे विष्णुदास ॥१२१॥**

प्रत लेखनासंबंधीचा मजकूर पुढीलप्रमाणे आहे.

**जंबुद्वीपा माझारी : दंडकारण्या भीतरी ॥**
**गोदातिर उतरपारि : प्रतिष्ठान नगरि ब्रम्हाची ॥१॥**
**ते नगरि अतिअपूर्व : तया तळी बिडकीन गाव ॥**
**तेथ प्रसिद्ध श्रीपतराव : ब्रम्हत्वी रत सदा ॥२॥**
**हे पुस्तक त्याहाच असे : लिहील विश्वनाथ वेंकटेशे ॥**
**बाळापुरी पेटेंत असे : विप्रचरणा जवळि ॥३॥**
**दैवत ज्याचे वैकुंटपति : शेशशाई त्रिमलपति ॥**
**शेशाचळि श्रीपति : विश्वमुर्ति विश्वात्मा ॥४॥**
**बरे वाइट यथा प्रति : लिहिले चुक सांभाळिजे संति ॥**
**मि अवित्पन्न बाळामति : नकळे वित्पत्ति मज काही ॥५॥**
**नृप शालिवाहन : शके १६५६ छेपन ॥**
**आनंद संवत्सर कार्तिकमास पुर्ण : पौर्णिमा गुरुवार ॥६॥**
**ते दीवसी समाप्त लेखन : जाले भगवत्कृपेन ॥**
**श्रीपतिचि दया पुर्ण : असो मजवरि ॥७॥**
**तोचि माझे दैवत : तोचि माझे गणगोत ॥**
**त्याचे ठाईं माझी प्रीत : असो नित्य सर्वदा ॥८॥**
**ग्रंथा आदी मध्ये अंति : अवघा असे श्रीपती ॥**
**संत चरणाचि संगति : असो मज सर्वदा ॥९॥**
**संपूर्णमस्तु (श्री) कृष्णार्पणमस्तु ॥**
**संख्या येकून ४६५५ वोवी ॥**

आता विष्णुदासनाम्याने आपल्या आदिपर्वात जी कथा दिली आहे तिच्याकडे वळूं.

एकदां अर्जुनाचा पणतू पारीक्षित जनमेजयाकडे व्यासो नारायण आले. जनमेजयाने त्यांचे यथोचित स्वागत केले. भोजनोत्तर जनमेजयाने व्यासांना म्हटले की काही धर्मचर्चा व्हावी अशी त्याची इच्छा आहे. त्यावर व्यास म्हणाले की तुझ्या पूर्वजांचीच कथा तुला सांगतो ती ऐक.

**हे कथा आईकता : पाप क्षाळण होये सर्वथा ॥**
**येणे ब्रम्हहत्या फीटती सर्वथा: येर पातके केन्हडि ॥**
**जे त्रिदोश निवारणि : आणि तापत्रये हारनि ॥**
**ब्रम्हहत्या विनाशणि : भारथी कथा जन्मोजया ॥**

अगोदरच जिची रचना केली होती अशी भारतिकथा सांगण्यास व्यासांनी सुरुवात केली. त्यानी जनमेजयाच्या राज्यारोहणापर्यंतची सर्व कथा संक्षेपाने सांगितली. त्यावर जनमेजय व्यासांना म्हणाला,

तुम्ही जे कथा सांगितिली: ते मज वाटे वीपरीत बोली ॥
ऐसी करणि पांडवि केलि : जे गोत्रज मारिले ॥
व्हावी कुळवंश वृधी : हा बोल जगप्रसिधी ॥
तेहि धरिलि दृष्ट बुधी : गोत्रज मारिले देखा ।
गुरु आणि पूर्वज वधीले : येकोत्तरशत वंधु मारिले ॥
ते चरित्र नायेकीजे भले : हे परिसाजि देवा ॥
आणि येके स्त्रियेसि पाच पतिः हे कोण विपरीत गति ॥
तरि श्रमु नुपजे तुमचा चित्ति : कथा सांगता याचि ॥
ते न उचारा वेदमुर्ति : महा अपराध घडति ॥
पांडवांचि जे कीर्ति : ते नायको श्रवणि आम्हि ॥
परिसा वद्रिनारायेणा : श्रवणि न वैसे वासणा ॥
पाप केले दारुणा जाणा : म्हणौणि मज नायिकवे ॥
अध्याय १ ओ. ८२ ते ८७

जनमेजयाचे हे भाषण ऐकून व्यास क्रोधाविष्ट झाले व त्यानी जनमेजयास शाप दिला.

व्यासु म्हणे जन्मोजया : धर्मकथा खंडिलि वाया ॥
पाप नासे ऐकिलिया : धर्मकीर्तणे ॥८९॥
धर्मनिंदा करिति : तयासि कैचि गति ॥
कुंभपाकि पचति : कर्मबंध ते मुढ ॥९१॥

तुझ्या पूर्वजांची, पांडवासारख्या महात्म्यांची तू निंदा केलीस हे मोठे पातक केले आहेस. "तरि तुज ब्रह्महत्या थोर : घडेल" श्रापुनि गेला रुशेश्वर. व्यास जनमेजयास शाप देऊन इंद्राकडे आले. इंद्राने व्यासांचे स्वागत केले व त्यांच्या येण्याचे कारण विचारले तेव्हा व्यास—

म्हणे जन्मोजयो नृपति : पांडवासि निंदीति ॥
तरी त्यासि ब्रम्हहत्या घडति : ऐसा उपावो देखिजे ॥१०१॥
मग मिळोनिया देव : रचिलि कोन्हि येक माव ॥
पुढील कथा असंभाव्य : ते आईका श्रोतेहो ॥१०२॥
सुकरीचा जठरी : जे नोघेल राजकुमारी ॥
तीचेनि संगे निर्धारी : ब्रम्हहत्या पडति ॥१०३॥
आणि मावेचा वारु : श्यामकर्ण समान सुंदरु ॥
तो मोले घेईल नृपवरु : विघ्न संचारु पं तोचि ॥ १०४ ॥

याप्रमाणें पहिल्या अध्यायात कथेचा प्रस्ताव झाला आहे. २-३-४ अशा तीन अध्यायात विष्णुदासनामा जनमेजयाच्या हातून ब्रह्महत्या कशा घडल्या तो वृत्तान्त देतो.

दुसऱ्या अध्यायात उत्तंग ऋषि ध्यानरत असताना त्याचा कमंडलु तक्षकाने पाताळात पळवून नेला. ते उत्तंगाने भानावर आल्यावर जाणले व त्याने पन्नगकुल संहार करण्याचा निश्चय केला, त्याच्या त्या सर्पकुळ संहाराचा जनमेजयावर परिणाम झाला व त्यास आपल्या पित्याच्या घातास कारण झालेल्या सर्पकुळाचा नाश करण्याची इच्छा झाली व व्यासांना त्यावद्दल विचारले. व्यासांना जनमेजयाच्या पापांना सुरुवात झाल्याचे दिसले. जनमेजयांनं मार्गशीर्ष महिन्यांत अनेक द्विजांना बोलावून सर्पयज्ञ प्रारंभिला, एवढा भाग आला आहे.

तिसऱ्या अध्यायात आस्तिकाच्या प्रयत्नाने जनमेजयाचा सर्पयज्ञ कसा उध्वस्त झाला ही कथा आली आहे. यज्ञ उध्वस्त झाल्याने राजा फार कष्टी झाला. त्याने व्यासांचे पाय धरले, पुढील उपाय सुचविण्याची त्यांना विनंती केली. त्यावर व्यास

म्हणाले की तू पूर्वजांची निंदा केली आहेस त्यामुळे तुजवर संकटे ओढवत आहेत. ती तशीच जास्त वाढत जाऊन तुझा नाश करतील अशी भीति वाटते. तरीपण ती टाळावयाची तुझी इच्छा असल्यास मी सांगतो त्याप्रमाणे वाग. व्यास म्हणाले, " येथे लवकरच काही घोडे विकावयास येतील ते श्यामकर्णापेक्षा सुंदर दिसतील पण ते विकत घेऊं नकोस. जरी एखादा घेतल्यास तरी त्यावर बसून शिकार करू नको. कदाचित त्यावर बसून शिकारीस गेलास तरी एखादे सोरू-सूकर पाहशील तो मारू नको. मारलास तरी त्याचे पोट फाडू नको. जरी पोट फाडण्याचा मोह झाला तरी त्या पोटात एक पेटी दिसेल तिला स्पर्श करू नको. निदान ती उघडून तिच्यात असलेल्या सुंदर मुलीशी विवाह करू नको. तो मोह जरी टाळता आला नाही तरी तिच्या मोहक शब्दांना भुलून कोणतेही कार्य करू नकोस. जर तू तिच्या म्हणण्याप्रमाणे वागशील तर तुझ्या हातून ब्रह्महत्या घडतील. " याप्रमाणे आगामी पातकाची सूचना देऊन व्यास बद्रिकाश्रमास निघून गेले.

जनमेजयाच्या हातून करू नको म्हटलेल्या सर्व गोष्टी घडल्या. सूकराच्या पोटात मिळालेल्या स्त्रीबरोबर त्याने लग्न केले व तो तिजबरोबर राजवाड्यात राहू लागला. काही काल गेल्यानंतर परीक्षितीच्या एका श्राद्धदिनी त्याने ब्राह्मणांना बोलाविले. ते ब्राह्मण त्यास म्हणाले, " तू अष्टकुळ सर्प संहारिले आहेस त्या पातकाच्या क्षालनार्थ तू श्यामकर्ण अशा अश्वाचा मेध कर व इतरहि सुवर्णादि दाने दे. " या त्यांच्या सल्ल्याप्रमाणे यज्ञ चालू झाल्यावेळी त्या श्यामकर्ण अश्वाने अशिष्ट असे अंगविक्षेप केले ते पाहून ते ब्राह्मण हसले. ते यज्ञात भाग घेत होते. राजा ते पाहून संतापला व त्याने त्या ब्राह्मणांना हाकून दिले. तो श्यामकर्ण अश्वहि गुप्त झाला. जनमेजय, व्यथित अंत:करण, त्या मोहिनीसह राहू लागला.

चौथ्या अध्यायात यापुढील कथा आहे. पुढे कोणे एके दिवशी राजा व राणी एकांतात असता राणी हसून म्हणाली " तुम्ही सर्पयज्ञजन्य पातकाच्या निवृत्तीकरिता अश्वमेध सुरू केला तो सिद्धीस गेला नाही. तरी मी सांगेन तसे करावे. चांगले वेदविद ब्राह्मण बोलावून यज्ञ सुरू करावा. तो यथासांग पार पडेल याची, सर्व तऱ्हेचा बंदोबस्त करून, काळजी घ्यावी. " राजाने तसे करण्याचे कबूल केले व देशोदेशीचे वेदज्ञ ब्राह्मण बोलाविले. त्यातून अठरा जणांची यज्ञाकरिता निवड केली. यज्ञाचे वेळी प्रेतपिशाच्चादि कशाचा त्रास होऊ नये म्हणून त्या अठरा ब्राह्मणांनी जल अभिमंत्रून यज्ञमंडपाभोवती त्याचे सिंचन केले. त्या जलाची शस्त्रे झाली व ती भोवती रोवून ठेविली. नंतर रात्र होऊन अंधार पडल्या वेळी ते अठरा ब्राह्मण झोपले. राजा पूर्णाहुति देण्याकरिता आला तो त्यास अठराही ब्राह्मण झोपलेले दिसले. त्यांना जोराने हाका मारून उठविल्यास त्यांच्या निद्राभंगाचे पातक लागेल असा राजाच्या मनात विचार आला, तेव्हा ती राणी त्यास म्हणाली की, " त्या ब्राह्मणांनी अभिमंत्रून ठेविलेले जल जवळच आहे तेच त्यांचेवर शिंपडल्यास ते जागे होतील, त्या करण्यात कोणताही दोष घडणार नाही. " राजास तिचा सल्ला मानवला व त्याने ते जल त्या अठराही ब्राह्मणांवर शिंपडले. ते जल त्या ब्राह्मणांच्या अंगावर पडताच त्याची शस्त्रे झाली व ती त्या अठरा ब्राह्मणांच्या अंगात रुतून रक्त वाहू लागले. ते अठराही ब्राह्मण थोड्याच वेळात मृत झाले. जनमेजयास फार वाईट वाटले. आपण काही चांगले करावयास जावे तर त्यातून पापाचीच निष्पत्ति होते हे पाहून

तो फार खिन्न झाला. त्याला आपण आपल्या पूर्वजांची निंदा केली त्या पापामुळेच आपणास प्रत्येक कार्यात अपयश येत आहे असे पक्केपणी वाटले व प्राणत्याग हाच त्यावर उपाय असेही त्यास वाटू लागले. त्याने राजमंदिरात जाऊन एक चंद्राकार खड्ग घेऊन ते शिरावर टेविले. तोच त्यास विचार आला की आत्मघात हेहा ही एक महापातक आहे. तेव्हा व्यासांनाच शरण जावे म्हणजे ते आपली या सर्व संकटातून सोडवणूक करतील. त्याने व्यासांचे स्मरण केले व ते प्रकट झाले. त्यांना जनमेजय म्हणाला, "मी पूर्वजांची निंदा केली म्हणूनच माझ्या हातून ब्रह्महत्या घडल्या, तरी कृपा करून माझा उद्धार करावा. मी पूर्वजांच्या निंदेच्या व ब्रह्महत्यांच्या पातकापासून मुक्त होईल असा उपाय सांगावा." व्यास म्हणाले, "तरि मी सांगतो परियेसि : जरी प्रीतीने भारत ऐकसि। कल्पना सांडुनि मानसि : तरि पावसि व्येदेहो ॥" मग सद्गदित होऊन राजा म्हणाला,

"भारत सांगिजे वहिले : मज आता उधरिले : पाहिजे स्वामिया ॥४६॥ ऐसे ऐकोनि विज्ञापणा : व्यास म्हणे परिक्षित नंदणा ॥ कोठे जाऊ नेदी मना : येकाग्रता करावी ॥४७॥ तु म्हणसि कथा सत्य की मिथ्याभुत : तरी वस्त्र आणावे अठरा हात ॥ त्यासि कलंक लावावा वहुत : ते वांधावे मंडपी ॥४८॥ ऐकसी येक येक पर्व कथा : हातभर वस्त्र उजळेल सर्वथा ॥ ऐसि अठरा पर्वे ऐकता : कापड होइल शुद्ध ॥४९॥ मनी उगाच संशयो धरिसी : तरी शुद्धता न ये कापडासि ॥ कल्पना टाकुणि कथेसि : नेम निष्ठे ऐकिजे ॥५०॥

नंतर व्यासांनी वैशंपायनास बोलावून जनमेजयास भारत कथन करण्यास सांगितले. राजा ते ऐकून सर्व पापांपासून मुक्त झाला. थोडक्यात ही कथा अशी आहे.

या कथेत दिसून येईल की विष्णुदास नाम्याने भारताच्या शांतिपर्वामधील पारिक्षित जनमेजयाचा व त्याच्या नंतर शेकडो वर्षांनी झालेल्या पारिक्षित जनमेजयाचा घोटाळा केला आहे. या अशा अनैतिहासिक कथा पूर्वी सांगितल्या जात. आजची ऐतिहासिक दृष्टी त्या काली सहसा नव्हती. याचे आणखी एक उदारण द्यावयाचे झाल्यास फार प्राचीनकाली होऊन गेलेल्या विदर्भाधिपति दमयंतीपित्या भीष्मकाचा ब्राह्मण सुदेव व त्यानंतर शेकडो वर्षांनी होऊन गेलेल्या रुक्मिणीपित्या भीष्मकाचा, कृष्णाकडे रुक्मिणीचा निरोप घेऊन गेलेला, ब्राह्मण यांचा नावाबावत चक्रधराने केलेला घोटाळा. चक्रधराने सुदेव हे प्रथम होऊन गेलेल्या ब्राह्मणाचे नाव नंतरच्या ब्राह्मणास दिले व तेच आता रूढ होऊन बसले आहे. विष्णुदासनाम्याने हरिदासी पद्धतीवर हे ब्रह्महत्येचे कथानक भारताचे महात्म्य सांगण्याच्या हेतूने रचलेले दिसते. जनमेजयाकडून अठरा ब्रह्महत्या घडविल्या व अठरा पर्वांची सांगड त्याने घातली. पापक्षालनाचे प्रात्यक्षिक म्हणून अठरा हात मलिनवस्त्र स्वच्छ होत गेल्याची कल्पनाही त्याने येथे आणिली. ही कल्पना त्यास शांतिपर्वातील पारिक्षित जनमेजय कथेमधील खालील श्लोकावरून सुचली असण्याचा बराचसा संभव आहे.

कृत्वा पापं पूर्वमबुद्धिपूर्वं
  पुण्यानि चेत्कुरुते बुद्धिपूर्वकम् ॥
स तत्पापं नुदते कर्मशीलो
  वासो यथा मलिनं क्षारयुक्तम् ॥३४॥
अ. १५२

त्या कथेत जनमेजयाने अश्वमेध केल्याचाहि भाग आहे (श्लोक ३८). याप्रमाणे त्या मूळ जनमेजय कथेच्या विलक्षण

कलाटणी देऊन, भारतश्रवणाची महति सांगण्याकरिता ही नवी कथा विष्णुदास नाम्याने आपल्या भारतामध्ये घातली. संतोषमुनीने या कथेचाच, आपल्या रुक्मिनी सैंवरात, उल्लेख केला आहे असे स्पष्ट दिसते. संतोषमुनि भारत ही कृष्णकथाच आहे असे म्हणतो. विष्णुदासनामाही भारताला कृष्णचरित्रच मानतो.

**गोकुळी अवतरला कृष्णनाथ : तो या कथेचे दैवत ॥**
**साधु संरक्षी दृष्ट निर्दाळित : स्थापना करित धर्माची ॥**

अध्याय १, ओवी १६

आतापर्यंत संतोषमुनीने उल्लेखिलेल्या जनमेजयाच्या अठरा हत्यांच्या मूळाचा शोध घेतला. पण या लेखाचा तोच फक्त उद्देश नाही. याचा विष्णुदास नाम्याच्या कालावर काही प्रकाश पडतो काय हे पहावयाचा दुसरा हेतु आहे, पण त्याच वेळी तो अत्यंत महत्त्वाचाही आहे.

विष्णुदास नाम्याच्या कालाबद्दल अद्याप कोणताही ठाम निर्णय नाही. श्री. वि. ल. भावे त्यास एकनाथांचा समकालीन अथवा थोडासा अगोदरचा समजतात तर श्री. पांगारकर त्यास एकनाथांचा समकालीनच मानतात. कोणी यास शके १५१७ च्या आसपासचा म्हटले आहे. याप्रमाणे याच्या कालाबद्दल बराच मतभेद दिसून येतो. कालाप्रमाणे याच्या जातीविषयीही निश्चितपणा नाही. कोणी त्यास शिंपी, कोणी ब्राम्हण व कोणी महानुभाव म्हटले आहे. या सर्वांचा गुंता उकलणे फार कठीण आहे. त्याच्या कालाबाबत काहीशी निश्चितता संतोषमुनीच्या वर लिहिलेल्या उल्लेखावरून होणे शक्य आहे. तिचाच विचार येथे प्रस्तुत आहे.

संतोषमुनीने जनमेजयाच्या अठरा हत्यांचा अशा भाषेत उल्लेख केला आहे की ही कथा लोकांच्या चांगलीच परिचयाची आहे. ती कोठील व काय हे सांगावयाची बिलकूल आवश्यकता नाही, इतकी ती नित्य श्रवणातील वा वाचनातील आहे. याचा अर्थ संतोषमुनीच्या काळी हा, विष्णुदास नामाकृत, भारत ग्रंथ सर्व थरांतल्या लोकांना चांगला माहीत होता. इतकी प्रसिद्धि मिळण्यास त्या काळच्या साधनांचा विचार करिता, कमीत कमी पन्नास ते पाऊणशे वर्षे तरी पाहिजेत. या दृष्टीने संतोषमुनीच्या 'रुक्मिनी सैंवर' काव्याच्या रचनेचा काल निश्चित झाला पाहिजे. सुदैवाने हे काम बरेच सोपे आहे.

शके १६४१ विकारी संवत्सर माघ शुद्ध प्रतिपदा शुक्रवार या दिवशी पौषदाख्यमुनीने संतोषमुनीच्या रुक्मिनी सैंवर काव्याची शोधनी केली. हा उल्लेख त्याच्या ग्रंथात अगदी स्पष्ट आहे. यावरून संतोषमुनीने याच्या अगोदर बरीच वर्षे आपले काव्य लिहिले हे उघड आहे. संतोषमुनीने आपल्या ग्रंथांत ग्रंथरचनेचे स्थळ, संवत्सर नाम तिथि मास, वार वगैरे सर्व नमूद केले आहे. फक्त शकवर्ष दिले नाही. ओव्या अशा—

**कुकुमठान ग्राम गंगातीरी : तेथे ग्रंथ आरंभिला सींगेश्वरी :**
**तो संपुर्न सोधी गेला श्रीनगरी : भीलमठी जाना ॥३२०४॥**
**गुरुवार सुद्ध फाल्गुनु : द्वितीया तीथी आनंददीनु : तै श्रीनगरी ग्रंथ जाला संपुर्नु : श्रीरुक्मिनी सैंवर ॥ ३२०५ ॥**
**ऐसा समग्रही जाला ग्रंथु : सीद्ध पावला मासा येका आतु:**
**कवी संतोषमुनी म्हने श्रीकृष्णनाथु : पावो प्रीती स्वामि माझा ॥ ३२०६॥**

संतोषमुनीने शकवर्ष आकड्यात न दिल्याने तर्कास जागा झाली. पौषदाख्याने आपल्या शोधनीत १४७५ हे वर्ष दिले

आहे परंतु त्या वर्षी आनंद संवत्सर येत नाही. ते शके १४७६ मध्ये येते. फक्त संवत्सर नाम जरी बरोबर असले तरी त्या वर्षी तिथी, वार, मास यांचा मेळ पहावा लागतो तो तसा न पहाताच हे शकवर्ष महाराष्ट्र सारस्वतात व इतर ठिकाणीही दिले गेले आहे. प्रा. ग ह. खरे यांनी माझ्या विनंतीस मान देऊन मला शक, वर्ष वगैरेबद्दल माहिती पुरविली त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. त्या माहितीवरून पाहता शके १४१६, १४७६ व १६५६ या तीन वर्षी आनंद संवत्सर येतो व शके १४१६ व १६५६ या दोन वर्षी सर्व गोष्टी जमतात. परंतु पौषदाख्य:ने शके १६४१ मध्ये शोधनी केली असल्याने शके १६५६ चा काही उपयोग नाही. शके १४७६ मध्ये आनंद संवत्सर येत असला तरी फाल्गुन शुद्ध द्वितीयेस शनिवार येतो त्यामुळे तो शक उपयोगाचा नाही. शके १४१६ मध्ये मात्र फाल्गुन शुद्ध द्वितीया गुरुवारी सूर्योदयानंतर १ घ. ४४ प. नी येते म्हणून हा शकच संतोषमुनीच्या 'रुक्मिनी सैंवर' काव्याच्या रचनेचा शक मानावा लागतो. भाषा वगैरे दृष्टीने हाच शक योग्यही दिसतो. या १४१६ शकाच्या निदान पन्नास ते पाऊणशे वर्षे अगोदर विष्णुदासनाम्याने आपले भारत लिहिले असावे. याप्रमाणे पाहता शके १३५० च्या सुमारास अथवा त्याच्याही अगोदर काही वर्षे विष्णुदासनामा होऊन गेला असावा. संतोषमुनी सहसा नरेंद्राचे अनुकरण करतो. नरेंद्राने भारतमहिमा व जनमेजयाच्या अठरा हत्या यांचा उल्लेख आपल्या रुक्मिनी सैंवरात केला नाही तेव्हा नरेंद्रानंतर हे विष्णुदासनाम्याने भारत लिहिले असावे व प्रसिद्धीही नंतर मिळाली असावी. त्यामुळेच संतोषमुनीने त्या कथेचा भारत महिमा—एक कृष्णकथा म्हणून—सांगण्याच्या उद्देशाने उल्लेख केला असावा. नरेंद्राने आपले काव्य शके १२१४ च्या सुमारास लिहिले व संतोषमुनीने आपले काव्य १४१६ मध्ये लिहिले, या दरम्यान विष्णुदासनामा होऊन गेला असावा. याप्रमाणे पाहताही शके १३५० च्या अगोदर थोडासा हा विष्णुदासनामा होऊन गेला असावा असे मानावे लागते.

भारत लिहिणारा हा विष्णुदासनामा, शुकाख्यान लिहिणाऱ्या, मन्मथनाम संवत्सर (शके १५१७) मधील विष्णुदासनाम्याहून भिन्न आहे हे निराळे सांगावयास नको. विष्णुदासनामा या नावाचे दोन अगर तीन कवि होऊन गेले असे समजण्यास वाव आहे

भारतकार विष्णुदासनाम्याची भाषाही एकनाथपूर्व असावी असे वाटते. त्या आदिपर्वात उर्दू अथवा फारशी व्युत्पत्ति असलेले मला फक्त तीनच शब्द आढळले. ते म्हणजे खानवटा (अ. ३ ओवी ४०) आदावत (अ. ११ ओं. १०४) व खस्तावस्त (अ. ४९ ओं. १५). फार बारकाईने पाहिल्यास कदाचित् आणखी एखाद दुसरा शब्द आढळेलही. ग्रंथाची भाषा सोपी व आबालवृद्धांना सहज समजण्याजोगी आहे. त्याच्या संबंध भारताची जुन्यात जुनी पोथी मिळाल्यास त्याचेवर आणखी प्रकाश पडेल. पण तो कालांतराचा प्रश्न आहे.

वरील विवेचन लक्ष्यात घेता भारतकार विष्णुदासनामा शके १३५० च्या सुमारास अगर जरा अगोदर होऊन गेला असावा असे समजावयास हरकत नाही.

———

# मराठी 'अभ्यस्त' शब्दांची पार्श्वभूमि

— ग. वा. तगारे

डॉ. द. गं. कोपरकरांनी म. सा. पत्रिका (जुलै १९६२) पृ. १५–१८ मध्यें 'मराठी जोडशब्द' या लेखाने मराठी भाषाशास्त्रांतील एका सापेक्षतया उपेक्षित भागाकडे लक्ष वेधण्याची चांगली कामगिरी केली आहे. 'मराठीतील अभ्यस्त शब्दांचा शास्त्रीय अभ्यास अजून झाला नाही' या त्यांच्या विधानाशी मी सहमत आहे. पण त्यांनी, डॉ कत्र्यांनी 'अभ्यस्त' (Reduplicative) हा पारिभाषिक शब्द ज्या व्यापक अर्थी (Reduplicatives in Indo-Aryan) 'भारतीय-आर्यभाषातील 'अभ्यस्त' शब्द' या डेक्कन कॉलेज बुलेटिन (१.१.६० ७०) मधील लेखात वापरला व पुढे डॉ. तुळपुळे वगैरे पंडितानी स्वीकारला (पाहा–यादवकालीन मराठी पृ २७८ पासून पुढे), त्या अर्थी तो न स्वीकारता जुन्या मराठी व्याकरणकारांची अव्याप्त व्याख्या का स्वीकारली कळत नाही. प्रस्तुत लेखात 'पूर्णाभ्यस्त', 'अंशाभ्यस्त' शब्दांचे बरोबर 'ध्वन्यनुकारी', (onomatopoetic), 'सादशब्द' (echo-words), 'आम्रेडित' यांचाही समावेश 'अभ्यस्त' शब्दात केला आहे.

'अभ्यस्त' शब्द मराठीचे किंवा अर्वाचीन आर्यभाषांचे वैशिष्ट्य आहे असे मानण्याचे कारण नाही. भाषाशास्त्रावरील येस्पर्सन किंवा ब्लूमफील्ड या जुन्या ग्रंथकारांचे लिखाणावरून हा मानवी भाषांचा विशेष असल्याचे आढळते. 'आर्य' भाषा कुलापुरते मर्यादित बोलावयाचे झाल्यास आर्यभाषेच्या प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन अवस्थात आपणाला 'अभ्यस्त' शब्द आढळतात. (पाहा–प्राचीन भारतीय आर्यभाषासाठी वाकरनागेल— Altindische Grammatik II- 1 § 2 § 59-61) मध्ययुगीन–भारतीय–आर्यभाषासाठी पिशल– 'प्राकृतभाषांचे व्याकरण' § ५५८, गायगर– 'पाली साहित्य आणि भाषा' § १८६, मराठीसाठी-शं. गो. तुळपुळे 'यादवकालीन मराठी' पृ. २७४–८६, कृ. पां. कुलकर्णी–व्युत्पत्ति कोश प्रस्तावना पृ. ११९–१२०, भारतीय आर्यभाषासाठी डॉ. कत्रे-Reduplicatives in Indo-Aryan इत्यादि ही यादी वानगी दाखल दिली आहे). भाषाशास्त्राच्या इतर शाखांच्या मानाने यावरील लेखन जरी कमी झालेले असले तरी मराठी अभ्यस्त शब्दांच्या अभ्यासाच्या दिशा स्पष्ट करण्यास ते पुरेसे आहे.

ऐतिहासिक भाषाशास्त्राच्या दृष्टीने महाराष्ट्री प्राकृत व मराठी यांच्या मधील 'अपभ्रंश' या अवस्थेचा विचार केल्यास मराठीतील 'अभ्यस्त' शब्दांची पार्श्वभूमि स्पष्ट होते. उदाहरणार्थ आपण 'अभ्यस्त' शब्दांचे काही प्रकार घेऊ. ही उदाहरणे दाक्षिणात्य अपभ्रंशातील असून त्यांचे मराठी पर्याय तुलनेसाठी दिले आहेत.

**(१) ध्वन्यनुकारी** (Onomatopoetic)

**नामें** : झडप्पण (झडपणे), ढेक्कार (ढेकर, डरकाळी), धसक्क (धसका), पुक्कार (पुकारा) इ.

**क्रियापदें** : करयर– (करकरणे), कलयल– (कलकल करणे), खलहल– (खळाळणे), खुसखुस– (खुसखुजणे, कुजबूज करणे), धगधग– (धगधगणे), सलसल– (सळसळणे), हक्कार– (हकारणे, मोठ्याने हाक मारून बोलावणे) इ.

**क्रियाविशेषणे :** – त्ति ( इति ) 'अशा प्रकारे' या अर्थी शब्द वापरून, तोडइ तडित्ति ( ताड्कन-ताड्दिशी तोडतो ), घुट्टइ घडत्ति ( घुट्कन् किंवा घटकन पितो )

**आम्रेडित**

जुन्या आर्यभाषांत ( संस्कृतमध्ये ) नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापद, क्रियाविशेष इत्यादि शब्द प्रकारांत 'आम्रेडित' म्हणून संस्कृत व्याकरणात मान्यता पावलेले शब्द आढळतात. अपभ्रंशामध्ये हाच प्रकार आढळतो. उदाहरणार्थ :—

**नामे:**– खणिखणि (क्षणोक्षणी), जम्मि-जम्मि ( जन्मोजन्मी ).

**क्रियापद :** कढ–कढ ( कढकढणे ), वड वड (वडबडणे), उठ–उठ (ऊठ-ऊठ करणे ).

**साद-शब्द ( Echo-words )**

खल–भलिय < खल–भल ( खळबळ होणे ), झल–हल ( झळाळणे ), हल–बोल (हल–कल्लोळ, ० बोल) इत्यादि

**अंशाभ्यस्त शब्द**

अर्वाचीन आर्यभाषांत मूळ शब्दाच्या केवळ एका अंशाचा–भागाचा–अभ्यास किंवा पडसाद म्हणून त्याच्याच सारखा पण अर्थहीन शब्द जोडला जाऊन अंशाभ्यस्त शब्द निर्माण होतात. उदाहरणार्थ :—

**गुजराती :** 'जरी–मरी' ( साथ ), चलन–वलन ( हालचाल ),

**हिंदी :** इधर–उधर ( इकडे–तिकडे ),

**मराठी :** खाजगी–भाजगी, रमत–गमत. इत्यादि

अर्वाचीन आर्यभाषांत ही प्रवृत्ती मोठ्या प्रमाणावर आढळली तरी हिचे मूळ आपल्याला अपभ्रंश-अवस्थेत आढळते. उदा.

अप–कलमल ( कालुष्य, ईर्ष्याजनित खेद ) मराठी 'कळमळ' तल्लोविल्ली ( गोंधळ, उतावीळ ) गुजराती–तालावेली

कालांतराने शब्दांचा मूळ अर्थ बदलत जाऊन नवीन अर्थछटा येतात हे परिचित आहेच.

**मराठी :** 'उतरंड' या अर्थी 'वट्ट + उत्तिविडि' = वट्टुत्तिविडि किंवा रुद् + घूर्ण् पासून 'रुलुघुलन्त' हे असे शब्द अपभ्रंशात आढळले तरी त्यांना द्विमुखी जोड शब्द ( Blends ) म्हणता येईल की नाही शंका आहे.

सारांश मराठी 'अभ्यस्त' शब्दांचा अभ्यास करताना त्यांची अपभ्रंश अवस्थेतील पार्श्वभूमि लक्षात घ्यावी. मराठीचा अभ्यास करताना तिच्या भारतीय–आर्य व द्राविड भाषाभगिनी यांचाहि विचार करावा लागतो. आणि या व्यापक पार्श्वभूमीवर या शब्दांचा अभ्यास आम्हास वाचावयास मिळावा अशी अपेक्षा आहे.

———

अनुक्रमणिका

# टीपा आणि पत्रें

मा. संपादक, सप्रेम नमस्कार वि. वि.

नुकत्याच प्रकाशित झालेल्या महाराष्ट्र साहित्य-पत्रिकेच्या त्रैमासिकाच्या अंकांत डॉ. प्रो. कोपरकर यांचा भाषेतील जोड शब्दांसंबंधी एक लेख प्रसिद्ध झाला आहे. त्या लेखातील शेवटच्या भागांत ( पा. १८ ) लखकांनी दोन भिन्न शब्द मिळून एक शब्द तयार होऊन तो रूढ होण्याची भाषेची प्रवृत्ति वर्णन करण्याच्या संदर्भात कांहीं इंग्लिश शब्दांची उदाहरणे दिली आहेत. त्यांत Tram आणि Rail पासून टमरेल शब्द तयार झाला असेहि एक उदाहरण दिले आहे. पण टमरेल हा शब्द इंग्लिशमधील Tumbler पासून झाला असावा, असे दिसते. कारण अर्थप्रक्रियेच्या दृष्टीने टमरेल tumbler पासूनच व्युत्पादिता येतो. ऑक्सफर्ड कोशात पुढीलप्रमाणे अर्थ दिला आहे.

(I) Tumbler :-Stemless drinking glass ( formerly with rounded bottom so as not to stand upright. )

त्याचप्रमाणे त्याच कोशात दुसरा (II) tumbrel शब्द आहे. त्याचे अर्थ (1) two-wheeled covered cart for carrying tools, ammunition;(2)Dung-cart. असे दोन दिले आहेत. कोश इतर शब्दांच्या बाबतीत मूळ व्युत्पत्ती देतो. तशी या दोन शब्दांच्या बाबतीत देताना tumbrel बद्दल 'ट्युटॉनिक ओरिजिन्' असा उल्लेख आहे, tumbler बद्दल विशेष उल्लेख नाही. डच, जर्मन या भाषातील समानार्थक शब्द दिले आहेत.

ही एक सहज वाचता वाचता शंका आली, म्हणून लिहिले आहे. डॉ. कोपरकर यांनी शंका निरसन करावी अशी अपेक्षा आहे. क. ही वि.

नासिक आपला,

१६-८-६२ विष्णु बापूजी आंबेकर

स. न. वि. वि.--

प्रा. वि. बा. आंबेकर यांचे पत्र वाचले. टमरेल, टंबलर, ट्रमरेल, हे शब्द ग्रामीण मराठीतील असून महाराष्ट्र शब्दकोशात त्यांचा अंतर्भाव झालेला नाही पूर्वसूरींच्या ग्रंथाधारेच शास्त्रीय लिखाण करावेसे आहे. त्याप्रमाणे प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांच्या व्युत्पत्तिकोशाच्या प्रस्तावनेतून (पा. १०७) द्विमुखी जोडशब्दाचे 'टमरेल' हे उदाहरण उचलले होते. त्यांच्याच "शब्द, उद्गम आणि विकास" या पुस्तकात (पा. १४८) ट्रमरेल बरोबर उपेंद्रवज्रा (उपजाति व इंद्रवज्रा), पाहुणेर (पाहुणचार व गडगणेर), हींही उदाहरणे दिलेली आहेत. मी 'टमरेल' साठी इंग्रजी कोशात व्युत्पत्ति शोधिली नव्हती. प्रा. आंबेकर यांनी तिकडे लक्ष वेधिले याबद्दल आभारी आहे.

"प्रा. आंबेकर यानी टमरेल शब्दाची tumbrel पासून व्युत्पत्ति सुचविली खरी, पण टमरेल शब्दाचा 'ट्राम' हा एकच अर्थ मराठी खेडूत लोकात प्रचलित आहे, तर tumbrel या इंग्रजी शब्दाचा 'ट्राम' असा अर्थ ऑक्सफर्ड कोशात दिलेला नाही. व्युत्पत्ति शोधतांना अर्थैक्य निदान अर्थसादृश्य असावे, ते प्रा. आंबेकरांनी सुचविलेल्या व्युत्पत्तीत नाही. इंग्रजी Tram शब्दाचा संबंध tumbrel शब्दाशी नसून तो Low German 'traam' पासून सिद्ध केलेला ऑक्सफर्ड कोशात आढळतो. शिवाय, tramway, tramline प्रमाणे tramrail शब्द कोशात नाही. मग 'टमरेल' शब्दाची व्युत्पत्ती कशी? ही शंका राहतेच. याला एकच उत्तर संभवते की tramway आणि railway यांच्यापासून tram-rail हा जोडशब्द कल्पून मराठीत टमरेल शब्द आला असावा. असो."

तसदीबद्दल क्षमस्व. आपला,

सावंतवाडी द. गं. कोपरकर

दि. ३०-८-६२

# साहित्य-समीक्षा

## द्वंद्व :

—व. भि. कुलकर्णी

विजय तेंडुलकरांच्या अकरा कथांचा हा नवा कथासंग्रह. नाटककार व एकांकिकालेखक म्हणून तेंडुलकरांचे यश आपण समजतो त्याहून फार मोठे आहे. स्त्रीप्रमाणेच लेखकालाही त्याचे वय विचारू नये. कारण शारीरिक वयाचा व वाङ्मयाचा थोडासा संबंध असला तरी शारीरिक वयाचा व वाङ्मयाच्या मोजमापाचा काहीच संबंध नाही. पण मराठीत तर वयावरून एखाद्याचे कौतुक करण्याची प्रथा आहेच. ती अगदी चित्रे आणि वरेरकर यांच्यापर्यंत चालू आहे. म्हणजे एवढे कमी किंवा जास्त वय असून अमुक एक माणूस चांगले साहित्य निर्माण करतो असे अजूनही आपल्यापैकी बरेचजण म्हणत असतात. असे म्हणायचेच असेल तर ते तेंडुलकरांच्या बाबतीतही म्हटले पाहिजे. कारण ऐन पंचविशीत सरस काव्य लिहिणे सोप असले तरी सरस नाटक लिहिणे तेवढे सोपे नाही; चांगलेच कठीण आहे. त्याचे एक कारण असे की काव्यातील भावनेला वास्तवापासून कितीही दूर जाता येते, व्यवहारांतील सारा तपशील फोडून संपूर्ण नग्नावस्थेत तिला अवतरता येते, उलट नाटकात भावना किंवा कुठलाही अनुभव हा तपशिलापासून असा दूर पळू शकत नाही. म्हणूनच नाटककाराच्या अनुभवांना अनेक परिमाणे असावी लागतात. इतर अनेक गोष्टींसह तेंडुलकरांजवळ असे तपशीलवार अनुभव होते व म्हणून त्यांची नाटके यशस्वी झाली. ही अनुभवाची संपन्नता तेंडुलकरांच्या या कथासंग्रहातहि दिसते. अलीकडच्या पुष्कळ कथाकारांमध्ये आपण असे पाहतो की त्यांचा मूळ अनुभवच इतका तोकडा असतो की धूसरता वा संचार या युक्त्यांशिवाय त्यांची कथा उभीच राहू शकत नाही. तेंडुलकरांच्या कथांत सूचकता असली तरी धूसरता नाही आणि पुष्कळदा त्यांत खटकेबाज संवाद असले तरी ते आपला सवतासुभा साधीत नाहीत.

खरोखर नाट्यासारखे अनुकूल माध्यम सापडले असूनहि तेंडुलकर कथा का लिहितात? याचे एखादे निश्चित उत्तर लेखक स्वतः देईल; किंवा तो काहीच बोलणार नाही. पण मला असे वाटते की साक्षात् आत्माविष्काराचे समाधान मिळविण्याकरिता त्याने हा प्रकार हाताळला असेल. हे समाधान नाट्यप्रकारातून पूर्णांशाने मिळू शकत नाही म्हणूनच तेंडूलकरांच्या कथामध्ये मला महत्त्वाचा वाटतो तो त्यांतील 'मी'. 'गुरुब्रह्म' 'माणसाची गोष्ट,' 'समस्या,' 'अखेरचे दिवस,' 'गोपिकाबाई,' 'सौदा' 'मित्रा,' आणि 'जाब' या अकरांपैकी आठ कथामध्ये निवेदनाची पद्धत पात्रमुखीच आहे. शिवाय 'मंगळसूत्र नवीन आहे' व 'द्वंद्व' यातहि 'मी'चा ओझरता उल्लेख आहे. 'समस्या' मधला 'मी' म्हणजे प्रत्यक्ष लेखक तेंडुलकरच आहे. कथेमध्ये स्वतःला गोवून देण्याची पद्धत अलीकडे व्यंकटेश माडगूळकरांनी विशेष रूढ केली आहे. तिचा मात्र हा परिणाम नव्हे. कारण माडगूळकरांचा 'मी' हा प्रत्यक्ष माडगूळकरच असला तरी त्या मीच्या प्रगटीकरणामागे आत्माविष्काराची प्रेरणा नसते. एका अनुभवाचा वस्तुनिष्ठ घटक म्हणून तो 'मी' अवतरत असतो.

---

**द्वंद्व : विजय तेंडूलकर, बा. ल. पाठक प्रकाशन, मू. चार रुपये. मुंबई २.**

अनुक्रमणिका






त्यामुळेच या मीपायी त्यांच्या कथेत कधी हळवेपणा, विषयान्तर किंवा पाल्हाळ येत नाहीं. भाव्यांच्या कथांतहि 'मी' येतोच. हा आपले नाव 'भावे' सांगत नाहीं. पण भाव्यांचा साचा स्वभाव व खुणा घेऊन तो प्रगटतो. त्यामुळे त्यांचा सगळाच अनुभव एका वेगळ्या आणि व्यक्तिगत पातळीवर खेचला जातो आणि त्याला आत्मचरितांची वेगळीच जास्तीची धार येते. अशा रीतीनें अनुभवाचे संतुलन साधण्यासाठी किंवा अनुभवाला तीव्र करण्यासाठीं माडगूळकर भावे कथेत 'मी' आणीत असतात. तेंडूलकरांच्या अधिकांश कथांमध्ये 'मी' असूनहि तो कुठेहि अनुभवाचा अपरिहार्य भाग वाटत नाही आणि त्यांच्या अधिकांत कथांतील अनुभव विलक्षण तीव्र असूनही आत्मनिवेदनामुळे कुठेहि तीव्र झालेले नाहीं. मग त्यांचा 'मी' हा असा सारखा तरी कशासाठीं ?

'गुरुब्रह्मा'मधला कल्याणराव. पुस्तकविक्रेता, नवी पुस्तके रद्दीत विकत घेणारा. अंगावर कोड असलेला. अविवाहित. कुठल्याशा तबेल्यात एकाकी राहणारा. रखेली ठेवून असणारा, 'माणसाची गोष्ट'मधील लतकोडगे भिकारी पोरगे, त्याचे लूत भरलेले कुत्रे 'समस्या'मधील दोनदा प्रेमभंगाच्या यातना भोगलेली ती, तिसऱ्यांदा शिवरामच्या दैवी गुणावर प्रेम करूं लागते आणि तिथेहि अपेशीच ठरते. 'अखेरचे दिवस'मधला अनंतकुमार दंडवते. गडगडाटासारखा पण ऱ्हस्व हसणारा. रक्तमासांतील दगडी शिल्प पण तेवढाच अभागी. 'मित्रा'मधील ऊर्मिला शहासाठी वेडीपिशी झालेली, समलिंगी आकर्षणाने पेटलेली नायिका, आणि 'जाब' मधील उठवळ इंदू. . .ही सारी माणसे अभागी आहेत, अपेशी आहेत. प्रत्येकाच्या वाट्याला कुठले ना कुठले आत्यंतिक दुःख आले आहे. द्रारिद्य, रोग, चमत्कारिक स्वभाव, वासना अशी काहीतरी निमित्ते आहेत. पण ही निव्वळ निमित्तेच. निमित्त काही असो, दुःख हें अपरिहार्यच. मग कल्याणराव आपले एक व्यावहारिक तत्त्वज्ञान तयार करून त्याच्या आडोशाला बसून राहतो. भिकाऱ्याचे पोर कुत्र्याहूनहि लाचार होऊन द्रारिद्र्य कमी करू पाहते. आपल्या विकृत भावनेचे समर्थन करीत मित्रा जगते आणि 'डेड-लाइन संपली तेव्हा प्रतिकार थांबविणारा' अंत्या दंडवते. . .असे हे जीवनातील अपरिहार्य दुःख आणि प्रत्येकाने आपापल्यापरीने त्यावर शोधून काढलेले थिटे उपाय. कुणाचेही दुःख कुठल्याही उपायाने संपत नाही, कल्याणराव मेला तरी त्याच्या बटकीच्या व मुलाच्या रूपाने त्याचे दुःख तसेच उरते. आपल्यामधील नायिकेला समाधान मिळत नाही व तो संतापून विचारते, "सांगा लेखक, यांतून मार्ग कोणता ? तुमच्या मूर्ख, हट्टी, गरीब नायिकेचं या स्थितीत काय कराल ? तुम्ही तिला एखाद्या अपघातात ठार कराल ? की चेहऱ्यावर ॲसिड ओतून घेऊन विद्रूप व्हायला लावाल ? की जीव द्यायला लावाल ? की..." ऊर्मिलेच्या विरहाने जळणारी, डोळ्याभवती काळी वर्तुळे आलेली रुपेरी केसाची पोक निघालेली मित्रा कर्कश आवाजात म्हणते, "लाइफ मस्ट बी लिव्ह्ड !" आणि तिच्यासह तिचे दुःखही अहमदाबादला जावयास निघते. 'गोपिकाबाई'या खेळकर दिसणाऱ्या कथेतहि 'सुशिक्षित तरुणीहिं शेवटी त्या काकूच असते' तात्पर्यवजा पुरुषी दुःखच गोठविले आहे. दुःख अनुभविण्याची तेंडुलकरांची शक्ती खरोखरच मोठी आहे. पण ती जी. ए. च्या जातीची नाही. जी. एं. दोनही बाहू उभारून दुःखाला सामोरे जातात; त्याला कडकडून मिठी मारतात व त्याच्याच पाशात मूर्च्छित होऊन पडतात. दुःखाचे जणू काही विचित्र आकर्षण जी. एं. ना आहे. तेंडूलकरांचे तसें नाही. ते दुःखाकडे जात नाहीत. दुःखच

त्यांच्याजवळ येते. आणि ते जवळ आले तरी तेंडुलकरांना त्याचे आकर्षण वा भय वाटत नाही. कुठल्याही प्रयत्नाने ते दूर होणे शक्य नाही अशी त्यांची बालंबाल खात्री असल्यामुळे सहानुभूति, उपदेश, प्रतिकार असे काहीहि करण्याच्या ते भानगडीत पडत नाहीत. शरदबाबूंना ही किमया साधली आहे. अमाप दुःख भोगूनही त्यांची माणसे तटस्थ राहू शकतात. पण मग तटस्थपणाचेच त्यांना कौतुक वाटू लागते. तटस्थपणाने दुःख दूर ठेवता येईल असे त्यांना वाटू लागते. तेंडूलकरांना तसेहि वाटत नाही. म्हणून मित्राची वेदना पाहून मित्राच्या मनाला ‘ चरचरून जखम ’ होते; ‘ सौदा ’ मधला अलिप्त संपादक राम देशमुखचे चमत्कारिक दुःख पाहून ‘पोळत्या उन्हातून ’ घरी परत जातो... म्हणजे काही पात्रप्रसंगातून मानवी जीवनातील पेटते दुःख समोर ठेवावे व ते किती अपरिहार्य व अनिवार्य आहे हे जाणवून देण्यासाठी त्याच्या शेजारी ‘ मी ’ला उभे करावे ही तेंडूलकरांची रीत आहे. त्यांच्या कथांत पात्रमुखी पद्धती वापरली जाते ती कुठल्याही तांत्रिक करणाने नव्हे तर त्यांच्या या जीवनविषयक चिंतनामुळे आणि गंमत ही की या ‘ मी ’ ची भूमिका कधी शिष्याची ( गुरुर्ब्रह्मा ), कधी मित्राची (मित्रा) कधी पतीची ( गोपिकाबाई ), कधी प्रियकराची ( जाब ), कधी लेखकाची ( समस्या ), कधी संपादकाची ( सौदा ), कधी पादचाऱ्याची ( माणसाची गोष्ट ) तर कधी निव्वळ तटस्थाची (मंगळसूत्र नवीन आहे, द्वंद्व ) अशी कशीही असली तरी तिच्यामध्ये मूलतः काहीही फरक नसतो. ही भूमिका आहे सांख्य तत्त्वज्ञानातील पुरुषाची. हा काही हवेही म्हणत नाही आणि नकोही म्हणत नाही. आणि तरीही याच्या उपस्थितीशिवाय प्रकृतीला आपला पसारा मांडता येत नाही. हा पसारा पुरुषाला काहीही करू शकत नाही आणि तरीही त्यात आपण अडकलो आहोत असा त्याला क्षणकाल भास होतो. या भासापासूनच तेंडुलकरांची कथा जन्माला येते. पुरुषाची मुक्ती म्हणजे आपण बंधनात नव्हतो हे त्याला समजणे. या ठिकाणी तेंडुलकरांची कथा संपते.

नाट्यमाध्यमातून साक्षात आत्माविष्कार साधत नाही म्हणून तेंडूलकरांनी कथेसारखा अधिक मोकळा प्रकार निवडला. आपल्या कथांतून नित्य ‘ मी ’ उभा केला. आपल्या प्रत्येक जीवनानुभवाला या मीच्या एकेरी अवतरणचिन्हात टाकून त्यांना विशेष अर्थ प्राप्त करून दिला म्हणून त्यांच्या कथाविषयात भडकपणा असूनहि त्यांच्या कथा कधी भडक झाल्या नाहीत. कथाप्रसंगात व संवादात नाट्य असूनही त्या कधी कधी नाटकी झाल्या नाहीत; अपवादात्मक अनुभव निवडूनही त्या कधी अवास्तव वा प्रयोगधार्जिण्या ठरल्या नाहीत. पण म्हणूनच म्हणजे मीचा चिन्हासारखा उपयोग केला म्हणून त्यांची कथा पूर्णपणे यशस्वीही झाली नाही. स्वतः अनुभव घेण्याचे किंवा स्वतःचे अनुभव घेण्याचे किंवा स्वतःचे अनुभव निवेदन करण्याचे हा ‘ मी ’ नेहमी नाकारीत असतो. का नाकारतो, सांगता येत नाही. कदाचित त्याचा अहंकार, कदाचित हळवेपणाबद्दलचा राग, कदाचित स्वतःच्याच अनुभवाचे वाटत असलेले भय– कुठलेहि कारण. तेंडुलकरांचा विजयलेख आणि तहनामा एकाच ताम्रपटावर लिहिला जावा यात फार मोठा अर्थ भरला आहे.

नाट्याच्या क्षेत्राप्रमाणेच कथेच्या क्षेत्रांहि तेंडुलकरांना मोलाची कामगिरी करायची असेल ( आणि ते सामर्थ्य त्यांच्यात आहे ) तर त्यांना या जागेपासून हलले पाहिजे. त्यांनी एकतर कथेतून हा ‘ मी ’ काढून टाकून तिला पूर्ण वस्तुनिष्ठ, अवतरणचिन्हरहित केले पाहिजे किंवा आपल्या कोंडलेल्या मीला विमुक्त केले पाहिजे–पण तेंडुलकरांना हे पटायचे नाही !



# रथचक्र : : – श्री. ना. पेंडसे

सामान्य वाचकांना जिच्यामध्ये फारस आवाहन नाही परंतु साक्षेपी टीकाकारांना आणि आत्मनिष्ठ साहित्यिकांना एका नव्या जाणीवेचे आव्हान देणारी पेंडशांची ही नवी कादंबरी.

पेंडशांच्या या नव्या कांदबरीने पेंडशांना व पर्यायाने मराठी कांदबरीला कांही मर्यादित अर्थाने नवी शक्ति दिली आहे. पेंडसे कोकणच्या मातींतच खऱ्या अर्थाने रंगतात किंवा त्यांचे नंदनवन हें बालपणचे आहे; अशा तऱ्हेच्या कांही विधानाना या कादंबरीनें परस्पर छेद दिला आहे. कारण या कांदबरीतील कोकणची पार्श्वभूमि निमित्तमात्र आहे व त्यांच्या बालपणाच्या नंदनवनांतून तिने लेखकाला बाहेर काढले आहे.

पेंडशांच्या कांदबरीचे एक निश्चित तंत्र या कांदबरीमुळे स्पष्टपणे आता कळून चुकले आहे. वाचकांचे कुतूहल वाढविण्यासाठी गतजीवनांतील कांही नाट्यपूर्ण घटनांचा संवादाच्या भरांत ओझरता उल्लेख करीत कांहीसा अद्‌भुततेचे रंग मिसळीत त्यांचा कथौघ पुढे जातो. पेंडशांच्या कांदबरीचे हेहि एक सामर्थ्यच आहे. परंतु ते कारागिरीच्या स्वरूपाचे आहे. कांदबरीच्या सुरवातीच्या पन्नास-साठ पानांतून हे तंत्र पेंडसे विलक्षण कसबाने हाताळतात. पात्रांच्या बोलण्या-चालण्यातून काही असे उल्लेख खुबीने पेरले जातात की त्यामुळे कथानकाच्या संथ निवेदनात गूढतेचे तरंग निर्माण होतात आणि ही गूढता पेंडसे तात्पुरत्या खुंटीवर टांगून ठेवतात. हे खुंटीवरचे गाटोडे अर्थातच पुढे केव्हां तरी सोडले जाते हे निश्चित. ही खुंटीवरची कसरत पुढे पुढे कमी होत जाते आणि त्याचबरोबर जीवनातल्या गुंतागुंतीचे गणितही कादंबरीकार सहजासहजी सोडवून वाचकांच्या मनावरचा ताण कमी करीत असताना दिसून येतो. पेंडशांच्या बहुतेक कादंबऱ्यांतून उत्तर भागांत उत्कंठेची उतरती कमान सुरू होते. कादंबरीची शेवटची पाने नेहमीच घाईघाईने उरकलेली वाटतात ती यामुळेच.

पेंडसे स्वतःच अनेकदा सांगतात की, आपली कादंबरी लिहिण्यासाठी आपण फार परिश्रम घेतो म्हणून पात्रांच्या साऱ्या हालचाली कथानकातील त्यांचे येणे-जाणे त्यांच्या बोलण्याच्या लकबा ज्या वेळी त्यांच्या मनात संपूर्णपणे साकार होतात, त्या वेळी मोठ्या परिश्रमाने ते आपले लेखन हातावेगळे करतात. कलावंताची एक अतिशय जागरूक आत्मनिष्ठा म्हणून पेंडशांच्या लेखनाकडे आदराने पाहिले जाते. परंतु त्याचबरोबर डोस्टोवस्कीच्या कादंबऱ्यांमध्ये झंझावाताप्रमाणे वाचकांना अखेरपर्यंत खेचत नेण्याचे सामर्थ्य असते, त्याचा अभावही त्यांच्या कादंबरीत आढळतो.

आपली कादंबरी डोस्टोवस्कीयन आहे, असे खुद्द लेखकानेच म्हटले असल्यामुळे वरती डोस्टोवस्कीचे नाव घेतले. पेंडशांनी या कादंबरीत डोस्टोवस्कीच्या काही वैशिष्ट्यांना हात घालण्याचा प्रयत्न केला आहे. धूर्तपणा आणि कोडगेपणा, हातात हात घालून हिंडतात, या सत्याने प्रभावीत झालेला डोस्टोवस्की प्रत्येक व्यक्तीच्या अंतरंगात शिरताना तुच्छता व तुसडेपणाच्या रूपाने नाक दाबूनच एखाद्या पारदर्शक वस्तूप्रमाणे हाडामासांची माणसे चितारीत असतो. उघडा-नागडा स्वार्थ आणि खबखबी कामवासना याची लक्तरे मानवी रूपाने लोंबत असताना त्यांच्यावर अनेकविध ढोंगी हेतूंचे इतके पापुद्रे एकवटले आहेत की ते उलगडताना या क्षुद्र देहांच्या हालचालीत किती गूढता भरलेली आहे, ते तो महाकवीच्या लेखणीने फटकारत

रथचक्र : ले.–श्री. ना. पेंडसे, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४, पृष्ठे २७२ मू. सहा रुपये.

जातो. ' रथचक्र 'मध्ये पेंडशांनी माणसांच्या वरवरच्या वागण्यामधली संगति व विसंगति मोठ्या जागरूकतेने टिपण्याचा प्रयत्न केला आहे. ' ती ', ' तिचा थोटा नवरा ' व ' दुसरा मुलगा ' यांच्या व्यक्तिचित्रणातून मनोविश्लेषण पद्धतीने मानवी स्वभावातील विचित्र गुंतागुंतीचा गोफ उलगडण्याचा प्रयत्न आहे. या तिन्ही पात्रांचे चित्रण ' डोस्टोवस्कीयन ' आहे यात शंका नाही. आपल्या ' इडियट् ' या कादंबरीत डोस्टोवस्कीने माणसाची विचारशक्ति, मानवाची विचारशक्ति व त्याच्या अंतर्यामीच्या श्रद्धा यांमधले द्वंद्व चितारीत असताना अत्यंत अशक्त, दुर्बल, निरक्षर, वेडसर असा कादंबरीचा नायक शेवटी अत्यंत बुद्धिमान, शक्तिमान वगैरे-सारख्या सर्वांपेक्षा शहाणा ठरतो असे दाखविले आहे. त्याचप्रमाणे ' इडियट् ' ही सबंध कादंबरीच नायिका 'नास्तास्या फिलिप्पोवना' हिच्या दुर्दैवी जीवनगाथेभोवती फिरती ठेविली आहे.'रथचक्र' आणि 'इडियट'यामधले ठळक असे साम्य एवढेच. बाकी एकंदर आवाका आणि समर्थस्थाने यामध्ये चांगलेच महदंतर आहे. 'इडियट' मधला नायक खुळा असेल परंतु त्याच्या खुळेपणाच्या बोलण्यामुळे इतरांच्या अकला चकरा खातात आणि आपल्या लक्षांत येते की डोस्टोवस्कीचा नायक काही जरी बडबडला तरी तो आहे मात्र अंतःकरणाचा सीधा-साधा, उमदा, सरळ माणूस. याउलट पेंडशांचा मौनीबुवा केवळ न बोलूनच शहाणा आहे. त्याच्या मौनाने आणि कठोर व्रताचरणाने व्यवहारी लोकसमुदायांत थोडा वेळ श्रद्धांना पालवी फुटते. परंतु काही वेळच. त्याला त्याच्या बायकोने मात्र बरोबर ओळखले आहे. त्याच्या कामवासनेने त्याचे गढूळलेले दुहेरी व्यक्तिमत्त्व सतत लेखकाने चितारून जणु काही त्याच्या व्रताचरणापेक्षा ती बरीच मोठी आहे, हे सुचविले आहे. त्याच्या व्यक्तिमत्त्वामध्ये तिला गूढ असे फारसे काही वाटले नाही आणि वाचकानाहि ते गूढ राहत नाही. तीर्थ देऊन आठवड्यांत काकांचे पाय बरे करण्यासारख्या काही चमत्काराचे पुरण घालून लेखकाने जीवनाचे गणित फारच सोपे करून टाकले आहे. कलात्मक संयम या ठिकाणी सुटला आहे, हेच या ठिकाणी जाणवते. या कादंबरीतील मौनीबुवाचे साधुत्वहि अस्वस्थ करणारे ठरत नाही. त्याचे अस्तित्व सबंध कादंबरीतून रेंगाळत राहिले आहे, हे खरे असले तरी ते भुतासारखे कादंबरीच्या मानगुटीवर बसले असते तर त्याची तीव्रता भेदकता अस्सल डोस्टोवस्कीय झाली असती आणि पराकोटीचे अनाकलनीय, गूढ वातावरण वाचकांना अस्वस्थ करीत राहिले असते. वास्तविक या सबंध कादंबरीत अनाकलनीय, अगम्य असे व्यक्तित्व प्राप्त झालेली एकहि व्यक्ति नाही. लेखकाने कुठल्याहि पात्राचे नाव न देता सर्वांना अनामिक ठेवण्याची कसरत करून केवळ एक नावीन्य साधले आहे. त्यामुळे कादंबरीच्या सौंदर्यात भर पडली आहे किंवा त्याविना कादंबरी कुठे कमी पडली असती असे वाटत नाही.

' महाराष्ट्रातील अविभक्त कुटुंबपद्धतीचे चित्रण ' वगैरेसारख्या दृष्टिकोनातून ह्या कादंबरीकडे पाहणे तूर्त सोडून देऊ. कारण तुलनाच करावयाची ठरल्यास अजूनही हरीभाऊ या बाबतीत उजवे ठरतील. ' रथचक्र 'चा विचार करताना काही निराळ्याच गोष्टींचा विचार केला पाहिजे. ह्या विचारात कृष्णाबाईच्या प्रकरणालाही मी फारसे महत्त्व देऊ इच्छित नाही. अपरिपक्व दृष्टीला त्यातून अश्लीलतेचा वास आला तरी त्यात काही अर्थ नाही हे विस्ताराने सांगण्याची गरज नाही. परसाकडे, कुल्ले यांच्याही उल्लेखाने कुठे काही बिघडत नाही. मात्र तपेली उपडी ठेवायची वेळ आली तरी मुलगी अजून परकर नेसत होती, अशा सारख्या दोन-तीन वर्णनातून एकदम वाचकांची अभिरुचि चाळवली जाते आणि वाटते की पेंडशांसारख्या

लेखकांनी तेवढाही तोल जाऊ देऊ कामा नये. मुख्य प्रश्न असा आहे की, मानवी मनाची सूक्ष्म आंदोलने झेलणारी ही कादंबरी वाचकांना सतत खेचून का टेवू शकत नाही? एखाद्या कोळ्याच्या जाळ्याप्रमाणे मानवी स्वभावाची चिकित्सा करीत वास्तवतेनें कथानक विणणारी ही कांदबरी मराठीत प्रथमच जीवनातल्या काही नाजूक भागाच चित्रण कौशल्यानं करीत असली तरी निदान गारंबीच्या बापूइतकी तरी आकर्षकता का आली नाही?

दुसरा एक प्रश्न असा की, मित्रप्रेमाचे मावशी, आत्या, वहिनी, जाऊ इत्यादिकांच्या उत्कट प्रेमांतील जिव्हाळ्याचे वर्णन करण्यात परमार्थाने रंगणारी पेंडशांची लेखणी मातृप्रेमाचे वर्णन मोकळेपणानें करतांना दिसत नाही. मातृप्रेमाबदल त्यांच्या मनांत एवढा आकस कां? वडिल कसेहि असले तरी मुलांची त्यांच्यावरची भक्ति पेंडशांना भुरळ पाडते. 'काका 'बद्दल तर ते कमालीच्या आत्मीयतेने बोलतांना दिसतात. पण मातृप्रेमातील त्याग, त्यातील उदात्तता कशी त्यांना भुरळ पाडू शकत नाही? या दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर पेंडसेच कधीमधी देऊ शकतील. तूर्त त्याचे उत्तर अगम्य आहे.

पहिल्या प्रश्नाचे उत्तर मात्र थोड्याशा विचाराने आपल्या लक्षांत येते. वाहयात्कारी पायगुणाची ठरणारी, परंतु अपयशाने जिचे व्यक्तित्व कुरतडले आहे अशी अवमानित आणि अपमानित अशी या कांदबरीची दुर्दैवी नायिका; जिचे स्त्रीत्व; जिचे मातृत्व; जिचा अहंकार अवमानला, अपमानला आणि तुडविला गेला त्याला केवळ अविभक्त कुटुंबपद्धति जबाबदार नसून तीच मोठ्या अर्थाने जबाबदार आहे याची जाणीव तिला पदोपदी करून देण्यास लेखकाने अगदी सुरवातीपासून लेखणी उचलली आहे. शेवटी ज्यासाठी तिने अनेकविध संकटांत उडी घेतली, तो तिचा हुशार मुलगाहि तिला शेवटी तिच्या जीवनाचे गणित चुकल्याचे बजावतो. यांतील अपरिहार्यता अगदी सुरवातीपासून चाणाक्ष वाचक लेखकाच्या वर्णनांतून हेरतो. कांदबरीतले सर्वात मोठे वैशिष्ट्य सुरवातीलाच वाचकाला गवसते आणि पुढच्या घटनांतून त्याला अनपेक्षित धक्के बसत नाहीत.

कादंबरीतील सर्वात महत्त्वाच्या घटनेचा सुरवातीसच स्फोट करून पुन्हां कथानकाची सर्व सूत्रे काबूत ठेवीत खेचकपणे कथानकाचा रथ अंतिम लक्ष्यापर्यंत हाकण्याच्या डोस्टोवस्कीच्या प्रतिभेचा आवाका अजून पेंडशांच्या लेखणीला आला नाही.

डोस्टोवस्कीच्या प्रतिभेला कथानकांतील हे सर्वात मोठे आव्हान झेपण्याची शक्ति त्याच्या प्रतिभेच्या टप्प्यांत जीवनाचा गहन, गूढ, गुतागुंतीच्या रस्त्यावरून प्रवास करीत जीवनाच्या अर्थाचा तो शेवटी लक्ष्यभेद करतो. त्यामुळे कांदबरीचा शेवट विळ्याच्या फुलीसारखा डोस्टोवस्कीला गवसलेला अर्थ आपल्या मनावर बिंबवून जातो. पेंडशांना डोस्टोवस्कीच्या कांदबरीचा हा आत्माच अजून गवसला नाही. त्यामुळे अनेक समर्थ उत्पातांचे वास्तव दर्शन घडविणारी त्यांची कांदबरी आलवेलीचे भरतवाक्यं गाठते. मुक्तामाला, मंजुघोषापासून मराठी कांदबरीला झपाटलेले हे आलवेलीचे भरतवाक्य हरिभाऊनाहि चुकविता आले नाही. अतिशय सूक्ष्मार्थाने पाहिल्यास पेंडशांनाहि ते सुटत नाही असे दिसून येते. कोकणच्या तीन पिढ्यावर आधारलेली 'टॉलस्टॉइयन्' कांदबरी लिहिण्यापूर्वी पेंडशांना या गोष्टीचा गंभीरपणे विचार केला पाहिजे.

० ० ०

# गंधवेणा

– दि. के. बेडेकर

सुखाचा आणि दुःखाचा, तृप्तीचा आणि वैफल्याचा, सागराच्या असीमतेचा आणि सावल्यांच्या कातरतेचा असे विविध अनुभव आपण सर्वजणच घेत असतो. ते अनुभव कधी विलक्षण गडद असतात तर कधी पुसट व फिकट असतात. कवीच्या मनांत असे अनुभव नुसते येत नाहीत तर घर करून राहतात. त्या अनुभवांना शब्द व लय यांनी आकार, रूप व आणखी एक प्रकारची शक्ति येते. ती म्हणजे आविष्काराच्या धडपडीची. मग कवितेच्या रूपाने कवी ते अनुभव स्वतःला व तुम्हा-आम्हाला निवेदन करतो. जुने कवी व नवे कवी असा फरक या बाबतीत नाही. बालकवीहि असेच आपले अनुभव सांगत होते आणि आज माळींच्या या ६४ कवितांतूनहि असेच कांही अनुभव रूप, रस, गंध, तृप्ती व व्यथा यांची सुरूपे घेऊन आपल्या समोर येत आहेत.

या कवितांतील 'थांब जराशी', 'मोहन', 'युगायुगांनी', 'पक्षी', 'कोर' अशा काही कवितांमधून मीलनाची तृप्ती, 'शब्दाबाहेरची' गडद प्रीति, गडद गूढ 'निळी व्यथा' यांची सुंदर भावचित्रे कवीने रेखाटली आहेत. या कवितांतून कवीचे शब्द कधी साधे व म्हणून उत्कट असतात.

> अतृप्तीचे मन
> विझालिया पेटे
> सुख उफराटे
> दुखावते

या निवेदनांत हा विलक्षण साधेपणा किती परिणामकारक झाला आहे! यापेक्षा जरा जास्त प्रतीकात्मक ओळी 'कोर' मध्ये आढळतात–

> कोर तशी झुकलेली
> झुकलेले अंग अंग,
> झुकलेल्या ओठावर
> जुळलेले स्वर अनंग

या ओळींतील निवेदन तितके साधे नाही, पण तरी त्यांतून कोरीचें रूप डोळ्यासमोर उभ राहते. पण पुष्कळ कवितांतून शब्द, रूपके व उत्कटतेसाठी विरोधाभासाने काही व्यक्त करण्याचा हव्यास अशा कृत्रिमतेचा स्पर्शहि माळी यांनी होऊ दिला आहे. प्रस्तावनेत प्रा. वा. ल. कुलकर्णी यांनी म्हटल्याप्रमाणे माळी यांच्या कवितेत सर्वश्री मर्ढेकर, रेगे, पाडगांवकर इत्यादि कवींच्या पद्धतीची छाप पडलेली आहे. ते अनुकरण नाही. पण ते घडणे अपरिहार्यच आहे हे त्यांचे म्हणणेही खरे आहे. पण यामुळे अनेक कवितातून 'आकाशाचे थोटुक', 'आकाशाचा चुकार बगळा' अशी रूपडी आली आहेत, तर कधी भाव-निवेदन तुटक, फाटके व अधांतरी झाले आहे. दुर्बोधता ही काव्यांत थोडीफार असणारच, किंबहुना अनुभवाची खोली व सघनता मोठी असेल तर कविता समजायला जड जाणारच. पण केवळ शब्दांच्या व प्रतीकांच्या बाबतीत नवेच काही करण्याने जर दुर्बोधता येत असेल तर ती कवीने टाळायला हवी; स्वतःसाठी व इतरासाठी निवेदन बालबोध नको पण रसिकबोध हवे.

माळी यांनी आपल्या कवितेत ही दुर्बोधता बरीच टाळली आहे, तर काही थोड्या हव्यासाने स्वीकारली आहे. राधा, कृष्ण, यमुना, कदंब यांचे उल्लेख तसे फार माफक आहेत. 'आरिंग मीरिंग 'च्या अर्थहीन बालिश गाण्यातील शब्दांना नवा गूढ अर्थ देण्याचा हव्यासहि त्यांनी एकाच कवितेत केला आहे. पण साधारण कांही ठराविक व सुबोध प्रतीकांचा वापरच त्यांनी सढळपणे केला आहे. सागर, क्षितिज, चांदणे, काळोख, ऊन, पाऊस यांची प्रतीकें त्यांच्या कवितेत सारखी विणली गेली आहेत. बालकवींच्या कवितेत फुलपाखरू, निर्झर, दिव्य गाणे या प्रतीकांचे धागे सर्वदूर आडवेउभे गेलेले दिसतात, तसेच येथे या शब्दांचे आहे. सागरवेणा, सागरवेली सर्वदूर आहेत. क्षितिज तर वीस, पंचवीस कवितातून आले आहे. आकाश म्हणजे कवीचे मन व क्षितिजे म्हणजे

---

काव्यसंग्रह, – गजमल माळी, मराठवाडा साहित्य परिषद प्रकाशन, पृष्ठें, ६४, मू. रु. १.०५

त्या मनाचा कोठेतरी टेकणारा व थरारणरा कांठ असे हे प्रतीकांचे जणू समीकरणच आहे.

हवीच होती अस्तित्वाची
तमा जरी जगण्यातुन अनुदिन
हवीच होती सागरवेणा
क्षितिजामधल्या अग्निफुलांना

'आढे' मधील या ओळीत सागर आणि क्षितिज यांचा वरील अर्थ कवीच्या अस्मितेशी एकरूप झाला आहे. 'अस्तित्वाची तमा', 'अस्तित्वाची ग्वाही', 'अस्तित्वाचे पंख' या कल्पनाहि तुरळकपणे कवीने मांडल्या आहेत. यात 'अस्तित्वा' बद्दलचे तत्त्वचिंतन आणि व्यथा यांचा पडसाद उमटतो, पण या बाबतीत कवीला नेमके काही तत्त्व मांडावयाचे नसावे. 'अस्तित्वाच्या' रहस्यालाच भेदावयाचे सामर्थ्य कोणाहि तत्त्वज्ञाच्या किंवा कवीच्या प्रतिभेत स्फुरू शकते का? माणसाने आपल्या सांत इवल्याशा मनाने इतके गूढात शिरावे का? हे प्रश्न मोठे भेडसावणारे पण आकर्षक आहेत. पण मला तरी असल्या परतत्त्वस्पर्शाची ओढ व तमा नाही. म्हणूनच माणसाचे सान्त सुखदुःख व प्रीति-विरह याच्या ऊनसावलीत कवितेचा प्रतिभाविलास मला हृद्य वाटतो व सार्थ वाटतो.

जाता जाता माळी यानी वापरलेल्या काही शब्दाबद्दल सागणे जरूर आहे. कविता ही प्रयोगशील असते, म्हणजे ज्या भावेतूनच तिला रूप घ्यावे लागते तिच्या रूढ शब्दाच्या पलीकडे ती जाऊ पाहते. हे असे होणे अटळच आहे. कारण कवितेतले निवेदन हे लयबद्ध व्यंजनेने सघन झालेले असते; शब्द अपुरा पडेल तर नवा शब्द ढाळणे जरूर असते. या संग्रहामध्ये नवी क्रियापदे व जोड शब्द असेच आले आहेत. 'सकाळणे', 'आभाळणे,' 'वादळणे' आणि 'वेणावणे' ही क्रियापदे या कवितेत चपखल व सुंदर अर्थवाही होतात. पण याचाच थोडा अतिरेक करून कवीने 'गोकुळणे' असाहि प्रयोग केला आहे! 'थेबातुर', 'मौनगंधा' अशा तऱ्हेचे जोडशब्द कवीने योजिले आहेत व ते समर्पक वाटतात, पण येथेहि 'उषःपंख कावळ्यांची' असा क्वचित् अतिरेक झालेला दिसतो. भाषेवर इतरांचे प्रेम असते, पण कवीचे इतरांच्या लाखपट हवे. नवे शब्द ढाळण्याचे सामर्थ्य त्याला हवे, पण त्यांत विरूप शब्द ढाळले न जाण्याचा सावधपणा हवा.

गंधवेणा हा कवितासंग्रह वाचताना उत्कट काव्यप्रत्यय येत गेला व त्यामुळेंच कवितेंत रंगताना बोचणाऱ्या उणिवा व मनांत येणाऱ्या कल्पनाहि तितक्याच तीव्र भासल्या. माळी यांच्या काव्यामध्ये अशा रीतीने आनंदित व अस्वस्थ करण्याची शक्ति आहे व म्हणूनच या कवीकडून माझ्याप्रमाणेच सर्व रसिक मोठ्या अपेक्षा ठेवतील.

---

# गबाळ ग्रंथ

– र. गं. विद्वांस

मराठी साहित्य डोळसपणे वाचणाऱ्या जाणत्याना श्री. बाळ गाडगीळ हे नांव आता नवीन नाही. (बाळ व गंगाधर गाडगीळ या दोन नांवांबाबत अजाण अजूनही गोंधळतात असें म्हणतात.) आर्थिक विषयावरील विवेचक लेखन हा त्यांचा व्यासंगाचा विषय सोडला तरी चांगल्या दर्जेदार कथांचे लेखक म्हणून ते आता प्रथितयशांत जमा झाल्यासारखेच आहेत. गंभीर, विचारप्रधान कथांइतकेच चोखंदळ वाचकाचे चित्त वेधून

---

**गबाळ ग्रंथ :** ले. : बाळ गाडगीळ, प्रकाशक : शुभदा प्रकाशन, १०९।५ एरंडवन पुणें ४, पृष्ठे १४०, मू. तीन रुपये.

येईल असे विनोदी लेखन ही गाडगीळ यशस्वी-पणे करूं शकतात याची प्रचीति प्रस्तुत '(ग) वाळ ' ग्रंथ वाचल्यानंतर निश्चित यावी.

विनोद हे काहींसे कठिण असे माध्यम आहे. टीकाविषय झालेल्या व्यक्तीला न दुखविता त्याचेच दोष त्यालाच दाखवून त्याबद्दल त्याची पसंति मिळवायची हे काम अगदी हलक्या हाताने अवघड असे शल्यकर्म करणाऱ्या निष्णात डॉक्टरसारखे आहे. आचरटपणा आणि खुसखुशीतपणा, बोचक कटुता आणि उपरोध, कोटित्व आणि वाह्यातपणा यांच्या सीमारेषा नॉयलॉनच्या वस्त्रासारख्याच अत्यंत झिरझिरीत आहेत. मर्यादा न सोडता लेखनाची ही पातळी संभाळणे हे जाणकारच करूं शकतो. ही जाणीव न ठेवल्याने वा तेवढी ताकद नसल्याने वाह्यातपणा, अश्लीलता, पांचट कोट्या, अशा अर्थहीन लेखनाला विनोदी समजावयाची 'बुवा' बाजी वाढीस लागण्याचा फार मोठा धोका संभवतो. पु. ल. देशपांडे, शामराव ओक, वसंत सबनीस आणि आता आळ गाडगीळ अशा कांही दर्जेदार विनोदी लेखकांच्या लेखनामुळेच हा धोका दुर्लक्ष करण्यासारखा होतो हा भाग वेगळा.

या 'गवाळ ग्रंथां'तील तेरा लेख वाचले असतां चटकन् जर काही डोळ्यांत भरत असेल तर ते म्हणजे (कांही) मराठी वृत्त-पत्रातील लेखनाबद्दल त्यांना वाटणारा तिरस्कार. अर्थात हा तिरस्कार व्यक्त करतानाहि त्यांनी संताप, त्रागा असे कांही न करता जातिवंत विनोदी लेखकाप्रमाणे उपरोधाची सुरी अगदी सफाईने वापरलेली आहे. अमेरिकन पत्रपांडित्याचे आदर्शआड दडून 'सकाळ'च्या रामप्रहरी भाषेचे विविध चमत्कार दाखविण्याचा हा खेळ इतका जीवघेणा आहे की त्यामुळे आजचा विद्यार्थि आणि उद्याचा नागरिक हा असे कांही विलक्षण मराठी लिहू लागेल की त्या मराठीचे संशोधन हा डॉक्टरेटचा विषय ठरावा. एस. एस. सींत पहिली गाय; तोंडे विद्यार्थि मुलाखत, अध्यक्ष बैल मिरवणूक, अध्यक्ष जखमी भेट, मंत्री नटी खून प्रकरण लक्ष, डॅडी ममी येची मत असे वा अशासारखें गाडगीळ यांनी विनोदासाठी वापरलेले मथळे काही मराठी वृत्तपत्रांत अनेक वेळा वाचून संभ्रमांत पडल्याचे वाचकांना आठवल्याशिवाय रहाणार नाही; आणि घाईगर्दीत आपण हे काय वाचीत होतो असा प्रश्नचिन्हांकित चेहरा करून ते स्वतःकडेच बघतील.

वृत्तपत्रातली प्रसिद्धि हाही एक असाच हवाहवासा वाटणारा आजार. त्यासाठी वृत्तपत्रांतून वाचकांच्या पत्रव्यवहाराचा चमचा हातानीं धुऊन त्यातून आपल्या (अ) विचाराचे डोस पाजायची अनेकांना मूर्ख हौस असते. ही आचरट आवड अशा तऱ्हेचे लेखन (!) करणाऱ्या सौ. कोकिळाबाई कुलकर्णी यांच्या 'मी पत्रकर्ती कशी झाल्ये?' या मुलाखतीने त्यांनी चांगलीच ओरबाडली आहे. अशा लेखकांना जनहितापेक्षा स्व-प्रसिद्धीचीच ओढ कशी असते हे या लेखांतल्या 'के' आपल्याला अगदी विश्वासात घेऊन सांगतील. गाडगीळांच्या लेखनातला सारा खुसखुशीतपणा या लेखांत पाहावयास मिळेल. झाड पडले ही साधी घटना पण त्यातूनही हे (अमेरिकन) पत्रपंडित कसा विनोद निर्माण करतात हे 'झाड पडलें' या पहिल्याच लेखांत वाचावयास मिळते.

गाडगीळ उपहासाचे शस्त्र अशा काही सफाईने चालवितात की 'काय झाले?' हे ज्यावर शस्त्रक्रिया केली त्यालाहि लवकर कळू नये. उदाहरणार्थ 'मीः भवभूति' हा लेख वाचा. जुने संप्रदाय पूर्णतया झुगारून देऊन अर्थहीन असे काहीतरी नाटक लिहावयाचे. अर्थ म्हणजे पैसा खर्चून पहाणाऱ्या प्रेक्षकांना ते काहीच न कळल्याने कोठल्याही अर्थी अर्थहीनता घेऊनच त्यानी थिएटरबाहेर पडायचे; तरीही सर्वसामान्याना कळले नाही तरी किंवा त्यामुळेच ते उच्च आहे असा

एका विविक्षित संप्रदायातील व्यक्तींनी गवगवा करायचा आणि असे झाले म्हणजे 'आपण काय लिहिलंय हे स्वतःलाच कळलेले नाही' अशा लेखकाने सारे गूर्ख समजून स्वतःला युगप्रवर्तक समजावयाचे या 'मारुतीच्या बेंबी 'तल्या गारव्यावर अद्याप तरी जालीम उपाय सांपडलेला नाही. मात्र घस्त, 'बूट नांवाचे खेटर' अशी पडेल नाटके (!) लिहिणारा हा लेखक स्वतःबद्दल काय कल्पना करूं शकतो हे गाडगीळांनी शेवटच्याच वाक्यांत सारा खट्याळपणा एकत्र करून असल्या नाट्याच्या गतानुगतिक स्तुतिपाठकांना झणझणीत अशा 'आल्याचा चटका' दिला आहे. या लेखातला नाटककार (!) म्हणतो, 'माझ्या अजरामर होण्याबद्दल मी साशंक नाही. हुरहुर वाटते ती या सामान्याना उद्या माझी लायकी कळेल तेव्हा किती वाईट वाटेल, किती पश्चाताप होईल, याची. मग लेकाचे म्हणतील, '' च्या बायली मानूस नव्हताच रं, हा गड्या शेक्‌सपिअरच व्हता; पत्ताच लागला न्हाई की गा शेवटपत्तूर !''

'महाराष्ट्राने धंद्यात पडावे' ही आरोळीही नवी नाही. परंतु ज्याला त्यातील समजते त्यापेक्षा समजत नाही अशाच व्यक्ती हा आवाज जास्त मोठा उठवतात. त्यामुळे समग्र विचार न करतांच एखादा व्यवसाय करावयाला निघालेल्याची काय दुर्दशा होते हें 'धंद्यात पडणारा' चित्र आपल्याला सांगतो. खेड्याची सुधारणा करण्यासाठी जाणारा आजचा तरुण छापील कल्पना घेऊन जातो आणि शेवटी स्वतःला हास्यास्पद करून घेतो, हे 'विकास' साधायला गेलेला ग्रामसेवक; 'गावाकडच्या गोष्टी निराळ्याच असं सागणारा एक जंक्शन दादला वेंकटेश' हे लेखही गाडगीळ पुस्तकाबाहेरचे जग किती बारकाईने पाहातात याचे द्योतक आहे.

'संसारी पुरुषांसाठी गाइड' हा लेखही गाडगीळांच्या मिस्किलपणाचा आणखी एक नमुना. दैनंदिन वागण्यांत आपण अनेक नीतिनियम कसे सहजपणे दूर ठेवतो याचे विवेचन आपणाला काही वेगळ्याच धारदार उपरोधाने गाडगीळ सांगतात.

दुसऱ्या व्यक्तीला बोलण्याची संधि न देता त्याला अबोल करून टाकणारी 'अबोलीचे फूल : सौ. सरू' हा तर घरोघरी आढळणारा 'किस्सा' आहे. त्याचे वाचन म्हणजे एका आगळ्या पुनःप्रत्ययाचा आनंद.

असो; थोडक्यांत कोणतेही पान उघडले तरी वाचकाला आत्मप्रत्ययाची काही ना काही निराळीच जाणीव खुसखुशीत उपरेधाने करून देणारा हा (ग) बाळ ग्रंथ मराठी विनोदी वाङ्मयातला एक नाव घेण्यासारखा ग्रंथ ठरावा याबद्दल जाणत्यांचे दुमत होण्याचे कारण नाही.

---

# मराठी साहित्याचा कारभार
## अर्थात् मराठी साहित्य संस्था

– दि. के. बेडेकर

मराठी भाषा आणि वाङ्मय यांच्या विकासासाठी कार्य करणाऱ्या चार संस्था व त्यांचे संधीकरण होऊन स्थापन झालेली **मराठी साहित्य महामंडळ** ही मध्यवर्ती संस्था, तसेंच गोमंतकातील व महाराष्ट्राबाहेरील मराठीभाषकांच्या संस्था, आणि **महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ** व **भाषा सल्लागार मंडळ** आणि **साहित्य**

---

लें. म. श्री. दीक्षित, बहुश्रुत माला– २३, व्होरा कंपनी, मुंबई, १९६२, पृ. ३४, मू. रु. ०–६०

**अकादमी** या सरकारी मदतीने चाललेल्या संस्था, यांच्याविषयी उपयुक्त माहिती या पुस्तिकेत दिली आहे. **मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय** यासारख्या जुन्या व महत्त्वाच्या संस्थेची माहिती व ग्रंथोत्तेजनासाठी पारितोषिके देणाऱ्या लहानमोठ्या संस्थांची माहितीही लेखकाने दिलेली आहे. याच बरोबर **समर्थ वाग्देवता मंदिरासारख्या** संशोधन-संस्थेची माहितीही दिली गेली असती तर वाचकांना ती उपयुक्त ठरली असती. विद्यार्थी व प्रौढ मराठी वाचक यांना प्रस्तुत पुस्तक उपयुक्त ठरेल व म्हणून गावोगावच्या शाळा-कॉलेजांच्या ग्रंथालयातून ह्या पुस्तकाचा समावेश व्हावयास हवा.

---

## स्वप्नजा

– शारदा देशमुख

'स्वप्नजा' हा कवयित्री 'पद्मा' यांचा तिसरा काव्यसंग्रह. तिसऱ्या संग्रहातील कविता पूर्वीइतकीच कोमल आहे. तिच्यातील चिंतनपरता वाढली असली तरी भावकोमलता कमी झालेली नाही. दुःखविषयक अनुभव मनुष्याच्या मनावर काही दूरगामी परिणाम करतात आणि जीवनाचे सत्य स्वरूप निर्भयपणे पाहण्याची वृत्ति निर्माण होते. दुःखमय जीवनाबद्दल पद्मा लिहितात; पण केवळ उसासे टाकण्यासाठी नव्हे. दुःखामुळे त्यांच्या कवितेत तुच्छतावादी कडवट सूर कोठेच निघालेला नाही. उलट अनुभवांतील सत्य आणि विशालता वाढविण्याच्या इच्छेने दुःखाला सामोऱ्या जाऊन त्या त्याचे स्वागत करतात. त्याच्या मौनात त्यांना जिव्हाळा दिसतो आणि डोळ्यात 'कितीक जन्मांच्या ओळखीची स्निग्ध खूण' दिसते. (माझे दुःख आले घरा) आणि म्हणूनच

> प्रभु आपुल्या हास्यासम
> करुणामय दुःख हवे !

असे मागणे त्या मागतात. 'मजला तूं' या कवितेत कुंतीच्या श्रीकृष्णाकडील 'विपदः सन्तु नः शश्वत्' या मागणीतील रहस्य त्यांनी सहजच ओळखले आहे. त्यांच्या या चिंतनशीलतेतूनच 'सुख' आणि 'कालनदीवर' या कवितांची निर्मिति झाली आहे.

'स्वप्नजा 'मधल्या प्रेमकवितांतून प्रेम ही सामान्य भावना राहिली नाही. ती अत्यंत कोमल तरी बनते नाहीतर उदात्त तरी. 'तिथेच तर', 'एका क्षणाचा पक्षी' आणि 'नजर तुझी' या कवितात प्रियकराच्या सहवासातील नेमका भावक्षण टिपला आहे. 'वृथाच स्मरते', 'जिद्द तुझी', 'दर्शनबधिरा', अन् 'तेव्हापासुनि' आणि 'त्या पत्रातील अक्षर' इत्यादि कवितातील प्रीतिभावना सूक्ष्म आणि कल्पना कमनीय आहेत; तर 'धाम 'मध्ये हीच भावना अधिक गहिरी बनली आहे. पतिप्रेमाचे गूढरम्य भाव स्त्रियांच्या मनात लपलेले असतात. त्याचे मनोहर रूप 'ये ज्येष्ठ पौर्णिमा' या कवितेच्या पूर्वार्धात आढळते आणि तिच्याच उत्तरार्धात एक शोकान्त प्रणयकथा वाचावयास मिळाल्याने त्या कवितेचे भावस्पर्शित्व कितीतरी पटींनी वाढले आहे.

'डोळ्यात प्रतीक्षा' 'नको नको ना' आणि 'वळिवाचा पाऊस' या त्यांच्या कवितांवरून त्यांच्या तरल कल्पनाशक्तीची व कोमल भावनेची प्रतीती येते. 'नको म्हणूस एकटी' या कवितेत एकटेपणाची जाणीव होऊनहि कवयित्री भांबावून, गडबडून जात नाही. तिच्या

---

कवयित्री–पद्मा. प्रकाशक–मौज प्रकाशन, मुंबई ४. मू. ४ रुपये.

सोबतीला सुख आहे, दुःख आहे आणि श्रद्धाहि ! अशा श्रद्धाशील मनाने संसाराला सामोरी जाणारी स्त्री—

येते विसाव्यास मात्र
वळूनीया पाठमोरी

असे सांगून भावकोमलतेचा कळस केला आहे.

काव्यसंग्रहाला मिळालेले 'स्वप्रजा' हे नांव अनुरूप आहे. स्वप्नाविषयी फार मोठे आकर्षण कवयित्रीला आहे. 'स्वप्नीही स्वप्ने बघत—स्वप्नातचि व्हावा अंत' असे म्हणणाऱ्या बालकवींच्या कवितेत स्वप्नभंगाचे हुंदके आहेत. पद्मांच्या कवितेत स्वप्नभंग हे दुःख नाही; कारण स्वप्नपूर्तीचा लोभ नाही.

स्वप्ने सारीच विरती;
ठरे खोटाच फुलोरा
क्षुद्रतेच्या गुंतागुंती

हे त्यांना माहीत आहे. पण म्हणून त्या जाग्या आहेत काय ? अंहं ! जाग तर क्षणभराची आहे. कारण—

येते निवाऱ्याला पुन्हा
उडालेली स्वप्नभूल

एकंदरीत 'पद्मा' ची 'स्वप्रजा' स्नेहशील, विचारगंभीर, आणि प्रशांत आहे. तिच्यात प्रखरता, दाहकता अगर उन्माददका नाही. विचित्र व विरूप प्रतिमांचा पाठलाग नाही. आशयापेक्षा प्रतिमेला अधिक मानले नाही. तिच्यात श्रद्धा, भावना, वेदना स्वप्ने आणि तळमळ याशिवाय दुसरे काही नाही. तिचे रूप मोहक आहे. तिची जात 'फुलपंखी' आहे आणि रसिकाला कांही काळ गुंगत ठेवण्याचे सामर्थ्य तिच्यात आहे.

---

## " संत समागम "

—प्रा (डॉ.) न. का. घारपुरे

प्रा. भ. श्री. पंडित यानी १९३६ पासून १९५३ पर्यंतच्या कालात निरनिराळ्या नियतकालिकातून सन्तसाहित्य विषयक जे नऊ लेख वेळोवेळी प्रसिद्ध केले त्यांचा हा संग्रह आहे. हे लेख म्हणजे समीक्षणात्मक साहित्य असून ते अभ्यसनीय आहे यात शंका नाही. लेखकाने प्रारंभी जरी स्पष्ट म्हटलें आहे की माझी भूमिका संशोधकाची नाही, तरी हे स्फुट लेख वाचल्यानंतर लेखकाची बैठक जशी समीक्षकाची आहे, तशीच संशोधकाचीही आहे; मात्र त्यांत दुराग्रह नाही. मराठीतील सन्त साहित्याची संगति व्यवस्थित लावण्यासाठी अन्य भाषातील सन्तसाहित्याचा तौलनिक विचार करण्याची कशी जरुरी आहे हे ह्या लेखसंग्रहाच्या द्वारे लेखकाने पटवून दिले आहे व हाच ह्या लेखसंग्रहाचा विशेष आहे.

पहिला लेख "महीपति व नाभाजी आणि प्रियादास" व दुसरा लेख "भक्तमालेमधील महाराष्ट्रीय सन्त" यांत महीपतीने सन्तचरित्रे लिहिताना नाभाजीचा ग्रंथ "भक्तमाला" व त्यावर प्रियादासाने लिहिलेली 'भक्तरसबोधिनी' ही टीका हे ग्रंथ कसे आधारभूत ग्रंथ म्हणून घेतले आहेत ते स्पष्ट केले आहे. नाभाजीच्या 'भक्तमालेत' भिन्न भिन्न पंथाच्या व मतांच्या अशा २०० सन्तांच्या चमत्कारांचे वर्णन केले आहे. वरील तिघांनीही ही चरित्रे भाविकतेने लिहिली असल्यामुळे, चमत्कारांवर जास्त भर आहे, म्हणून यांना चरित्रग्रंथ (ऐतिहासिक दृष्ट्या) म्हणण्याऐवजी कथाग्रंथ म्हणणेंच जास्त शोभेल असे प्रा. पंडितांनी आपले मत दिले आहे. भक्तमालेत ज्ञानदेव, नामदेव आणि विल्वमंगल (पुंडलिक) या तीन महाराष्ट्रीय सन्तांच्याबाबत जी माहिती आली

---

" संत समागम " : लेखक :— भ. श्री. पंडीत, प्रकाशक :— नाग विदर्भ प्रकाशन अमरावती १, पृष्ठें ११५, मू. रु. ३—५०

आहे, त्या माहितीच्या साहाय्याने ज्ञानेश्वरी लिहिणारे व अभंग गाणारे असे दोन ज्ञानदेव होते काय ? ज्ञानदेव व नामदेव हे समकालीन होते किंवा नव्हते ? ज्ञानेश्वरी हा ग्रंथ वैष्णवांना पूज्य कसा झाला ? वगैरे प्रश्नांवर बराच प्रकाश पडण्यासारखा असा निर्वाळा लेखकाने दिला आहे.

तिसरा लेख " सन्त सेनाजी " वर असून त्यांचे नाव सेनापति होते व ते जातीने न्हावी असून, ते महाराष्ट्राबाहेरचे संत असावेत व महाराष्ट्र ही त्यांची कर्मभूमि असावी असा लेखकाने निष्कर्ष काढला आहे.

" एकनाथांचे चरित्र व कार्य " यात एकनाथांचे महत्त्व सांगितले असून, ज्ञानेश्वरी व भागवत या दोन ग्रंथांच्या भूमिकेतील फरक स्पष्ट केला आहे. ज्ञानेश्वरांच्या ज्ञानेश्वरीतला कृष्ण हा किंकर्तव्यमूढ व शोकसंविग्नमानस धनुर्धरास प्रतिपक्षाविरुद्ध युद्धास प्रवृत्त करणारा कुशल राजनीतिज्ञ आहे, तर नाथांच्या भागवतांतील कृष्ण हा शांत व दांत उद्धवास भक्तीच्या आनंदात निमग्न करणारा प्रेमळ परमेश्वर आहे. नाथांच्या चरित्राबाबत व कार्याबाबत लेखकाने एक नवी दृष्टि पुढे मांडली आहे. समाजांत बहुसंख्येने असलेली ' भाळी भोळी ' कशी तरतील ही काळजी नाथांना होती."

" तुकाराम व कबीर " या पांचव्या लेखात ह्या दोघातील साम्य व फरक सांगितला असून, तुकारामावर कबीराचा फार मोठा प्रभाव पडला होता व तुकारामाची हिंदी भाषेशी कामचलाऊ ओळख होती, व तसेच तुकाराम हा अशिक्षित व अनभ्यस्त होता असा जो सार्वत्रिक समज आहे तो बरोबर नाही हे स्पष्ट केले आहे.

'कवयित्रींची परंपरा' व 'ओवीचा विकास आणि नियमन' हे दोनही लेख उत्तम आहेत. महानुभाव पंथीय कवयित्री महदंबा व तिच्या नंतरच्या कयियत्रींचा उल्लेख करून ही परंपरा अखंड का नाही व त्याला कारणे कोणती आहेत याबाबत लेखकाने मोठी मार्मिक चर्चा केली आहे. तसेच ओवी, अभंग व तदंतर्गत इतर काही अस्सल मराठी म्हणविणाऱ्या छंदांच्या नियमनांचा विचार सोपपत्तिक रीतीने केला असून, शेवटी अभंग आरती व भूपाळीचा उपप्रकार यासंबंधीही माहिती दिली आहे.

' रघुनाथ पंडितः स्थळ, काळ व व्यक्ती ' या लेखात रघुनाथ पंडित हा देशस्थ ब्राह्मण असून तो कवि मोरोपंताच्या हयातीतच झाला असावा व त्याचा काल इ. स. १७३५ ते १७९८ हा असावा व तो तंजावरचा होता असे मत लेखकाने मांडले असून, त्याच्या पुष्ट्यर्थ तर्कशुद्ध विवेचन केले आहे.

" चंडीदास व विद्यापति " या शेवटच्या लेखात या दोन वंगीय कवींची ओळख करून दिली आहे. हे दोघेही समकालीन असून वैष्णव सांप्रदायी कवी होते. दोघांनीही राधाकृष्णाच्या विशुद्ध भक्तीवर कविता लिहिली आहे. वंग-वाङ्मयांत या दोघांचेही स्थान मोठे आहे.

या सन्त साहित्यविषयक नऊ लेखांचे लेखक हे मराठी भाषा व वाङ्मय यांचे एक नाणावलेले प्राध्यापक असून, त्यांचा भर संशोधनावर आहे. लेखांची भाषा सुबोध व सरळ आहे. या लेखांत चर्चा आहे, विवेचन आहे, तौलनिक अभ्यास आहे, समीक्षण आहे व संशोधनही आहे; मात्र दुराग्रही अभिनिवेश नाही. वृत्ती अभ्यासूची असून, बैठक ज्ञानसंपादनाची व ज्ञानदानाची आहे. म्हणूनच संतसमागम या पुस्तकात लेखकाने जसा संतांचा परिचय व समागम साधला आहे, तसाच त्याच्या वाचनाने मराठी भाषेचा अभ्यासक व वाचक याला सुद्धा या सारासारज्ञानचर्चेच्या द्वारे संतसमागम मिळण्यासारखा आहे व तो सुयोग प्रा. पंडितांनी आणून दिल्यामुळे त्यांचे अभिनंदन करणे युक्तच ठरेल.

# उमटलेली पावले : :

—वि. म. कुलकर्णी

श्रीमती राधाबाई आपटे यांनी 'ढळला रे ढळला दिन सखया' नावाने आपले पति कै. आपटे गुरुजी यांचे काही जीवनक्षण रेखाटले तेव्हाच एक आगळे चरित्र चित्रण लिहिणारी लेखिका म्हणून महाराष्ट्र त्यांना ओळखू लागला.

प्रस्तुत पुस्तकात कै. पां. श्री. ऊर्फ आपटे गुरुजी यांच्या त्यागी, धैर्यशील व हुतात्म जीवनाची गाथा वाचावयास मिळते. मन त्या धीरोदात्त जीवनप्रवाहात सुस्नात होते. शिक्षणमार्गे देशसेवा करण्यासाठी बद्धपरिकर झालेले आपटे गुरुजी व त्यांची अखंड चाललेली झुंज आपल्या डोळ्यासमोर साकार होते. जीवनाचें मोल देऊन मिळविलेले अनुभवाचे बोल येथे अनेक पानावर आढळतात. उदा., 'संकटाच्या काळात धर्मग्रंथ माणसास तो काळ पार करण्यास मदत करतात', 'लग्न झाल्यानंतर चारपाच वर्षात मुलाचे सौख्य स्त्रीला मिळाले नाही तर तिचा मनोविकास खुरटून जातो.' इ.

बाळपणापासूनचा सजीवनाचा चित्रपटही लेखिकेने या पुस्तकात दर्शविला आहे व तोही हृद्यच वाटतो. आपटे गुरुजींच्या प्रतिमेचेहि सुस्पष्ट दर्शन या पुस्तकाच्या पानापानातून घडते. विशेषतः त्यांना देशभक्तीच्या वाऱ्याने कसे झपाटले होते व संसारांतही एक प्रकारचा फकिरी बाणा त्यांनी कसा दाखवला हे वाचताना एक वेगळे जीवन आपण पाहात असल्याचा प्रत्यय येतो. आपटे गुरुजी यांचे व्यक्तिमत्त्व गांधीवादाने प्रभावित झालेल्या कार्यकर्त्याचे व्यक्तिमत्त्व होते.

सामान्यांना जी सांसारिक संकटे म्हणून भिववितात ती ध्येयदीप्तीने ज्यांचे अंतर उजळले आहे अशांना कःपदार्थ वाटत असतात; व म्हणूनच सर्वसामान्यांच्या जीवनांत आढळणारी संकटे गुरुजींच्या जीवनात आली असूनही ते कधी डगमगले नाहीत. त्यांनी कधी माघार म्हणून घेतली नाही. त्यांच्या त्यागशील व्यक्तिजीवनात ज्या विविध घटना घडल्या त्यांचा अन्वयार्थ लागेल अशा सहज रीतीने राधाबाई आपटे यांनी त्यांची चरित्र कथा येथे वर्णिलेली आहे. 'आमच्या आयुष्यातील काही आठवणी' व 'स्मृतिचित्रे' या मालिकेत बसणारे एक सुरेख आत्मचरित्र म्हणून या पुस्तकाचा उल्लेख मराठी साहित्य विश्वात केला जाईल असे निभ्रान्त वाटते.

येवले हे गुरुजीचे कार्यक्षेत्र ठरले होते. त्या एका गावात राहून गुरुजीनी राष्ट्रसेवेसाठी किती प्रकारे कसे कष्ट केले हे येथे वाचावयास मिळते. तेथील राष्ट्रीय शाळा त्या कठीण काळी त्यांनी कशी वाढविली हे वाचले म्हणजे मन आदराने भरून येते. स्वकीयांचा विरोध झाला म्हणजे त्यांच्या सात्विक संतापाचा पारा वर चढत असे हे साहजिकच वाटते. तेव्हाच्या राष्ट्रीय शाळाचें स्वरूप, हेतु 'मराठी' या माध्यमाचे वैशिष्ट्य व शारीरिक शिक्षणाचे महत्त्व या सर्व गोष्टी लेखिकेने अनुषंगाने स्पष्ट केलेल्या आहेत कै. आपटे गुरुजींचे देशासाठी सत्याग्रह करून तुरुंगात जाणे व आपल्या राष्ट्रीय शाळेकरितां दर रविवारी गावात भिक्षा मागणे या गोष्टी तर मनावर फारच परिणाम करतात. शाळेतील लो. टिळकांच्या फोटोला नमस्कार करून मंडळी भिक्षेला निघत. परत आल्यावर सर्व भिक्षा, धान्य व पैसे फोटोपुढेच ठेवले जात भिक्षेच्या वेळी शिक्षकांच्या पायामध्ये वाहाणा नसत. इ. वर्णन वाचताना एखाद्या आधुनिक यज्ञाचे वर्णन वाचत असल्याचा भास होतो. त्या त्या शिक्षकांच्या तरुण स्त्रियांची मनः-

**उमटलेली पावले** : ले.—राधाबाई आपटे. प्रमुख विक्रेते—साधना प्रकाशन पुणें २. मू. ५ रुपये. पृष्ठसंख्या २८३.

स्थिति देखील कशी उदात्त भावनेने भारलेली असे, हेहि आपटे यांनी दिले आहे.

राधाबाईनी आपले जीवनशिल्प हळूहळू कसे आकारास आले ते मनोज्ञरीतीने कथिले आहे व आपल्या जीवनरूपी यमुनेचा प्रवाह गुरुजींच्या चरित्रगंगेस कसा मिळाला तेही वर्णिले आहे. बाळपणीच्या वडिलांचा धाकदरारा कसा होता व त्याच्याच निडर स्वभावामुळे आपणास, आयुष्यभर उपयोगी पडणारे, अनेक संकटांना तोंड देऊं शकणारे धैर्य कसे निर्माण झाले हे त्यांनी यथार्थ सांगितले आहे. देवाचा प्रवेश आपल्या मनोभूमीत कसा झाला हेही त्यांनी दिले आहे. त्यांचे विविध सार्वजनिक काम करणे, हौसेने काव्य रचणे, प्रसंगी कीर्तन करणे, संकटकाळी नर्सिंगचा व्यवसाय करून संसार सावरून धरणे हे सारे वाचून त्यांच्या व्यक्तिमत्वाचे विविध रूप डोळ्यासमोर स्पष्ट उभे राहते.

श्रीमती आपटे यांनी जे दिव्य सहजीवन व्यतीत केले तेही आडपडदा न ठेवता सांगितले आहे हें विशेष. त्यांच्या स्वतःच्या व आपटे गुरुजींच्याहि जीवननिष्ठा या पुस्तकात उमटल्या आहेत. राधाबाई पतीच्या त्यागशील जीवनाशी समरस झाल्या हे जितके खरे, तितकेच त्यांनी स्वतःचे व्यक्तिमत्वही उभारीत नेले, हे विशेष म्हणावयास हवे. पतिपत्नींच्या बाबतीत 'समसमा संयोग की जाहला' अशी स्थिति जाणवते. ग्रंथाच्या शेवटी, 'पतीच्या आयुष्याबरोबर पत्नीचे आयुष्य संपते' हा जो मनोमन पटलेला सिद्धान्त राधाबाईंनी स्पष्टपणे सांगितला आहे, तो भारतीय जीवन दृष्टीला पटणारा असाच आहे. निष्ठा डळमळीत होण्याच्या या युगांत निष्ठासंपन्न असे एक जीवनचरित्र वाचावयास मिळून, मनास जीवनपथावर उमटलेली ही चार पाऊले धीराच देत राहातात.

- आपटे गुरुजींचा जीवनपट व लेखनसंभार शेवटी दिला असता तर बरे झाले असते. आरंभीच्या प्रकरणातून माहेरच्यां ज्या व्यक्तिरेखा–दादा इत्यादि आल्या आहेत त्यांचे नाव–गाव इत्यादि दिले असते तर तेही इष्ट ठरले असते.

---

टीपः– 'रथचक्र' या कादंबरीचे परीक्षण (पृष्ठ ६६) प्रा. भीमराव कुलकर्णी यांनी केले आहे.

## शक्तिकेतु : : —भ. श्री. पंडित

मी ऑगस्ट १९६२ च्या 'मनोहरांतील' संपादकीय वाचत होतो;– " इंटरनॅशनल बुक डेपोचे श्री. विठ्ठलराव दीक्षित, अभय वाचनालयाचे चालक श्री. गं. रा. पाठक वगैरे मंडळींनी प्राप्त आपत्तीला तोंड कसे दिले याची हकीकत स्थलाभावी देता आली नाही.... श्री. पाठक यांनी धीर न सेडतां 'अंतर' (कथासंग्रह) आणि 'शक्तिकेतु' (खंडकाव्य) अशी आपली वाचनीय पुस्तके प्रकाशित केली. 'महापूर' नावाचे उत्कृष्ट दीर्घ काव्यहि त्यांनी रचले आहे." हा मजकूर वाचत असतानाच श्री. पाठक यांचे सहाशे चौऱ्याण्णव ओळींचे 'शक्तिकेतु' हे सरस व सुंदर खंडकाव्य माझ्या हाती पडले. त्याच्या 'प्रास्ताविका' त वाचले;–" सध्या समाजाचे आणि संपादकांचे काव्याविषयी प्रतिकूल मत आहे. त्यातून हे एवढे प्रदीर्घ काव्य. अशा परिस्थितीत कोणता सूज्ञ संपादक हे काव्य छापण्यास धजला असता बरे! वाचकांनी कदाचित् अशा संपादकाची चेष्टामुद्दा केली असती. तेव्हा दुसरा मार्ग प्रकाशकाचा. परंतु काव्याची पुस्तके खपायला अति जड असा लौकिक आहे. तेव्हा प्रकाशकांना काव्य-प्रकाशन एक आपत्ति वाटली तर त्यात नवल नाही. परंतु काही ज्येष्ठ व्यक्तींना माझ्या-विषयी आपुलकी वाटते. त्यांच्या बळावर मी हे (प्रकाशनाचे) साहस करूं शकलो." स्वानुभवाचा कडवटपणा असणारा हा मज-कूर आमच्या महाराष्ट्रातील लेखकांच्या असाहाय्यतेवर, प्रकाशकांच्या कृपणतेवर, संपादकांच्या फाजील व्यावहारिकतेवर आणि वाचकांच्या अरसिकतेवर विदारक प्रकाश टाकणारा आहे. श्री. पाठकांना पानशेतच्या पुराचा तडाखा बसला. त्यांचे 'महापूर' नावाचे दीर्घ काव्य त्याच करुण भीषण प्रसंगावर असावे. त्या अनपेक्षित आपघाताच्या दारुण प्रसंगाला न जुमानता श्री. पाठक यांनी 'शक्तिकेतु' हे खंडकाव्य आठ महिन्यापूर्वी प्रसिद्ध केले असून "माझ्या मराठी रसिकांनी हा माझा प्रयत्न गोड मानून घ्यावा" अशी कळकळीची विनंती केली आहे.

श्री. पाठक यांच्या लहानपणी महाराष्ट्रीय हरदास महाभारतातील एका उपआख्याना-वर कथा करीत. ह्या खंडकाव्यातील मध्य-वर्ती कल्पनेला त्या कथेचे अधिष्ठान आहे. सर्पराज वासुकी ह्याची कन्या सुमति हिला द्वितीय पांडव भीमसेन ह्याच्या सहवासापासून एक धैर्यशाली व बलवान पुत्र होतो. त्याचे नाव शक्तिकेतु. शक्तिकेतूला आपल्या मातेच्या मुखाने पित्याच्या पराक्रमाची व अकुतोभय वृत्तीची हकीकत ऐकावयास मिळते. जन्मापासून त्याने पित्याला पाहिलेले नसते. तो तरुण होतो. त्या वेळी भारतीय युद्ध चालू असते. आपल्या मातेकडून तो 'अभिज्ञान' म्हणून हस्तिदंताचे पातळ पान असलेला हेमकरंडक घेतो. त्यावर सुमतीने स्वहस्ताने भीमाचे चित्र रेखाटलेले असते. आणि युद्धांत भाग घेण्यासाठी कुरुक्षेत्रावर जातो, परंतु भीमाला तो आपला पुत्र आहे हे लक्षांत येत नाही आणि शक्तिकेतूला भीम हे आपले वडील आहेत हे समजत नाही, त्यामुळे न कळत झालेल्या त्या उभयतांच्या गदायुद्धात शक्तिकेतु धारातीर्थी पतन पावतो.

---

**शक्तिकेतु** : कवि व प्रकाशक गं. रा. पाठक । तीन (जुना) सदाशिव, पुणे २ : मू. : रु. १.

या खंडकाव्याचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. पूर्वार्धात सुमति आपल्या पुत्राला तिच्या प्रेमाची व विवाहाची कथा सांगत आहे. त्या कथेच्या ओघांव अमृत कलशाची पुष्करिणी असलेल्या उपवनाचे वर्णन आहे. त्यांत श्री. पाठकांच्या कल्पना-चमत्कृतीचा चांगला प्रत्यय येतो. परंतु आईने मुलाला प्रस्तुत प्रसंग निवेदन करण्यांत औचित्य वाटत नाहीं. उत्तरार्धातील भीषण रात्रीचे वर्णन स्वभावोक्तीमुळें चित्रमय झाले आहे. तें पाठकांच्या सूक्ष्म निरीक्षण शक्तीची साक्ष देतें;—

मध्यरात्र ती काळोखाचा पूर्ण असे अधिकार।
युद्धें झाले श्रांत, स्वस्थतें निद्रित झाले वीर।
विस्तृत पसरे क्षेत्र कुणाचा नसे तिथे संचार।
दुरुन शिवा त्या अशिव सुरांनी माजविली काहूर।

छिन्नगात्र एकादे नेती वृक ओढुनिया दूर।
काळोखांतच श्वान तयावर भुंकत तें भेसूर।
अवकाशांतुन दिवाभीतहि सावकाश ते जाती।
काळ्या त्या घुमटांत तेधवा रवते त्यांचे घुमती।

पाठकांची भाषा ही निर्झराच्या निवळशंख पाण्याप्रमाणें स्वच्छ आहे आणि रचना ही त्याच्या प्रवाहाप्रमाणे अस्खलित आहे.

प्रस्तुत खंडकाव्यातील कथा मूळातच जितकी करुण तितकीच भव्योदात्त असल्यामूळे काव्याच्या ओघांत व स्फूर्तीच्या आवेगांत पाठकांनी संयमित विप्रलंभ, उदात्त करुण, प्रोत्साहक वीर व निरागस वत्सल ह्या रसांचे प्रसंगोचित उद्भावन केले आहे त्यावरून त्यांच्या कवित्वाचे सामर्थ्य ध्यानात येते.

समारोपांत श्री पाठक सांगतात, " माध्यमिक शाळेंत शिकत असतांना शेवटच्या वर्षी मॅथ्यू ॲर्नाल्डच्या ' सोहराब आणि रुस्तुम ' या काव्याशी माझा परिचय झाला." पाठक ह्यांचा हा शक्तिकेतु, वाचतांना मला वारंवार त्या इंग्रजी खंडकाव्याची आठवण होत होती. पाठकांनीं शाकीचे सहा किंवा आठ चरण एकत्रित घेऊन जर पल्लेदार रचना केली असती तर ' सोहराब अँड रुस्तुम ' प्रमाणे ' शक्तिकेतुहि विशेष धीर गंभीर वाटला असता. Arnold प्रमाणे पाठकांनी ' मिल्टॉनिक ' उपमेचा उपयोग केला असता, तर शक्तिकेतुचा उठाव आहे त्यापेक्षां अधिक दमदार व जोमदार वाटला असता. पाठकांनी आपल्या इकडील सनातन परिपाठी प्रमाणें शेवटी भगवान श्रीकृष्णांना आणून अनुतापदग्ध भीमाचे सात्वन करवले आहे. Arnold आपल्या करुण काव्याचा शेवट दाट काळोखांतून आणि क्षणभंगुर मानवांच्या दाट वर्दळींतून वाट काढत-काढत Aral sea कडे वाहत जाणाऱ्या निवांत व शांत Oxus नदीच्या सूचक व कलात्मक वर्णनाने करतो. पाठकांना तसा शेवट साधता आला असता. स्वयंप्रेरणेने किंवा परानुकरणाने काव्यात नावीन्य आणण्यासाठी असे प्रयोग आवश्यक असतात.

वीसपंचवीस वर्षांपूर्वी ' अलीकडे महाकाव्यें कां निर्माण होत नाहींत ? ' हा वाद विषय झाला होता. आतां तर खंडकाव्येंहि निर्माण होत नाहींत. अशा प्रतिकूल परिस्थितीत श्री. पाठक यांनी ' शक्तिकेतु ' निर्माण करून आपल्या धीरोदात्त प्रतिभाशक्तीची ओळख करून दिली आहे. त्यांच्या ह्या खंडकाव्याने प्रदीर्घ रचना प्रिय असणाऱ्या अभिजात रसिकांच्या अपेक्षा वाढल्या आहेत. श्री. पाठक त्या पूर्ण करतील अशी खात्री आहे.

—०—

# आकाशलहरी : : -- भ. श्री. पंडित

मराठी भाषेचे सुप्रसिद्ध मर्मज्ञ आणि वाङ्मयाचे रसज्ञ प्राध्यापक बनहट्टी ह्यांनी मुंबई, पुणें, नागपूर व औरंगाबाद येथील नभोवाणींवरून प्रसारित केलेल्या कांहीं निबंधक भाषणांचा हा संग्रह आहे. प्रस्तुत संग्रहांतील 'आधुनिक बंगाली कविता', 'पंडितराय जगन्नाथ आणि त्यांची प्रिया', 'पुरुषांच्या दृष्टिकोनांतून पत्नी', 'मराठ्यांच्या सैन्याची उभारणी व रचना', व 'सरमा आणि पणि' ही पांच भाषणें वगळल्यास बाकीची बारा भाषणें मराठी भाषा व वाङ्मय यांच्याशी कोणत्या ना कोणत्या तरी दृष्टीनें संबद्ध आहेत. वरील पांच भाषणांपैकी पहिली दोन भाषणेंहि बंगाली व संस्कृत ह्या भाषांतील वाङ्मयाशी संबद्ध आहेत. प्रकाशकांनी नंतरची तीन भाषणें वगळली असती तर वाङ्मयविषयक लेखांचा हा एक निर्भेळ संग्रह झाला असता.

प्रा. बनहट्टी ह्यांच्या ह्या बहुतेक भाषणांतून वाङ्मयाचे सूत्र अनुस्यूत असले, तरी त्या भाषणांच्या स्वरूपांत भरपूर विविधता आहे. 'साहित्यांतील राजकारणी', 'मराठी वाङ्मयाच्या इतिहासाची अखिल भारतीय पार्श्वभूमि', 'आधुनिक बंगाली कविता' आणि 'तात्यासाहेबांचे स्मृतिचित्र' ह्या चार भाषणांत त्यांनी साहित्याचा राजकारणाशी संबंध कसा येत असतो हे दाखविले असून 'मराठी चरित्रवाङ्मय', 'लोकसाहित्याची गंगा', 'वारकरी पंथ आणि त्याचें वाङ्मय', 'मराठीतील विनोद', 'सुधारक आणि आगरकर' ह्या पांच भाषणांत त्यांनी साहित्य व समाजकारण ह्यांचा परस्पर संबंध कसा सापेक्ष आहे ते स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. 'मराठी साहित्यांतील पहिले वहिले' व 'ज्ञानेश्वर महाराजांचे चरित्र व कार्य' ही त्याची दोन भाषणें निर्भेळ वाङ्मयीन नाहीत. त्यात त्यांच्या चिकित्सा बुद्धीचे संशोधन आहे आणि तार्किकतेचे युक्तिसंगत मत प्रतिपादन आहे. प्रा. बनहट्टी हे जसे जातिवंत रसिक तसेच व्यासंगी विद्वान् आहेत. त्यामुळे त्यांच्या सर्व भाषणांत कमी अधिक प्रमाणांत कवित्व व विद्वत्व यांचा समन्वय झाला आहे. ह्या त्यांच्या गुणास बहुश्रुततेची जोड मिळाली आहे. त्यामुळे ही त्याची भाषणे विषयप्रतिपादन, विचारदर्शन आणि अमोघ व परिणामकारक लेखन ह्या दृष्टींनी उत्कृष्ट झाली आहेत.

वर मी 'भाषणा' ना 'लेखन' असें म्हटले आहे. कारण 'आकाशलहरी' वरील भाषणांत आकाशवाणी केंद्रावरील अधिकाऱ्यांच्या आणि ध्वनिप्रसारक यंत्राच्या 'लहरी' चा भाग बराच असतो. अधिकाऱ्यांनी विषय द्यावयाचा, त्या विषयावर संभाषकाने हस्तलिखित तयार करावयाचे आणि ठरलेल्या दिवशी, ठरलेल्या वेळी, ठरलेल्या अवधीत ध्वनिप्रसारकासमोर उभे राहून ते वाचून काढावयाचे आणि जणू काही आपण श्रोत्याशी बोलत आहोत अशी हुबेहूब बतावणी करावयाची हा साराच प्रकार कृत्रिम व नाटकी आहे. नाटकात समोर प्रेक्षक तरी असतात. पण आकाशवाणीचे श्रोते संभाषकाच्या समोर नसतात. ते घरोघर असतात. प्रा. बनहट्टींनी नाटकासंबंधी भरपूर लिहिले आहे. 'नाट्य आणि रंगभूमि,' 'मराठी नाट्यकला व नाट्यवाङ्मय' आणि 'मराठी रंगभूमीचा इतिहास

आकाशलहरी— ले.— श्री. ना. बनहट्टी प्र०—सुविचार प्रकाशन मंडळ, धनतोली, नागपूर १. पृष्ठें १२६, मू. रु. ३

खंड पहिला' हे त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. प्रस्तुत 'आकाश लहरी' तहि 'नाटकाचे तंत्र' व 'रसविचार' ही त्यांची नाट्य-विषयक भाषणे आहेत. परंतु प्राध्यापकांचा स्वतःचा रंगभूमीशी नट म्हणून संबंध आलेला नाही. त्यांचा स्वभाव साधासुधा आहे. त्यांत सोंगढोंग नाही. त्यामुळे त्यांच्या ह्या भाषणामागे त्यांच्यातला 'संभाषक' क्वचित असून नसून प्रत्ययाला येतो; मात्र त्यांच्यातला 'लेखक' एकसारखा जाणवतो. नभोवाणीवरील अनेक वक्त्यांना माझे हे विधान लागू पडेल.

नभोवाणीवरील ह्या जाचक बंधनाचा 'आकाश लहरी' तील भाषणावर एक असा परिणाम झाला आहे की ती काही ठिकाणी त्रुटित व खंडित वाटतात. 'मराठीतील विनोद' हा विष्णु कृष्ण चिपळूणकरांपर्यंत येतो. परंतु पुढे तो परांजपे, खाडिलकर, कोल्हटकर ह्या नावांच्या निर्देशातच लुप्त होतो. "मराठी चरित्र-वाङ्मयातील गोड प्रकार म्हणजे 'आत्म-चरित्र'!" असे प्राध्यापक बनहट्टी सांगतात. पण तो गोड प्रकार रसिकांना पूर्णपणे चाख-ण्यास किंवा चोखण्यास मिळत नाही. साराश, 'आकाश लहरी' तील ही भाषणे रसिकाची दुधाची तहान ताकावर भागवतात. परंतु त्यात संभाषकाचा काही दोष नाही.

आजच्या धावपळीच्या या जीवनात वाच-कास थोडा वेळ विरंगुळा म्हणून टेकावयास सवड नाही त्याच्या दृष्टीने नभोवाणीवरील ही त्रुटित व सुटसुटीत भाषणे खरोखर उपयुक्त व उपकारक आहेत. 'लोकसाहित्याची गंगा', 'मराठीतील विनोद' 'पंडितराय जगन्नाथ आणि त्यांची प्रिय' 'पुरुषांच्या दृष्टि-कोणातून पत्नी' व 'तात्यासाहेबांचे स्मृतिचित्र' ही भाषणे चुरचुरीत व चटका लावणारी असून त्यांत लेखकांच्या लेखणीतील लालित्य अव-तीर्ण झालें आहे. 'सरमा आणि पणि' हें भाषण मथळ्यावरून क्लिष्ट वाटले तरी त्यां-तील संशोधन व विवेचन आल्हाददायक आहे. 'नाटकाचे तंत्र', व 'रस विचार' ह्या भाषणाचे विषय शास्त्रीय आहेत. परंतु प्राध्यापक बनहट्टींनी ते मनोरंजक करून सांगितले आहेत

'वारकरी पंथ आणि त्याचें वाङ्मय', 'मराठी साहित्यातील पहिले वहिले' व 'ज्ञानेश्वर महाराजांचें चरित्र व कार्य' ह्या भाषणात प्राचीन मराठी वाङ्मयासंबंधी कांही मौलिक विचार प्रकट झाले आहेत. त्याचप्रमाणे 'साहित्यातील राजकारणी' 'मराठी चरित्र वाङ्मय' आणि 'सुधारक व आगरकर' ह्या भाषणांत आधुनिक मराठी वाङ्मयाविषयीचे कांही नवे विचार व्यक्त झाले आहेत. 'मराठी वाङ्मयाच्या इति-हासाची अखिल भारतीय पार्श्वभूमि' हें भाषण तर अतिशय महत्त्वाचे आहे. मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचे लेखन करताना कानडी, हिंदी, गुजराती, उर्दू, बंगाली, इंग्रजी व संस्कृत ह्या भाषातील वाङ्मयाच्या अभ्यासाची वही व किती आवश्यकता आहे हें त्यावरून पटेल. वरील सर्व भाषणा-तील प्राध्यापक बनहट्टी ह्यांचे विचार सर्वस्वी स्वतंत्र असून ते त्याच्या सूक्ष्म चिंतनाची व चौफेर व्यासंगाची साक्ष पटवतात.

ह्या भाषणसंग्रहास प्रा. म. ना. अदवंत यांचे 'रसग्रहण' लाभले आहे. त्यांत ते म्हणतात; "प्रा. बनहट्टी यांचा शिष्य होण्याचे भाग्य मला लाभले नव्हते. पण त्यांच्या साहित्यसेवेचा मला फार पूर्वीपासून परिचय होता" प्रस्तुत अभिप्राय लेखकाला मात्र प्रा. बनहट्टी यांचा शिष्य होण्याचे सद्भाग्य लाभले आहे.

प्रा. बनहट्टी हे साहित्यसेवेंत कसे चूर असतात हें त्याने अनुभवले आहे व गेली पस्तीस वर्षे तो तें प्रत्यक्ष पाहात आहे.

( पृष्ठ ८५ पहा )

# केशवसुत-पांच चिंतनिका : :

— म. ना. अदवंत

'आधुनिक मराठी कविता' हा प्रा. भ. श्री. पंडित यांच्या अभ्यासाचा व संशोधनाचा खास विषय. त्यातहि अव्वल इंग्रजी अमलांतील कविता व केशवसुतांचा कालखंड यांचा त्यांनी अत्यंत चिकित्सकपणें अभ्यास केला आहे व त्या त्या कालखंडातील कविताबाबत त्यांनी काढलेले निष्कर्ष आज सर्वमान्यहि झाले आहेत. ते स्वतः कवि असल्याने त्यांच्या चिकित्सक दृष्टीला रसिकतेची जोड मिळाली आहे. त्यामुळें कोणत्याहि कवीचा विचार करतांना ते ज्याप्रमाणें त्या कवीचे जीवन, त्याचे व्यक्तित्व, त्याचा काल व त्या कालाचा त्याच्या कवितेवर झालेला परिणाम या सर्व गोष्टी विचारांत घेऊन डोळसपणे त्या कवीच्या काव्याचें मूल्यमापन करतील त्याचप्रमाणें त्यांच्या काव्यातील सौंदर्यस्थळेंहि मोठ्या रसिकतेनें ते उकलून दाखवितील. 'केशवसुत' पांच चिंतनिका हें त्यांचे नवे पुस्तक त्यांच्या संशोधनपर दृष्टीची व त्यांच्या काव्यात्म वृत्तीची निश्चितच साक्ष देणारे आहे.

केशवसुतांच्या काव्याची, त्यांच्या व्यक्तिमत्वाची त्यांच्या युगप्रवर्तकतेची व त्यांच्या कांतिकारकत्वाची चर्चा करणारे पुष्कळच ग्रंथ व निबंध मराठींत लिहिले आहेत. कुणी केशवसुतांच्या सामाजिक विचारांची चर्चा करून त्यांना क्रांतिकारक ठरविले आहे, कुणी त्यांना नवयुगाचे प्रवर्तक ठरविले आहे, कुणी त्यांना रोगट मनोवृत्तीचे ठरविले आहे, तर कुणी त्यांना उत्क्रांतीचे प्रतिनिधि बनविले आहे. केशवसुतांच्या कवितेने जे नवीन युग सुरू केले ते प्रणयप्रधान म्हणजे स्त्रैण होते असे कुणी टीकाकार म्हणतात तर त्यांची कविता स्फूतिप्रधान आहे असें कुणा टीकाकाराचे मत आहे. या सर्व मतामताच्या गलबल्यात केशवसुताच्या काव्याचे यथार्थ मूल्यमापन करण्याचा प्रयत्न ज्या काहीं फार थोड्या टीकाकारांनी केला त्यांत प्रा. भ. श्री. पंडित यांचा अन्तर्भाव केला पाहिजे.

त्यांच्या या पुस्तकाचे दोन भाग पडतात. पहिला भाग चर्चात्मक निबंधांचा आहे व दुसऱ्या भागांत त्यांनी केशवसुतांच्या पांच चिंतनिकावर भाष्य केलें आहे. पहिला भाग निष्कर्षाच्या व चर्चेच्या दृष्टीने अधिक महत्वाचा आहे. त्यांतील पहिला निबंध रॅल्फ वाल्डो इमर्सन याचा परिचय करून देणारा आहे. इमर्सनच्या लेखनाचे स्वरूप स्पष्ट करताना त्याच्या विचारावर पौरस्त्य विचारांची विशेषतः भारतीय दार्शनिकांच्या विचाराची छाप कशी पडली आहे, प्राचीन भारतीय वाङ्मयाचा व आध्यात्मिक विषयाचा त्याचा अभ्यास खोल कसा होता हें त्यांनी सप्रमाण दाखविले आहे. इमर्सनची Brahma ही कविता व त्यांतील कित्येक कल्पना गीतेंत परमेश्वराच्या विराट स्वरूपाचे जें वर्णन आहे तें वाचूनच त्यांना स्फुरल्या असाव्यात असें ते म्हणतात. 'It was the first of books; it was as if an empire spoke to us; nothing small or unworthy but large, serene, consistent, the voice of old intelligence.' असें गीतेची थोरवी वर्णन करतांना इमर्सन म्हणतो.--अशा भारतीय तत्त्वज्ञानाने व प्राचीन भारतीय साहित्याने भारलेल्या तत्त्वज्ञ कवीची छाप केशवसुतांच्या काव्यावर पडली आहे असे त्यांनी दुसऱ्या निबंधांत प्रतिपादन केले आहे. केशवसुतांवर सर्वांत जास्त परिणाम इमर्सनचा झाला आहे, आपले काव्यविषयक बहुतेक विचार त्यांनी इमर्सनपासून उचलले

केशवसुत : पांच चिंतनिका– भ. श्री. पंडित महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती. मू. ६ रुपये.

आहेत, त्यांच्या चिन्तनपर कवितांवरहि इमर्सनच्या विचारांचीच छाप पडली आहे व त्यांनी इमर्सनच्या विचारांचे हे अनुसरण हेतुपुरःसर केले आहे असा प्रा. पंडित यांचा या निबंधांतील निष्कर्ष आहे. तो पटवून देण्यासाठीं त्यांनी इमर्सनच्या वाङ्मयांतील व केशवसुतांच्या काव्यांतील अनेक समानार्थक उतारे दिले आहेत. हे उतारे तपासून पाहिले तर इमर्सनच्या वाङ्मयाचा केशवसुतांना चांगला परिचय होता व कांही ठिकाणी त्यांनी इमर्सनचे विचार उचलले आहेत असे जरी दिसत असले तरी प्रा. पंडित यांनी दाखविलेल्या सर्वच साम्यस्थळांत इमर्सनची उसनवारी आहे असे म्हणणें योग्य होणार नाही. पुष्कळसे विचार केशवसुतांना स्वतंत्रपणेहि सुचले असतील. 'तुतारी'मधील दाखविलेलीं साम्यस्थळें पाहिली तर 'तुतारी' कविता लिहीत असतांना केशवसुतांच्या समोर इमर्सनचें काव्य, त्यांच्या निबंधांतील उतारे हें सर्व होते असें गृहीत धरावयाचें काय ? 'तुतारी'ची बैठक सामाजिक आहे–इमर्सनच्या उताऱ्यांत तत्त्वज्ञानाचे अधिष्ठान अधिक आहे. आता इमर्सनचा खालील उतारा पाहा—

A strong person makes the law and custom null before his will. त्याचे समानार्थक केशवसुतांचें वचन असे :—

> नियमन मनुजासाठीं, मानव–
> नसे नियमनासाटीं जाणा–
> प्रगतिस जर तें हाणी टोणा–
> झुगारुनि तें देउनि, बाणा
> मिरवा निज ओजाचा अभिनव !

या दोन विचारांत थोडे साम्य असले तरी केशवसुतांना भावनेच्या आवेगांत ही कल्पना स्वतंत्ररीत्या स्फुटणें शक्य नाही काय ? 'गतशतकांचीं पापें घोरें—' या 'तुतारी'-तील ओळींच्या समानार्थक जो उतारा दिला आहे त्यांतहि असाच दुरान्वय दिसतो. इमर्सनच्या उताऱ्यांत 'The Violation of the Laws of Nature by our Predecessors and our Contemporaries are punished in us also.' अशी कल्पना आहे तर तुतारींतील ओळींतील भावनांची बैठक सामाजिक आहे. दुरान्वयाची आणखीहि अशीं उदाहरणें देता येतील. 'पुष्पाप्रत' ही कविता ज्या इमर्सनच्या उताऱ्यावरून स्फुरली असें प्रा. पंडित म्हणतात त्या उताऱ्याची व 'पुष्पाप्रत' या कवितेंतील कल्पनेची तुलना केली तर त्यांतहि हेंच दिसून येईल. 'पुष्पाप्रत' कवितेंत व्यक्त झालेली निराशा—त्यांत प्रगट होणारें कवीचें व्यक्तिमत्त्व याची सांगड इमर्सनच्या तात्त्विक विचारांशी घालणें कठिण वाटते. मात्र चिंतनिकांची स्फूर्ति केशवसुतांनी इमर्सनकडून घेतली होती हें प्रा. पंडित यांचे विधान पुष्कळच पटण्यासारखें आहे. इमर्सनच्या लेखनाची व काव्याची बैठकच तात्त्विक, गूढ व चिंतनशील स्वरूपाची आहे. त्यामुळे इमर्सनच्या निबंधाच्या वाचनाने केशवसुतांना चिंतनिका लिहिण्याची प्रेरणा मिळाली असावी हा त्यांचा निष्कर्ष सयुक्तिक वाटतो. केशवसुतांच्या 'झपूर्झा' 'सतारीचे बोल' 'कोणीकडून कोणीकडे ?' 'म्हातारी' व 'हरपले श्रेय' या पांच महत्त्वाच्या चिंतनिकांवर प्रा. पंडित यांनी जे अतिशय मार्मिक व अतिशय विद्वत्तापूर्ण असे भाष्य केले आहे त्यांत चिंतनिकेंतील विचार व इमर्सनच्या निबंधांतील विचार यांतील विविध साम्यस्थळें दाखवून आपला हा विचार पटवून देण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे. त्यांच्या मतें केशवसुतांच्या चिंतनिकेतील विचार मुळांत भारतीय आहेत. परंतु ते इमर्सनच्या माध्यमांतून अवतीर्ण झाल्यामुळे काहीसे अधुरे, अंधुक व अस्पष्ट राहिले, ते उकलून दाखविण्याचा प्रा. पंडित यांचा प्रयत्न पुष्कळच

यशस्वी झाला आहे असें म्हणावें लागेल. या चिंतनिकांवर भाष्य करीत असतांना त्यांनी केवळ इमर्सनच्या समानार्थक विचारांचाच आधार घेतला असे नाही, तर त्या चिंतनिकेचे स्वरूप, ती लिहिली गेली त्या वेळची केशवसुतांची मनोवृत्ति, निरनिराळया टीकाकारांनी त्यांतून काढलेले निरनिराळे अर्थ, यामध्ये येणारे निरनिराळे संदर्भ व त्यांतून प्रतीत होणारा चिन्तनिकेचा गूढ अर्थ या सर्व गोष्टींचा विचार या भाष्याच्या संदर्भात केला असल्याने चिन्तनिकावरील ही भाष्ये अतिशय मौलिक झाली आहेत. चिन्तनिकावर भाष्य करण्यापूर्वी 'चिन्तनिका' या काव्यप्रकाराचा त्यांनी केलेला विचार व त्यानंतर ही भाष्ये हा या पुस्तकाचा अतिशय मौलिक भाग आहे असे मला वाटते. काही परंपरागत कल्पनाहि त्यांनी खोडून काढल्या आहेत. उदाहरणार्थ 'सतारीचे बोल' ही कविता जॉन ड्रायडनच्या Alexander's Feast or The power of Music या कवितेवरून स्फुरली असल्याचे श्री. राजवाडे यांचे मत त्यांनी खोडून काढले आहे व या चिंतनिकेत येणारे विषय इमर्सनच्या 'Nature, 'The Method of Nature Self Reliance 'The over Soul' 'Immortality' इत्यादि निबंधावरून स्फुरले आहेत असे ते सांगतात. 'हरपले श्रेय' या चिंतनिकेतील गूढार्थहि ते अतिशय मार्मिकपणे उकलून दाखवितात व आतापर्यंत निरनिराळया टीकाकारांनी त्या चिन्तनिकेचे निरनिराळे अर्थ लावताना केशवसुतांच्या भावनिक भूमिकेचा, इंग्रजी विचारसरणीचा, वेगळया परिभाषेचा व तोकड्या वाणीचा नीटपणे विचार कसा केला नाहीं हेंहि ते स्पष्ट करतात.

इमर्सनच्या लेखनाचा व काव्याचा केशवसुतांच्या काव्यावर झालेला परिणाम हा प्रामुख्याने त्यांच्या चिंतनशील काव्यापुरताच मर्यादित आहे हें यावरून लक्षांत येईल. केशवसुतांच्या सामाजिक कवितांतून किंवा निसर्ग काव्यांतून किंवा काव्य विषयक कवितांतून काहीं किरकोळ साम्यस्थळें दिसली तरी त्या कवितांची बैठक इमर्सनच्या तात्त्विक भूमिकेपेक्षा अतिशय निराळी आहे त्यामुळें किंवा इतर आत्मनिष्ठ कविताच्या बाबतींत इमर्सनचा त्यांच्या काव्यावर काहीं परिणाम आहे असे वाटत नाही. इमर्सनचे लेखन त्यांना आवडत होते-त्याचा अभ्यासहि त्यांनी चांगला केला होता व चिन्तनशील मनोवृत्तीतून स्फुरलेल्या त्यांच्या कवितांवर इमर्सनच्या विचारांची व कल्पनांची छाप बरीच आहे एवढया मर्यादित अर्थाने आपण प्रा. पंडिताचे 'केशवसुतावर सर्वांत जास्त परिणाम इमर्सनचा झाला आहे' हे विधान स्वीकारले पाहिजे.

'केशवसुतांच्या कवितेतील विराग' हा या संग्रहातील आणखी एक वैशिष्ट्यपूर्ण निबंध. केशवसुतांच्या उपलब्ध जीवनविषयक माहितीवरून त्यांच्या काव्यांतून ठिकठिकाणी आविष्कृत होत असलेल्या औदासीन्याचा व नैराश्याचा अर्थ लावण्याचा त्यांनी या लेखांत प्रयत्न केला आहे. कालक्रमाच्या दृष्टीने केशवसुतांच्या काव्याचा विचार केला तर केशवसुतांच्या वृत्तीत व वाणीत आरंभी आरंभी जो उत्साह, जो अभिनिवेश, जो आत्मविश्वास आणि जो आशावाद संचार करीत असतांना दिसतो तो पुढे मंद मंद होत गेला आहे. सुरवातीला 'देव दानवा नरे निर्मिले' असे बंडखोरपणे म्हणणारे व

रूढीविरुद्ध बंड उभारणारे केशवसुत पुढे पुढे अगतिक झालेले दिसतात. ' धिक्कार या या जगि, इच्छित न मिळे काही ' असे उद्गार ते काढतात, ' आमुचा प्याला दुःखाचा । डोळे मिटूनी प्यायाचा ' असे ते म्हणतात व ' हरपले श्रेय ' धुंडत असताना A crack in the heart ! But alas ! Where is the restorative असा उद्गारहि आपल्या मित्राच्या पत्रात काढताना आढळतात. त्यांच्या काव्यात येणारे हे नैराश्य व औदासीन्य केवळ इंग्रजी काव्यातून त्यांनी उसने घेतले नव्हते—त्याची पाळेमुळे त्यांच्या वृत्तीत—त्यांच्या जीवनांत होती. जात्याच अशक्त व किरकिरे, लहानपणापासून आनंदाचा व आल्हादाचा काळ फारसा वाट्याला न आलेला, तरुणपणी हंगामी नोकऱ्यामुळे आर्थिकदृष्ट्या झालेली परवड, आणि जीवनांत कांही करूं शकलो नाही ही असफलतेची जाणीव यामुळे त्यांच्या काव्यावर उत्तरार्धात नैराश्याची दाट छटा कशी पसरली आहे हे प्रा. पंडित यांनी साधार दाखविले आहे. त्यांचे हें विवेचन मूलग्रामी व केशवसुतांच्या काव्यांतील एका महत्त्वाच्या प्रवृत्तीवर प्रकाश टाकणारे आहे असे निश्चित वाटते.

' केशवसुत-पांच चिंतनिका ' या पुस्तकाचे स्वरूप हे असे आहे. प्रा. पंडित यांचा व्यासंग, विवेचकदृष्टि व रसिकता यांची साक्ष पटविणारे आहे. त्यांच्या प्रत्येक विधानाशी वाचक सहमत झाला नाही तरी त्यांनी केलेल्या साधार विवेचनावरून त्यांचे महत्त्वाचे निष्कर्ष आपणाला मान्यच करावे लागतील. केशवसुतांच्या काव्यावर या पुस्तकाने एक नवीन प्रकाशझोत टाकलेला आहे, याबद्दल प्रा. पंडितांचे कुणीहि अभिनंदन करील.

—०—

---

( पृष्ठ ८१ वरून सुरू )

त्यांची साहित्यावरील अढळ भक्ति कोणत्याहि एका शाखेपुरती अथवा मराठी वाङ्मयापुरती मर्यादित नाही. ललित वाङ्मयांत ज्या प्रमाणे त्यांचे अंतःकरण रमते त्याचप्रमाणे शास्त्री वाङ्मयातहि त्यांची बुद्धि अप्रतिहत संचार करते. त्यांना कोणत्याहि विषयाचे वावडे नाहीं. प्रस्तुत संग्रहातील ' आधुनिक बंगाली कविता ' हें त्यांचे भाषण आधुनिक बंगाली कवितेतील निरनिराळे टप्पे व बदलत्या प्रवृत्ती जाणून घेण्याच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाचे आहे. तें वाचून मराठी काव्य रसिकांना आधुनिक मराठी कवितेची आधुनिक बंगाली कवितेशी तुलना करून पाहता येईल व भारतीय दृष्टीने तिचे मूल्यमापन करता येईल. प्रा. बनहट्टी ह्यांच्या ज्ञानाचा व प्रज्ञेचा महाराष्ट्रीय रसिकांना असाच उत्तरोत्तर अधिकाधिक लाभ होत राहो.

—•—

# साभार स्वीकार

## कथा

१ **नांगरे बलराम**–अंतर, गं. रा. पाठक, ३ जुना सदाशिव, पुणे २; ३ रु.

२ **बाबर सरोजिनी**–राही रुक्मिणी, सरोजिनी बाबर, १४८६ सदाशिव पुणे २; ३ रु.

३ **माडगूळकर व्यंकटेश**–काळी आई, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ३ रु.

४ **वडेर प्रल्हाद**–चढण, साधना प्रकाशन, शनिवार, पुणे २; ३-५० रु.

५ **वैद्य शंकर वि.**–आला क्षण गेला क्षण, महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती; ४ रु.

## कादंबरी

६ **पारगावकर वि.शं.**–निगुडा, शुभदा प्रकाशन, एरंडवणे, पुणे ४; २-५० रु.

७ **मर्ढेकर बा. सी.**–मर्ढेकरांच्या कादंबऱ्या, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ६ रु.

८ **मोरोबा कान्होबा**–घाशीराम कोतवाल (द्वितीयावृत्ति), मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई २; ४ रु.

## काव्य

९ **जोशी गोविंद**–गंधरात्र, म. अ. कुलकर्णी, जुनी सांगली; ३-५० रु.

१० **पाठक गं. रा.**–शक्तिकेतु, गं. रा. पाठक, ३ जुना सदाशिव, पुणे २; १ रु.

११ **बाबर सरोजिनी**–लोकसंगीत, प्रसिद्धी विभाग, महाराष्ट्र शासन, मुंबई.

१२ **हरिभक्त गुंडोपंत**–अभंगगीतें (अनुवाद), गो. म. नवाथे, मुंबई ७; १रु.

१३ **चंद्र लपे पापणीत**–(सहा कवींचा प्रातिनिधिक संग्रह) प्रमोद प्रकाशन, नांदेड, १-५० रु.

१४ **साधना**–(प्रातिनिधिक संग्रह), साहित्य साधना मंडळ, भुसावळ; १ रु.

## नाटके

१५ **केळुसकर दत्तात्रय**–चित्त शुद्ध तरी अर्थात् संत तुकाराम, साहित्य सहकार संघ लि., मुंबई १४; २ रु.

१६ **तेंडुलकर विजय**–माणूस नांवाचे बेट, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; २-५० रु.

१७ **प्रताप**–ब्रह्मगाठ, गो. ल. जमदाडे, दुधोंडी (सांगली); २ रु.

## चरित्रात्मक

१८ **गोखले वा. दा.**–स्वराज्यातील गृहांगना, श्री लेखन वाचन भांडार, पुणे २; १ रु.

१९ **दामले प्र. रा.**–पांच थोर नेते, आयडियल सार्व्हिस, पुणे २; २-५० रु.

२० **दीक्षित म. श्री.**–तेजस्वी तारका, सह्याद्री प्रकाशन, पुणे २; १-५०. रु.

२१ **दीक्षित म. श्री.** – पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर, इनामदार बंधु प्रकाशन पुणे २; २ रु.

२२ **पुरोहित वा. श्री.**–मराठी नाटके. माझा छंद, लोकहितवादी मंडळ, नाशिक, १० रु.

२३ **भाववंदना** (कै. चिंतामणराव कोल्हटकर-स्मृतिलेख), मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई २; १-५० रु.

## ललित

२४ **गाडगीळ बाळ**–गबाळग्रंथ, शुभदा प्रकाशन, पुणें ४; ३ रु.

२५ **भोळे केशवराव**–अस्ताई, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ५ रु.

## इतिहास व संशोधन

२६ **कोलते वि. भि.** मूर्तिप्रकाश (मुनि केशिराज विरचित), विदर्भ संशोधन मंडळ नागपूर; १० रु.

अनुक्रमणिका

२७ **गुजर मा. वि.**–करवीर छत्रपति घराण्याच्या इतिहासाची साधने–भाग १ ते ४ (१७०० ते १८४४), मा. वि. गुजर, १३२१ कसबा, पुणे २; ७+१३ रु.

२८ **पगडी सेतु माधवराव**–मराठे व निजाम उर्दु फारसी साधने, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई २; ७–५० रु.

२९ **फाटक न. र. व पगडी सेतु माधवराव**–पानिपतचा संग्राम (संपादन भाग पहिला), मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई २; ५ रु.

### इतर

३० **केळकर कृ. वा.**–रोजचे आरोग्य, स्कूल अँड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर; ४ रु.

३१ **गावकर सु.आ.**–मराठी दोलामुद्रिते (२ री आवृत्ति), मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मुंबई २, ५ रु.

३२ **फुले ज्योतिबा**–ब्राह्मणांचे कसब (२ री आवृत्ति), दे. ना. टिळक, नाशिक; ००–५० रु.

३३ **माडगावकर गो. ना.**–मुंबईचे वर्णन (द्वितीयावृत्ति); मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मुंबई २; ८ रु.

३४ **रानडे वा.दा.व गर्गे स.मा**-भारताचे लोकमत, संगम प्रकाशन, पुणे ४; २ रु.

३५ **श्रीधर श्रीगुरुविद्वांस बाबा**–मिश्र भक्ति खंडन अर्थात् अनन्य भक्ति महानुभाव आश्रम, लासलगाव; १–२५ रु.

३६ **श्रीसद्गुरुमार्तंड माणिकप्रभु महाराज** – श्री ज्ञानमार्तंड (पूर्वार्ध व उत्तरार्ध), श्री प्रभुदास, सं. माणिकनगर पो० हुमनाबाद (म्हैसूर), ५ रु.

३७ **पारिभाषिक शब्दसंग्रह**–(अंग्रेजी-हिंदी भाग १ ए ते के)–पब्लिकेशन ब्रँच भारत सरकार, दिल्ली ८.

### बालवाङ्मय

३८ **खांडेकर सूर्यकांत**–छुम् छुम् (बालगीते), ओरिएंटल लाँगमन्स लि., मुंबई १; १-२५ रु.

३९ **दांडेकर गो. नी**–आईची देणगी (कथा), गोकुळ मासिक प्रकाशन, पुणे २; (एकूण भाग ८) प्रत्येकी १-५० रु.

४० **दांडेकर गो.नी.**–गोपाळांचा मेळा, गोकुळ मासिक प्रकाशन, पुणे २; २ रु.

४१ **सामंत रघुवीर**– ज्ञानपारिजात (परडी पहिली) मी अनंत विश्वाचा रहिवासी, सौ. स्नेहल सामंत, मुंबई १४; १५-९० रु.

✦ ✦ ✦

# मराठी साहित्य संमेलन

## अधिवेशन ४४ वे, सातारा.

## ठराव

### १. दुखवटा

मराठीतील सुप्रसिद्ध कथालेखिका, टीकाकार आणि १९६१ साली ग्वाल्हेर येथे भरलेल्या ४३ व्या मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्ष प्रा. सौ. कुसुमावती देशपांडे यांच्या १७–नोव्हेंबर १९६१ रोजी झालेल्या आकस्मिक निधनामुळे या संमेलनाला अत्यंत दुःख होत आहे. त्यांच्या निधनामुळे महाराष्ट्र एका थोर लेखिकेला व आदर्श स्त्रीला मुकला आहे. त्यांच्या कुटुंबियांच्या व विशेषतः त्यांचे पती कवि अनिल यांच्या दुःखांत हे संमेलन सहभागी आहे.

ग्वाल्हेर संमेलनानंतर निधन पावलेल्या पुढील व्यक्तींबद्दल हे संमेलन दुःख व्यक्त करीत आहे.

अनुक्रमणिका

" श्री. ह. स. गोखले, सर मोरोपंत जोशी, श्री. दा. वि. गोखले, प्रा. ना. के. भागवत, प्रिं. ज. र. घारपुरे, श्री. वि. कृ. जोशी, श्री. वा. रा. नातू, श्री. बि. सी. गुर्जर, आचार्य मो. वा. दोंदे, शिवाफट्ट आंगले, प्रा. बा. मा. दबडघाव, डॉ. सुरेंद्रनाथ सेन, डॉ. पी. सुब्बरायन, श्री. दि. न. डिकसळकर, श्री. शं. मा. पळेकर."

## २. चिनी आक्रमणाचा निषेध

भारताशी झालेला शांततामय सहजीवनावर आधारलेला पंचशील-करार विश्वासघातकी पद्धतीने मोडून लोकशाही जीवन पद्धती स्वीकारलेल्या भारताच्या सीमेवर लष्करी आक्रमण करणाऱ्या चीनच्या कृतीचा हे संमेलन तीव्र निषेध करते. हे आक्रमण परतवून लावण्यासाठी भारत सरकारने चालविलेल्या युद्धकार्याला आमचा संपूर्ण पाठिंबा आहे. तसेच सीमेवर लढणाऱ्या सैनिकांना कृतज्ञतापूर्वक अभिवादन करून तेथे प्राण अर्पण करणाऱ्या वीरांना आम्ही श्रद्धांजलि अर्पण करतो.

## ३. सीमा प्रश्न

सलग मराठी प्रदेशाचे महाराष्ट्र राज्य निर्माण होऊन अडीच वर्षे झाली, तरी महाराष्ट्राच्या दक्षिण, पूर्व आणि उत्तर सीमांचा प्रश्न अद्यापहि सुटलेला नाही, याबद्दल या संमेलनाला खेद वाटत आहे. महाराष्ट्र म्हैसूर यांच्यातील सीमावाद वाटाघाटीने आपापसांत सोडविण्याचे सर्व प्रयत्न म्हैसूर सरकारच्या लोकशाहीविरोधी, अन्याय्य आणि दुराग्रही वृत्तीमुळे निष्फळ ठरले आहेत आणि त्यामुळे त्या भागात तीव्र असंतोष धुमसत राहून राष्ट्रीय एकात्मतेस बाध येत आहे. म्हैसूर सरकारच्या दुराग्रहामुळे चौसदस्य समितीचे एकमत होऊ शकले नाही आणि त्यांच्याच काळकाढू कार्यवाहीमुळे हा प्रश्न लांबणीवर पडला आहे.

या सीमा भागांतील जनतेने आपली मागणी सरकारला पटवून देण्यासाठी शांततेचे आणि लोकशाहीचे सर्व मार्ग चोखाळले आहेत. गेल्या सात वर्षात ग्रामपंचायतीपासून विधानसभेपर्यंतच्या सर्व निवडणुका याच प्रश्नावर लढवून त्या जिंकून लोकमताचा निःसंदिग्ध कौल मिळविला आहे. प्रयत्नांची इतकी पराकाष्ठा करून सुद्धा जर तिला न्याय मिळाला नाही तर लोकशाहीवरील जनतेचा विश्वास उडेल आणि भारतीय लोकशाहीला तडा पडल्याखेरीज राहणार नाही.

महाराष्ट्र सरकारने सीमा प्रश्नासंबंधी नेमलेल्या समितीचे सदस्य श्री. ह. वि. पाटसकर व श्री. म. दा. भट यांनी परिश्रमपूर्वक व तत्परतेने जे प्रतिवृत्त महाराष्ट्र व केंद्र सरकारला सादर केले त्याबद्दल हे संमेलन श्री. पाटसकर—भट यांचे अभिनंदन करीत आहे. आतां केंद्र सरकारने श्री. पाटसकर—भट प्रतिवृत्ताच्या आधारे हा दक्षिण सीमा प्रश्न त्वरित सोडवावा अशी या संमेलनाची आग्रहाची मागणी आहे. सीमा भागातील मराठी जनतेवरील अन्याय व त्यामुळे निर्माण झालेला असंतोष धुमसत ठेवणे देशातील सद्यःस्थितीत हितावह नाही हे सरकारच्या निदर्शनास आणून देणे या संमेलनास आपले कर्तव्य वाटते.

श्री. पाटसकर—भट प्रतिवृत्तानुसार महाराष्ट्राच्या उत्तर व पूर्व सिमांचा प्रश्नहि केंद्र सरकारने त्वरित सोडवावा अशी या संमेनाची मागणी आहे.

## ४. गोमंतकाचें विलीनीकरण

१ गोमंतकांत किंवा कोकणच्या अन्य भागात बोलण्यात येणारी कोकणी ही महाराष्ट्रातल्या अनेक बोलीपैकी एक असून मराठी हीच तेथील लोकांची मातृभाषा आहे, असे या संमेलनाचे ठाम मत असल्यामुळे संयुक्त महाराष्ट्रांत गोमंतकाचा समावेश झालाच पाहिजे, अशा आशयाचे ठराव गेल्या वर्षातील अधिवेशनांतून संमेलनाने सातत्याने मंजूर केले आहेत.

२. गोमंतक महाराष्ट्रात विलीन करण्याच्या बाबतीत गेल्या वर्षीच्या अधिवेशना-

पयत असलेली राजकीय अडचण पोर्तुगीज राजवटीच्या हकालपट्टीमुळे सुदैवाने आता दूर झाली असल्यामुळे हा प्रदेश शक्यतो लौकर महाराष्ट्र राज्यात सामील करण्यास हरकत नव्हती.

३. विलीनीकरणाच्या बाबतीत गैरबाजवी विलंब झाल्यास गेल्या साडेचारशे वर्षात पोर्तुगिजांनी केलेल्या अपप्रचारास बळी पडून आपली अन्य भारतीयापेक्षा व अर्थातच महाराष्ट्रीयापेक्षा निराळी अशी संस्कृति व अस्मिता आहे अशी जी काही गोमंतकीयांची कल्पना झालेली आहे ती नष्ट होण्याऐवजी दृढ होण्याची शक्यता आहे असा इषारा हें अधिवेशन देत आहे.

४. त्याचप्रमाणे क्षेत्रफळ, लोकसंख्या व आर्थिक दृष्ट्या स्वयंपूर्ण व स्वावलंबी नसलेल्या गोमंतकाला निराळ्या राज्याचा दर्जा दिला तर जनतेच्या कल्याणाच्या योजना बाजूला राहून केवळ सत्ताबाज राजकारणालाच ऊत येईल व शिवाय गोमंतकीयांच्या बाबतीत तरी राष्ट्रीय एकात्मतेच्या भावनेची निर्मिति अशक्य होईल. कारण निराळ्या राज्याच्या दर्जामुळे काही गोमंतकीयात तरी आपण भारतीयापेक्षा निराळे आहोत ही पोर्तुगीजनिर्मित कल्पना कायम राहील.

५. संयुक्त महाराष्ट्रांत विलीन झालेल्या इतर घटकांची ऐतिहासिक, आर्थिक व सांस्कृतिक कारणामुळे असलेली वैशिष्ट्यें महाराष्ट्र राज्यात योग्य तऱ्हेने जोपासली जातात व सर्वसामान्य व्यवहारात व नागरिक जीवनात हिंदु, खिस्ती, मुस्लिम, यहुदी, बौद्ध, झरतुष्ट्र इत्यादि धर्मपंथांच्या अनुयायांना समदर्शी व पक्षपातरहित वागणूक मिळत असते, यामुळे विलीनीकरणाने आपल्या वैशिष्ट्यांना बाध येईल ही काही गोमंतकीयात वसत असलेली भीति निराधार आहे हें सिद्ध होते. शिवाय अलीकडेच जिल्हा परिषदेसंबंधीचा क्रांतिकारक कायदा महाराष्ट्र राज्यांत जारी करून सत्तेचे विकेंद्रीकरण घडवून आणण्यात आले आहे. त्यामुळे तर काहींच्या मते गोमंतकाची अशी काही वैशिष्ट्ये असल्यास ती जोपामण्याची व विकसित करण्याची हमीच जणू मिळाली आहे यात शंकाच नाही.

६. वरील सर्व गोष्टी लक्षांत घेऊन, या संमेलनाने आतांपर्यंत गोमंतकासंबंधी मंजूर केलेल्या ठरावास अनुसरून भारत सरकारने गोमंतक लौकर महाराष्ट्र राज्यांत विलीन करावा अशी या अधिवेशनाची मागणी आहे.

### ५. गोमंतकाची मातृभाषा मराठी

गोमंतकाच्या मातृभाषेविषयी अजूनहि कुठे कुठे अज्ञान, गैरसमज व काही ठिकाणी जाणून बुजून बुद्धिभेद करण्यात येतो असे दृष्टीस पडते. हे लक्षात घेऊन हें संमेलन असे जाहीर करीत आहे की, गोमंतकाची मातृभाषा मराठी ही असून कोकणी या नावाने ज्ञात असलेल्या गोमंतकीय लोकभाषा या तिच्या बोली आहेत.

### ६. पाठ्य-पुस्तके

दि. ३१-१०-६२, दि. १-११-६२ व दि. २-११-६२ रोजी सातारा येथे साहित्य संमेलनाच्या स्वागत मंडळातर्फे आयोजित करण्यात आलेले ' प्राथमिक व माध्यमिक शिक्षणातील मराठी भाषेची पाठ्य पुस्तके ' या विषयावर एक चर्चासत्र श्री. विठ्ठलराव घाटे यांच्या नेतृत्वाखाली झाले.

या चर्चासत्राचे एकमुखी निष्कर्ष हे संमेलन मराठी साहित्य महामंडळाकडे व राज्यशासनाकडे पाठवीत आहे. म. सा. महामंडळ व राज्यशासन यांनी हे निष्कर्ष विचारात घ्यावेत, आणि प्राथमिक व माध्यमिक पातळीवरील मराठी भाषेचा व वाङ्मयाचा अभ्यास सुसूत्र व सुसंगत करण्यासाठी कायम स्वरूपाची एखादी यंत्रणा राज्यशासन व महामंडळ यांनी सहकार्याने तयार करावी अशी या संमेलनाची शिफारस आहे.

### ७. गोव्यांतील माध्यमिक शाळा महाराष्ट्र एस्. एस्. सी. बोर्डास जोडणे

गोव्यामध्ये असणाऱ्या शाळांतील विद्यार्थ्यांना अद्यापपावेतो महाराष्ट्र एस. एस्. सी. बोर्डाच्या परीक्षेला बसण्याची परवानगी मिळत

आली होती. परंतु लवकरच ती परवानगी काढण्यांत येऊन गोव्यांतील शाळा दिल्ली येथील बोर्डाला संलग्न करण्यांत येणार आहेत त्यामुळे गोव्यांतील अनेक मराठी भाषिक विद्यार्थ्यांना अपरिचित अशा अभ्यासक्रमावर परिश्रम घ्यावे लागणार आहेत. भाषिक व भौगोलिक दृष्ट्या गोवा महाराष्ट्रास संलग्न असल्यामुळे गोव्याच्या शाळेतील विद्यार्थ्यांना महाराष्ट्रातील एस्. एस्. सी. बोर्डाच्या परीक्षेला बसण्याची परवानगी देण्यांत यावी अशी शिफारस हे संमेलन करीत आहे.

### ८. कै. बा. सी. मर्ढेकर स्मारक

मर्ढे येथील ग्रामस्थांनी कै. बा. सी. मर्ढेकर यांच्या तेथील राहत्या जागेवर त्यांची स्मृति राहावी म्हणून एक प्रशस्त सभागृह व ग्रंथालय निर्माण करण्याचे ठरविले आहे. या नियोजित स्मारकास महाराष्ट्रातील सर्व रसिकांनी सहाय्य करावे अशी या संमेलनाची विनंती आहे.

### ९. हिंदी व इंग्रजी

हिंदीबरोबर इंग्रजीही केंद्रशासनाची सरकारी भाषा अनिश्चित कालपर्यंत ठेवण्याबद्दल भारत सरकार एक विधेयक मांडणार आहे असे कळते. त्या बाबतीत कालनिश्चिती असावी. दरम्यान अधिकाधिक हिंदीचा वापर शासन कार्यात करण्यासाठी जास्तीत जास्त प्रयत्न भारत सरकारने करावेत असे या संमेलनाचे मत आहे.

### १०. महाराष्ट्र सरकारचा बुक ट्रस्ट

महाराष्ट्र सरकारने एक नॅशनल बुक ट्रस्ट स्थापन करण्याचे ठरवून इतर भाषांतील उत्कृष्ट ग्रंथांचा अनुवाद करण्याचे ठरविल्यांबद्दल हे संमेलन महाराष्ट्र सरकारचे अभिनंदन करीत आहे. मराठीत असा कोणत्या इतर भाषातील पुस्तकांचा अनुवाद व्हावा म्हणून मराठी साहित्य महामंडळाच्या घटकसंस्थांनी म. सा. महामंडळाकडे सूचना पाठवाव्या व महामंडळाने त्या सूचना आपल्या अभिप्रायासह महाराष्ट्र सरकारच्या नॅशनल बुक ट्रस्टकडे सोपवाव्यात.

### ११. थोर पुरुषांच्या साहित्याची प्रसिद्धी

साहित्य अकादमीच्या मराठी विभागाने कै. राजवाडे कै. आगरकर या थोर पुरुषाच्या समर्थ विचारांचे वेचक संकलन ग्रंथरूपाने तरुण पिढीपुढे ठेवले आहे. त्याप्रमाणे म. ज्योतिराव फुले, न्या. रानडे, महर्षि शिंदे, कर्मवीर भाऊराव पाटील, महर्षि कर्वे यांचेहि असे ग्रंथ प्रसिद्ध करावेत अशी ४४ व्या म. सा. संमेलनाची उत्कट शिफारस आहे.

त्याचप्रमाणे तरुण पिढीला वैचारिक धन उपलब्ध करून देण्यासाठी महाराष्ट्र सरकारने महाराष्ट्रांत थोर पुरुषांचे म. फुले महर्षि कर्वे, महर्षि शिंदे वगैरेचे मूळ साहित्य शोधून काढून मराठीसह मराठीच्या खालोखाल महाराष्ट्र राज्यांत प्रमुखत्वाने बोलल्या जाणाऱ्या किमान दोन भाषांत, ग्रंथरूपाने प्रसिद्ध करावे अशी ४४ वें म. सा. संमेलन शिफारस करते.

### १२. दुर्मिळ साहित्याचे संरक्षण

दुर्मिळ हस्तलिखिते आणि सन १८०० ते १९०० पर्यंत प्रसिद्ध झालेले ग्रंथ व नियतकालिके यांचा संग्रह टिकठिकाणी विखुरलेला आहे व आधुनिक पद्धतीने त्यांचे संरक्षण होत नाही. यासाठी मराठी साहित्याच्या संशोधनाला आवश्यक अशा हस्तलिखितांचे व मुद्रितांचे ज्या ठिकाणी संरक्षण होऊं शकेल असे एक मध्यवर्ती संदर्भसाहित्य- संग्रहालय शक्य तेवढ्या लवकर निर्माण करण्यांत यावे आणि त्यांत समाविष्ट करण्याजोगी हस्तलिखिते किंवा त्यांच्या मायक्रोफिल्म्स् आणि मुद्रित साहित्य आतापासून हस्तगत करीत रहावे अशी या सभेची सरकारला आग्रहाची विनंती आहे.

### १३. शुद्धलेखन

मराठी साहित्याची प्रातिनिधिक संस्था असलेल्या मराठी साहित्य महामंडळाने तयार केलेल्या मराठी शुद्धलेखन नियमावलीस महाराष्ट्र राज्य सरकारने मान्यता दिल्याबद्दल हे

संमेलन महाराष्ट्र राज्य सरकारचे अभिनंदन करीत आहे.

या शुद्धलेखन नियमावलीस काही दुरुस्त्या सुचविणारे व इतर यासंबंधीचे ठराव या संमेलनापुढे आले आहेत ते या महामंडळाच्या घटक संस्थाकडे पाठविण्यात यावेत. सदरील घटक संस्थानी या दुरुस्त्यांवर दिलेले अभिप्राय संमेलनाच्या अध्यक्षाकडे धाडावेत व त्यांनी ते महामंडळाकडे विचारार्थ पाठवावेत आणि महामंडळाने त्याबाबत आपला निर्णय द्यावा.

## १४. गोमंतक-मुक्ति अभिनंदन

गेल्या साडेचारशे वर्षाच्या पोर्तुगिजांच्या जुलमी राजवटीतून भारत सरकारने गोमंतकादि पोर्तुगीज वसाहती मुक्त केल्याबद्दल या संमेलनास अतिशय आनंद वाटत आहे. या मुक्तीसाठी भारत सरकारने जे निर्धाराचे पाऊल टाकले त्याबद्दल हें संमेलन भारत सरकारचे अभिनंदन करीत आहे. संमेलनाने या बाबतीत वारंवार केलेल्या मागणीची पूर्तता झाल्याबद्दल या संमेलनास समाधान वाटत आहे. गोमंतकादि पोर्तुगीज वसाहतींच्या मुक्तीसाठी ज्या भागातील व भारतातील जनतेने दिलेल्या लढ्यात ज्या हुतात्म्यांनी बलिदान केले त्यांना हें संमेलन अभिनंदन करीत आहे.

## १५. माध्यमिक शाळांतील संस्कृत भाषेचे अध्ययन

माध्यमिक शाळांतील संस्कृतचा दिवसेंदिवस ऱ्हास होत असून त्याचा अनिष्ट परिणाम मराठीसारख्या प्रादेशिक मातृभाषा व हिन्दीवर होत असल्याचे आढळून येते. तरी शाळांतून संस्कृतच्या अध्यापनाचा कालावधि वाढवून भाषिक समृद्धि सुकर करावी अशी शासनाला प्रार्थना आहे.

## १६. महाराष्ट्राच्या उत्तर सीमेवरील प्रदेशाचे महाराष्ट्रांत विनीलीकरण

द्वैभाषिक मुंबई राज्याचे विभाजन करतांना कोणत्याहि सर्वमान्य तत्त्वाचा अंगीकार न करतां भाषा, संस्कृति, इतिहासपरंपरा, सलगता इत्यादि सर्वदृष्टींनी महाराष्ट्राची असलेली महाराष्ट्राच्या उत्तर सीमेवरील ५१ गावे व धरमपूर, वारांदा परगणा गुजराथ राज्यांत ढकलल्यामुळे तेथील जनतेवर घोर अन्याय झाला आहे. पोर्तुगिजांच्या टाचेखालून मुक्त झालेला नगर हवेलीचा भागहि वरील सर्व दृष्टींनी महाराष्ट्राचाच आहे. हे सर्व भाग तावडतोब महाराष्ट्र राज्यांत सामील करण्यांत यावेत अशी या संमेलनाची केंद्र सरकारकडे मागणी आहे.

## १७ कै. ह. ना. आपटे जन्मशताब्दि

मराठीतील सुप्रसिद्ध कादंबरीकार कै. हरि नारायण आपटे यांची जन्मशताब्दि ८ मार्च १९६४ रोजी येत आहे. तरी त्या वेळी साहित्यसंस्थांनी योग्य प्रकारे ती साजरी करावी अशी या संमेलनाची आग्रहाची विनंती आहे.

## १८. साहित्य संस्थांचे सभासदत्व व संमेलन

संमेलनास उपस्थित राहणारा प्रतिनिधि हा मराठी साहित्य महामंडळाच्या घटक संस्थेचा सभासद असला पाहिजे तरच त्याला संमेलनास अधिकृत प्रतिनिधी म्हणून उपस्थित राहता येईल असे या संमेलनाचे मत आहे.

## १९. अश्लीलता

१. वाङ्मय, कला, मानसशास्त्र किंवा समाजशास्त्र यांच्या दृष्टीने ज्याला काही मोल नाही, आणि केवळ वाचकांच्या कामवृत्तींना चाळवणे हाच ज्याचा उद्देश असतो अशा अश्लील लिखाणाचा व चित्रादिकांचा प्रसार करणारी काही मराठी नियतकालिके व पुस्तके आज प्रसिद्ध होत आहेत. अशा लिखाणाच्या वाचनाने वाचकांची वाङ्मयीन अभिरुचि व मानसिक स्वास्थ्य यांवर

दुष्परिणाम होतो म्हणून या लिखाणाच्या प्रसाराला आळा घातला जावा असे या संमेलनाचे मत आहे.

२. अश्लील लिखाण प्रकाशित करणाऱ्या व्यक्तींच्या विरुद्ध कायदेशीर उपाययोजना करण्याची यंत्रणा अधिक कार्यक्षम करण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र सरकारने पाऊल उचलावे अशी या संमेलनाची शिफारस आहे.

अश्लीलतेच्या दृष्टीने दंड्य असणाऱ्या लिखाणाचा सांगोपांग विचार करून त्याच्याबाबत संमेलनाचे अध्यक्षाकडे विस्तृत निवेदन सादर करण्यासाठी (१) श्री. दि. व. गोडबोले (२) श्री. श्री. के. क्षीरसागर (३) श्री. कृ. पां. कुलकर्णी (४) श्री. वि. भि. कोलते यांची समिति नेमण्यांत येत आहे. या समितीने सादर केलेल्या अहवालाची संमेलनाध्यक्षांनी योग्य ती दखल घ्यावी.

**२०. बेळगांव समाचारचे अभिनंदन**

बेळगाव येथील 'बेळगाव समाचार' या मराठी साप्ताहिकाला शंभर वर्षे पूर्ण झाल्याबद्दल हे संमेलन या साप्ताहिकाचे अभिनंदन करीत आहे.

* * *

# म. सा. परिषद-वार्ता

## चिटणीसांकडून

### दि. ४–११–६२ पर्यन्त

### कै. गोविंदराव टेंबे स्मारक व्याख्यानमाला

कै. गोविंदराव टेंबे यांच्या स्मरणार्थ त्यांच्या चिरंजिवांनी परिषदेला प्रतिवर्षी देऊ केलेल्या देणगीतून टेंबे स्मारक व्याख्यानमाला गेली तीन वर्षे भरत आहे. मालेचे यंदाचे तिसरे वर्ष. यंदा ही व्याख्यानमाला प्रा. अरविंद मंगरूळकर यांनी दि. २७-२८ व २९ जुलै या दिवशी गुंफली. त्यांच्या व्याख्यानमालेचा विषय 'संगीत सौंदर्याच्या प्रणाली' असा होता. 'पेटीवादनकार गोविंदराव टेंबे', 'संगीतातील व्यक्तित्व', व 'घराणे आणि व्यक्तित्व' या तीन विषयांवर प्रा. मंगरूळकर यांनी आपले विचार सुगम रीतीने व्यक्त केले.

(मालेतील पहिले व्याख्यान प्रस्तुत अंकात छापले आहे.)

### संमेलनाध्यक्षांचा सत्कार

सातारा येथे भरणाऱ्या ४४ व्या मराठी साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष श्री. न. वि. ऊर्फ काकासाहेब गाडगीळ यांचा ५ ऑक्टोबरला म. सा. परिषदेतर्फे प्रा. म. म. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली प्रकट सत्कार करण्यात आला. या प्रसंगी कार्याध्यक्ष प्रा. श्री. के. क्षीरसागर, श्री. गोपीनाथ तळवलकर, महाराष्ट्रकवि यशवन्त, डॉ. कमलाबाई देशपांडे, श्री. श्री. शं. नवरे, खासदार र. के. खाडिलकर, श्री. अ. ह. लिमये यांची भाषणे झाली. श्री. काकासाहेब व म. म. पोतदार यांची भाषणे झाल्यावर चिटणीस श्री. वि. त्र्यं. शेटे यांनी आभार मानले. प्रस्तुत समारंभाला सौ. अनसूयाबाई गाडगीळ उपस्थित होत्या. त्यांनाही परिषदेतर्फे पुष्पगुच्छ देण्यात आला.

### संमेलन-प्रतिनिधींसाठी देणगी

म. सा. संमेलनाला उपस्थित राहाणाऱ्या प्रतिनिधींच्या चहापाण्यासाठी 'दिल्ली महाराष्ट्रीय समाज बिल्डिंग ट्रस्ट' ने दरवर्षी २५० रु. ची देणगी देण्याचा निर्णय संस्थेचे अध्यक्ष श्री. काकासाहेब गाडगीळ यांच्या शिफारशीवरून घेतला आहे. त्याप्रमाणे सातारा संमेलनासाठी रु. २५०=०० ची देणगी वरील संस्थेकडून नुकतीच आली आहे.

### कै. केतकर स्मारक

ज्ञानकोशकार कै. श्री. व्यं. केतकर यांच्या स्मारकासाठी पुणे महानगरपालिकेने

' कमला नेहरू उद्याना 'त जागा देऊ केली आहे व सर्व प्रकारची मदतहि देऊ केली आहे. या संकल्पित स्मारकासाठी ' इंडियन कमिटी फॉर कल्चरल फ्रीडम-पुणे शाखा ' या संस्थेतर्फे रु. १००=०० ची देणगी मिळाली आहे.

### बंगाली ज्ञानेश्वरी

श्री. शंकर गणेश शारंगपाणि व श्रीप्राणकिशोर गोस्वामी यांनी बंगाली भाषेत भाषांतरित केलेल्या ज्ञानेश्वरीचे दोन भाग ( १२ अध्याय ) आर्यभूषण प्रेसचे व्यवस्थापक श्री. के. ग. शारंगपाणि यांचेमार्फत परिषदेला भेट म्हणून आले आहेत.

### महामंडळ शुद्धलेखन नियमांना सरकार मान्यता

महाराष्ट्र सरकारच्या शिक्षण व समाजकल्याण खात्याने २० सप्टेंबर १९६२ रोजीच्या ठराव क्र. SCO-1061-C अन्वये ' मराठी साहित्य महामंडळा 'ने तयार केलेल्या शुद्धलेखन नियमावलीस अधिकृत मान्यता दिली आहे. प्रस्तुत ठराव येणेप्रमाणे आहे–

Government had under consideration the question of adopting and prescribing at all levels of education, a uniform set of rules of Marathi Orthography. After careful consideration Government has decided to adopt and prescribe at all levels of education the set of rules prepared and unanimously approved by the Marathi Sahitya Mahamandal, which is a representative Marathi literary body. The said set of rules is appended for information. The rules should be brought into force immediately.

2. This Resolution supersedes all previous orders issued by Government in this behalf.

### सॉलिसिटर श्री. म. वि. गोखले यांची देणगी

पुणे येथे स्थायिक झालेले मुंबईचे सुप्रसिद्ध सॉलिसिटर श्री. म. वि गोखले यांनी रु. ५०००=०० ची सशर्त व उदार देणगी म. सा. परिषदेला सप्टेंबर महिन्यांत दिली आहे याबद्दल परिषद त्यांची आभारी आहे.

### का. का. मंडळाची सभा

म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळाची सभा शुक्रवार दि. २ नोव्हेंबरला सातारा येथे भरली होती. या सभेत पुढील महत्त्वाचे निर्णय झाले–(१) श्री. गोपीनाथ तळवलकर यांनी कार्यबाहुल्यामुळे दिलेला चिटणीसपदाचा राजीनामा खेदपूर्वक स्वीकारण्यात आला.(२) प्रा.श्री.के.क्षीरसागर यांनी कार्याध्यक्षपदाच्या दिलेल्या राजीनाम्यावर चर्चा होऊन त्यांनी तो परत घ्यावा अशी विनंती करण्यात आली. ( ३ ) सोलापूर, निपाणी, असोदा व गोमंतक येथून आगामी साहित्य संमेलनाची निमंत्रणे आली होती. त्यांपैकी गोमंतकातील ' गोमंतक साहित्य सेवक मंडळा ' चें निमंत्रण स्वीकारण्यात आले.

कार्यकारी मंडळाच्या सभेला प्रा. श्री. के. क्षीरसागर, श्री. वि. त्र्यं. शेटे, व प्रा. म. ना. अदवंत, डॉ. न. का. घारपुरे, प्रा. दि. के. बेडेकर, श्री. श्री. शं. नवरे, श्री. वा. रा. ढवळे, श्री. रा. पु. सगदेव, प्रा. भगवंत देशमुख, प्रा. कृ. ब. निकुंब, श्री. बा. रं. सुंठणकर, प्रा. अ. ग. मंगरूळकर व प्रा. चंद्रकुमार डांगे उपस्थित होते.

### सातारा संमेलन

मराठी साहित्य संमेलनाचें ४४ वे अधिवेशन सातारा येथे ' नगर वाचनालया ' तर्फे दि. २, ३ व ४ नोव्हेंबर रोजी न्यू इं. स्कूलमध्ये उभारलेल्या ' भाऊराव पाटील नगरा 'त श्री. न. वि. ऊर्फ काकासाहेब गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखाली यशस्वीपणे साजरे झाले. संमेलनाचे स्वागताध्यक्ष श्री. ना.

द. आपटे होते व संमेलनाचें उद्घाटन मुख्यमंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांनी केलें. संमेलनापूर्वी दोन दिवस श्री. वि. द. घाटे यांच्या अध्यक्षतेखाली एक शैक्षणिक चर्चासत्र आयोजिण्यात आले होते. या सत्रात डॉ. ग. श्री. खैर, श्री. कृ. भा. बाबर, प्रा. ना. ध. पाटील, प्रा. वा. ल. कुलकर्णी, प्रा. रा भि.जोशी, सौ.लीला भागवत, प्रा.चंद्रकुमार डांगे, प्रा. श्री. के. क्षीरसागर, श्री. मो. रा.वाळंबे, डॉ.प्र.न.जोशी, व डॉ.द. न.गोखले. यांनी भाग घेतला होता. संमेलनाला जोडून 'ग्रामीण रसिक वाचकांची साहित्याविषयीची कल्पना व त्यांच्या अपेक्षा' आणि 'प्रकाशक-ग्रंथकार यांच्या सहकार्याने ग्रंथप्रसाराची योजना' या दोन विषयांवर श्री. अण्णाभाऊ साठे व श्री. सदानंद भटकळ यांच्या अध्यक्षतेखाली परिसंवाद झाले. पहिल्या परिसंवादात श्री. नामदेव व्हटकर, श्री. शंकर पाटील, श्री. कृ. भा. बाबर, डॉ. सरोजिनी बाबर व प्रा. सूर्यवंशी यांनी भाग घेतला. दुसऱ्या परिसंवादांत श्री. अ. ह. लिमये, श्री. रा. ज. देशमुख, श्री. अनंतराव कुलकर्णी, श्री. मामा वरेरकर, श्री. य. गो. निस्तुरे व डॉ. न. का. घारपुरे यांनी आपले विचार प्रदर्शित केले. संमेलनाच्या दुसऱ्या दिवशी म. म. पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली संत वाङ्मयावर एक प्रकट सभा राजवाड्यासमोरील मैदानांत झाली. या सभेत श्री. त्र्यं. शि. भारदे, प्रा. गं. बा. सरदार, आचार्य अत्रे, डॉ. शं. गो. तुळपुळे व श्री. प्रभाकर माचवे यांनी अनुक्रमे ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम, रामदास व हिंदी संत या विषयांवर भाषणे केली.

संमेलनाला उपस्थित राहिलेल्या माजी संमेलनाध्यक्षांचा सत्कार, निबंधवाचन, काव्यगायन, नाट्यप्रयोग (तो मी नव्हेच आणि सवाई माधवरावाचा मृत्यु), लोककला आणि लोकवाङ्मय यांची प्रात्यक्षिके इत्यादि कार्यक्रमांनी संमेलनाच्या आकर्षणांत भर टाकली. पुण्याच्या 'मराठी ग्रंथ-प्रकाशक' संस्थेतर्फे व्यासपीठाच्या मागील सभागृहांत १९६० ते ६२ सालातील नव्या ग्रंथांचे प्रदर्शन भरविण्यांत आले होते. विषयनियामक समितीत व खुल्या अधिवेशनांत जे ठराव संमत झाले ते या अंकांत अन्यत्र छापले आहेत. निरनिराळ्या ठरावांवर झालेल्या भाषणांपैकी तर्कतीर्थ जोशी, आचार्य अत्रे, प्रा. श्री. के. क्षीरसागर, श्री. बा. रं. सुंठणकर, श्री.माधव मनोहर यांची भाषणे विशेष गाजली.

संमेलनाला परस्थ प्रतिनिधि मोठ्या संख्येने उपस्थित होते. गोमंतकांतून आलेल्या प्रतिनिधींचे सर्वांकडून विशेष स्वागत झाले. त्यांच्यापैकी गोमंतक मुक्तीसाठी कारावास भोगलेल्या प्रतिनिधींचा सत्कारहि करण्यांत आला. प्रतिनिधींच्या निवासभोजनाची सोय स्वागतमंडळाने उत्कृष्ठपणे केली होती. हे संमेलन गर्दीचे असूनहि ते यशस्वी करण्यासाठी नगराध्यक्ष श्री. रा. ना. गोडबोले, कार्याध्यक्ष श्री. शि. गो. भावे, कोषाध्यक्ष श्री. रा. शं. दातार, कार्यवाह श्री. श्री. बा. आचार्य, श्री. ग. वा. करंदीकर, श्री. अ. श्री.भडकमकर व सौ. वत्सला पाटील, तसेच श्री. दत्तोपंत परांजपे, श्री. सोमणमास्तर प्रभृति कार्यकर्त्यांनी आणि स्वयंसेवक सेविकांनी खूप परिश्रम केले याबद्दल कृतज्ञता व्यक्त केली पाहिजे.

साहित्य संमेलनाचे आगामी अधिवेशन 'गोमंतक साहित्य सेवक मंडळा' तर्फे गोव्यांत भरण्याचे निश्चित झाले आहे.

---

# नवीन सभासद

## ( १ जुलै ते १० ऑक्टोबर )

*साधारण:—*

**पुणें:—** श्री. ज. ग. जावडेकर; कु. सुभा अभ्यंकर; श्री. द. म. उतेकर; श्री. वि. र. केळकर; श्री. ना. मा. ऋषी; श्री. क. म. घाटे; श्री. सुलभा जोग; श्री. म. वि. महाजन; श्री. ना. ग. गोरे; श्री. रा. आ. कदम; श्री. र. वि. जोगळेकर; श्री. मो. ना. गोखले; श्री. गि. ग. करंटीकर; श्री. अ. ना. जावडेकर; श्री. व. व्ही. साखरकर; श्री. म. गो. कानडे; श्री. अ. मा. मिरासदार; श्री. चंद्रकांत भा. मुता; बारामती.

**सातारा:—** श्री. जयवंत गुजर; डॉ. प्र. शं. मराठे; श्री. बा. वि. पंडित; श्री. रमाबाई जोशी; श्री. आ. भि. भोईटे; आरडगांव.

**अहमदनगर:—** श्री. रा. व्यं. व्यवहारे;

**सोलापूर:—** श्री. रा. गो. मोरे; श्री. चं. र. चंडक; कुर्डूवाडी.

**नाशिक:—** भावना भार्गवे; श्री. ग. ह. कावळे; श्री. नीलनकुमार तडवी; मुमावळ.

**जळगांव:—** श्री. डी. आर. पाटील; श्री. सी. एन्. चौधरी; डॉ. रा. ना. आवटे; प्रो. गु. स. परदेशी; श्री. आ. वि. वाणी; उंबरखेडे. श्री. एस्. के. फाटक; श्री. एस्. डी. ढाके; वराडशीम. प्रा. चं. रा. पोतनीस; श्री. इंदिराबाई पाटणकर; श्री. पु. रा. भावसार; श्री. सु. ना. शिंपी; सौ. मं. य. नाडकर्णी; प्रा. आर. जी. चौधरी, फैजपूर. पंडित महाजन; खिरोदा. श्री. रामभाऊ चौधरी; खिरोदा; श्री. वा. ना. महाजन; खिरोदा. श्री. आर. के. कोळंबे; भालोद. श्री. सी. आर. झांबरे; भालोद. श्री. एन्. एल्. चौधरी; न्हावी. प्रा. वा. ल. पुरोहित, प्रा. मो. स. भावे; श्री. श्रीनिवास शास्त्री; श्री. श्यामकांत देशमुख, श्री. मो. शं. आरस; श्री. राजा मंत्री; श्री. के. टी. पवाडे; श्री. एम्. जी. सूर्यवंशी; श्री. जी. एन्. पंडित; श्री. जी. के. नावल; प्रा. एम्. एम्. थत्ते; श्री. आर. एम्. लोखंडे; श्री. के. डी. पाटील; प्रा. म. द. नाडकर्णी; प्रा. या. सी. महाजन;

**धुळे:—** श्री. के. कृ. मानेकर; श्री. गं. सि. गरुड; श्री. सु. द. गुजराथी; श्री. व्यं. दा. बिसपुते, श्री. अतुल जोशी; श्री. गो. म. लिंगायत; श्री. शा. मां. चौधरी; प्रा. सौ. कुमुदिनी देशपांडे, श्री. शरवीर देशपांडे; श्री. कृ. रा. चोळकर; श्री. शं. मा. शिंदे;

**सोनगीर:—** श्री. भानुदास जोशी; श्री. पी. एस्. वाणी; श्री. श्रीरंग पाटील; श्री. एन्. जी. बागूल, श्री. गे. म. हुंबड; श्री. बा. गो. शाह; श्री. विमलाबाई भावसार; श्री. वि. रा. काजळे; श्री. सिंधुबाई जोशी; श्री. एस्. ई. पाटील; श्री. ल. प्र. जोशी;

**बृहन्महाराष्ट्र:—** श्री. दि. एस्. गोरे; अहमदाबाद. प्रा. के. गो. गुजराती; विदर्भ. श्री. रा. निं. भावे; बडोदें.

**( एकूण ८८ )**

मुद्रक : श्री. पां. र. अंबिके. अनसूया मुद्रणालय, १३९८ सदाशिव पेठ, पुणें २.
प्रकाशक : श्री. वि. र्यं. शेटे, चिटणीस, म. सा. परिषद, टिळक रस्ता, पुणें २.

अनुक्रमणिका

